आंतरभारतीय पुस्तकमाला

# अनादि-अनंत

श्रीरंग

अनुवाद

शकुंतला बोरगांवकर



नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# भूमिका

साहित्यप्रेमी आणि नाट्यरसिकांमध्ये 'श्रीरंग' ह्या नावाने प्रसिद्ध असलेले आद्य रंगाचारी आज जवळ जवळ पन्नास वर्षे साहित्यनिर्मिती करीत आहेत. त्यांनी जवळ-जवळ पस्तीस नाटके आणि पन्नास एकांकिका लिहिल्या. त्याशिवाय नवीन नवीन प्रयोग करण्यात कुशल असल्यामुळे नाटकाच्या माध्यमाने त्यांनी नवीन विचार, नवीन कल्पना आणल्या. त्यांचे तंत्र केवळ नवीनच नव्हते तर नवीन विचारांचे प्रेरक आहे. १९६३ मध्ये त्यांना संगीत नाटक अकादमीचे पारितोषिक प्राप्त झाले.

नाट्यक्षेत्रात 'श्रीरंग' ह्यांना मोठे यश मिळाले आणि ते त्यांना मिळणे योग्यच होते. पण त्यामुळे त्यांच्यावर एका बाबतीत एक प्रकारचा अन्यायच झाला. आतापर्यंत त्यांनी बारा कादंबऱ्या लिहिल्या. नाटककार म्हणून त्यांची कीर्ती पसरविणारी त्यांची पहिली नाट्यकृती त्यांनी १९३० मध्ये लिहिली तर त्यांची पहिली कादंबरी 'विश्वामित्रन सृष्टि' १९३४ मध्ये प्रकाशित झाली. कन्नड कादंबरीक्षेत्रात तो एक नवा प्रयोग होता. परंतु ह्या कादंबरीने अथवा त्यांच्या इतर अनेक कादंबऱ्यांनी समीक्षकांचे लक्ष वेधून घेतले नाही.

कन्नड भाषेतील प्रथम कादंबरी कोणती ? अलिकडेच या प्रश्नाने समीक्षकांचे लक्ष वेधून घेतले आहे. साधारणपणे १८०५ मध्ये 'कलावती परिणय' (लेखक-यादव) लिहिली गेली. १८२१ मध्ये 'सौगंधिका परिणय' (लेखक मुम्मडी कृष्णराज औडेयर) लिहिली गेली. 'मुद्रा मंजूष'च्या आधी ह्या कादंबऱ्या लिहिल्या गेल्या आहेत. डॉ. श्रीनिवास हवनूर ह्यांच्या नुकत्याच लिहिलेल्या एका लेखाच्या आधारे ह्या दोन्ही कादंबऱ्या रोमँटिक वर्गात ठेवल्या जातील. 'केंपुनारायण' ह्यांची 'मुद्रा मंजूष' (१८२३) ही कन्नड साहित्यातील पहिली ऐतिहासिक कादंबरी. १८४२ पर्यंत बन्यनची 'पिलग्रिम्स प्रोग्रेस' 'यात्रिकन संचार' ह्या नावाने प्रकाशित झाली. १८५७ मध्ये एस. बी. कृष्णस्वामी अय्यंगार ह्यांनी डॅनियल डिफोच्या 'रॉबिन्सन क्रूसो'चा कन्नडमध्ये अनुवाद केला. तोपर्यंत कन्नड कादंबरी साहित्यात वर्णनात्मकता आली होती.

बी. वेंकटाचार्यांनी १८९५ मध्ये बंकिमचंद्रांच्या 'दुर्गेशनंदिनी'चा कन्नडमध्ये अनुवाद केला. त्यानंतर त्यांनी कन्नडमध्ये अनेक बंगाली कादंबऱ्यांचे भाषांतर केले. वेंकटाचार्यांच्या ह्या अनुवादित कादंबऱ्या खूप लोकप्रिय झाल्या आणि अशा प्रकारे बंगाली कादंबऱ्यांचा प्रभाव कन्नड कादंबरीवर झाला.

वेंकटाचार्यांनी 'दुर्गेशनंदिनी'ची भूमिका इंग्रजीत लिहिली. त्यामध्ये त्यांनी 'नॉव्हेल' शब्दाचा उपयोग केला. आणि त्याचे विस्तारपूर्वक स्पष्टीकरण केले :

"समाज आणि समाजाचाच भाग असलेल्या मनुष्याच्या जीवनात दिसणारे दुर्व्यवहार इत्यादी दाखवून प्रत्येक व्यक्तीला योग्य मार्गाने चालण्याचा मार्ग दाखविला पाहिजे."

गुलवाडी वेंकटराय ह्यांची "इंदिरा बायि" ही कन्नड साहित्यातील पहिली मौलिक सामाजिक कादंबरी आहे. ह्या कादंबरीचे दुसरे नाव 'सद्धर्मविजय' आहे. (तत्कालीन जिल्हाधिकारी कॉजमन ह्यांनी कादंबरीचा इंग्रजीत अनुवाद केला आहे.) ह्या दुसऱ्या शीर्षकावरून कादंबरीचा उद्देश स्पष्ट होतो. बी. वेंकटाचार्य ह्यांनी कादंबरीची व्याख्या स्पष्ट करून त्याद्वारे वाचकाचे विचारपरिवर्तन करण्याची शक्ती महत्त्वाची आहे असे प्रतिपादन केले आहे. समकालीन समाजातील मठ आणि सामाजिक रूढी ह्यावर त्यांनी कडक टीका केली आहे. सत्य, हृदयाची निर्मळता ह्या दोन गोष्टींची साधनाच आम्हाला ह्या जगात आणि परलोकातमुद्धा आवश्यक आहे. त्याशिवाय सारे प्रयत्न निरर्थक आहेत लेखकाने हा आपला दृष्टिकोण स्पष्ट केला आहे. १९०५ मध्ये प्रकाशित झालेल्या 'वाग्देवी' (बोलार बाबूराय ह्यांची रचना) मध्ये ह्या प्रकारची उपदेशकता नाही. पण त्या कथेमध्ये मनुष्यस्वभावाची आसक्तीच दाखविली आहे.

कन्नड साहित्यातील कादंबरी खऱ्या स्वरूपात १९१५ मध्ये प्रकाशित झालेल्या एम्. एस. पुट्टण्णांच्या 'माडिद्दुण्णो महाराया' कादंबरीत दिसून येते. तसं पाहिलं तर लेखक नेहेमीच आदर्श पात्रांचीच निर्मिती करतो पण ह्या कादंबरीचे वैशिष्ट्य हे की इथे मनुष्यस्वभावाचे रेखाटन आहे. इथेसुद्धा अद्भुत घटनांची तरतूद आहेच. मेलेली स्त्री जिवंत होऊ शकते जादूटोण्यालाही इथे स्थान आहे. परंतु येथील पात्रांची विविधता आश्चर्यचकित करणारी आहे. पात्रांचा परस्पर स्वभाव आणि जीवनाच्या अनुभवाने पात्रांच्या स्वभावातील परिवर्तन इत्यादींचे चित्रण ह्या कादंबरीत आहे. पुट्टण्णांची शैली मोठी प्रभावी आहे. 'माडिद्दुण्णो महाराया' कन्नड साहित्यातील पहिली कादंबरी आहे की ज्यामध्ये अनेक काल्पनिक घटना म्हणून आहेत त्यात बरीचशी वास्तविकता पण आहे.

"सुब्बण्णा" १९२६ मध्ये प्रकाशित झाली. तिला लघु कादंबरी ही संज्ञा दिली गेली. श्रीनिवास (डॉ. मास्ति वेंकटेश अय्यंगार) यांनी कादंबरीत दाखविले आहे की कशाप्रकारे एका व्यक्तीचे जीवन संघर्षामध्ये फसून हळूहळू परिपक्व अवस्थेपर्यंत पोहचते. सुब्बण्णाला संगीतकार होण्याची इच्छा आहे. आईवडिलांशी मतभेद झाल्यामुळे त्यांना सोडून, तो म्हैसूरहून कलकत्त्याला येतो. पत्नी-मुले सारं सोडून संगीतानेच मनःशांती आणि जीवनाशी सामना करण्याची स्थिरता प्राप्त करून घेतो. हीच ह्या छोटया कादंबरिकेची संक्षिप्त कथावस्तू आहे. व्यक्तित्वाचा विकास होऊन ते परिपक्व होणे हीच येथील क्रिया आहे, ह्या कादंबरीत नाटयमय घटना नाहीत. 'सुब्बण्णा'ने कन्नड कादंबरीला मनुष्याचे आंतरविश्व दाखविले.

विनायक (विनायक कृष्ण गोकाक) ह्यांनी १९३२ मध्ये 'इज्जोड' नावाची १७२ पानांची एक कादंबरी प्रकाशित केली. कोमल, दयाळू स्वभावाची मुलगी आपल्या अडाणी, मूर्ख नवऱ्याच्या हातून मारली गेली हीच ह्या कादंबरीची कथा आहे. दुसऱ्याच वर्षी आनंदकंद (बेटगेरी कृष्ण शर्मा) ह्यांनी 'सुदर्शन' नावाची कादंबरी लिहिली. सुदर्शन एक सामाजिक कादंबरी आहे. परंतु एका आदर्श, परिपूर्ण व्यक्तीचे चित्रण करणे हेच ह्या कादंबरीचे ध्येय आहे. गांधीयुगातील ही पहिलीच कादंबरी. ह्या कादंबरीचा नायक सरळ आहे. उदात्त विचार आणि धैर्याची मूर्ती आहे. आश्चर्याची गोष्ट म्हणजे विनायक ह्यांच्या 'इज्जोड' कादंबरीचा महत्त्वाचा भाग २५ वर्षांनंतर १९५३ मध्ये प्रकाशित झाला. आणि दुसऱ्या एका आदर्श रूपामध्ये चित्रित झाला आहे. परंतु विनायक ह्यांचा नरहरि अनेक प्रभावांमध्ये फसून जीवनातील चढउतारांचा अनुभव करून क्रमाक्रमाने आमच्यासमोर एक रूप धारण करतो. 'कुवेंपु' (डॉ. कु. वें. पुट्टप्पा) ह्यांची 'कानूर सुब्बम्मा हेग्गडती' (१९३६) आणि अ. न. कृ. (डॉ. अ. न. कृष्णराव) ह्यांच्या अनेक कादंबऱ्या आहेत. ह्या कादंबरीकारांनी जीवनाचे जे दर्शन घेतले ते व्यक्त करण्यासाठी त्यांनी कादंबरीचे माध्यम निवडले. हळूहळू जीवनातील जटिलता आणि निष्ठुर सत्याच्या भूमीवर अविकसित आकाशपुष्पांचीसुद्धा निर्मिती झाली.

शिवराम कारंथ ह्यांनी १९३३ मध्ये 'चोमनदुडी' ह्या नावाची एक उत्कृष्ट कादंबरी प्रकाशित केली. (तोपर्यंत कारंथ ह्यांच्या पाच कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या होत्या.) हरिजनांची समस्या कन्नड कादंबरीमध्ये नंतरच्या वर्षात अनेकवेळा येऊन गेली. परंतु चाळीस वर्षांपूर्वी कारंथ ह्यांनी एक विशिष्ट वातावरण निर्माण केले होते. अस्पृश्यांचे जीवन येथे कलात्मक रूपाने व्यक्त झाले आहे. सुधारण्याच्या इच्छेपेक्षा अंतःकरणाचा बोधच इथे महत्त्वाचा आहे. अशा प्रकारे, गरीब जनता आणि त्यांना तुडविण्यास तयार असलेले चहूकडचे लोक. . .त्यांचे विश्व दाखवून देण्यासाठी त्यांनी

कल्पनेचे अनेक दीप प्रज्वलित केले आहेत. भावुकतेला मुळींच स्थान न देण्याचा कारंथ ह्यांचा दृष्टिकोण आजमुद्धा आपल्याला चकित करून सोडतो. आजसुद्धा कारंथ कन्नड कादंबरीक्षेत्रातील एक महान निर्माता आहेत.

"श्रीरंग" ह्यांची 'विश्वामित्रन सृष्टि' १९३४ मध्ये प्रसिद्ध झाली. तोपर्यंत कन्नड साहित्यात उल्लेखनीय अशी कोणती कादंबरी निर्माण झाली होती. कादंबरीतून धर्मोपदेश दूर झाला होता. जीवनसंघर्ष करणारी पात्रे निर्माण होऊ लागली. मनुष्याच्या आंतर–जगतातील व्यापाराचे महत्त्व समजले जाऊ लागले. समाजाच्या टीकेत भाग घेतला जाऊ लागला. आदर्श दाखविले जाऊ लागले साधी व्यवहारातील भाषा लिहिली जाऊ लागली. एम्. एस्. पुट्टण्णा आणि श्रीनिवास ह्यांनी कादंबरीच्या भाषेला तिखटपणा, लचक आणि लालित्य दिले. परंतु तोपर्यंत प्रकाशित कादंबऱ्यांची संख्या खूपच कमी होती. (१९४५ पर्यंत जवळ जवळ १५० कादंबऱ्या प्रकाशित झाल्या होत्या. पुढे लोकप्रिय कादंबरीकार अ. न. कृ. ह्यांच्या आरंभीच्या कादंबऱ्या 'जीवनयात्रे' आणि 'उदयराग' १९३४ मध्ये प्रसिद्ध झाल्या.) साधारणपणे कन्नड वाचकांना वी. वेंकटाचार्य आणि गलगनाथ ह्यांच्या साहसी नायकांच्या रोमांचकारी रचना पण मिळाल्या. इतर कादंबरीकारांनी जवळ जवळ प्रत्येकाने एक एक कादंबरी लिहिली.

अशा स्थितीत श्रीरंग ह्यांच्या "विश्वामित्रन सृष्टि" ह्या कादंबरीची निर्मिती १९३४ मध्ये झाली. ह्या कादंबरीतील मुख्य पात्र नारायण नावाचा एक तरुण आहे. घरातील लोकांनी त्याच्या इच्छेविरुद्ध त्याचे लग्न ठरविले म्हणून तो घरातून पळून जातो. तो रेल्वेच्या डब्यात चढतो. त्याचा संपर्क रेल्वेच्या डब्यात विशाल जगाशी येतो. तो तरुण आहे. कॉलेजशिक्षण त्याने घेतले आहे. तो बुद्धिजीवी आहे. त्याला वाटते आपल्या सभोवतालचा सारा समाज परिपूर्ण राहावा. आपल्या स्वतःच्या विवाहाच्या प्रश्नाने जो असंतोष निर्माण होतो तो रेल्वेत, हॉटेलात, गावातील विविध जातीच्या लोकांना भेटून आणखीच वाढत जातो. कॉलेजात शिकला सवरलेला असल्यामुळे नारायण सुधारणांसाठी शिक्षणाचा आधार घेतो. लोकांचा मूर्खपणा व अंधश्रद्धा वाढवतो. आणि गावातील कुळकर्णी . . वरच आपला उदरनिर्वाह करतो. कुलकर्णीच्या मदतीने नारायण एक शाळा काढतो. ज्या मूर्खपणाचा विरोध करण्यासाठी नारायणाने कंबर कसलेली असते, तोच मूर्खपणा त्याला महापुरुषाच्या जागेवर बसवितो. तो वर्षा आणणारा चमत्कारी पुरुष बनतो. शेवटी शाळेत शिकवताना नारायण मरण पावतो.

श्रीरंग ह्यांची ही कादंबरी ज्यावेळी प्रकाशित झाली त्यावेळी ती काळाच्या किती पुढे होती हे स्पष्ट दिसून येते. अनेक वर्षे टीकाकारांचे तिकडे लक्ष गेले नाही.

वाचक कादंबरीतील केंद्रीभूत पात्राबरोबर एकरूप होऊन जात. अशा लोकांना 'विश्वामित्रन सृष्टि' प्रभावित करू शकली नाही. कादंबरीच्या अधिकांश भागात कादंबरीकार कादंबरीच्या पात्रांपासून दूर उभे राहून आपली सहानुभूती मिळालेल्या पात्रांपासून निर्लिप्त होऊन पाहू शकतो. शेवटचा भाग सोडल्यास सारी कादंबरी उपरोधपूर्ण आहे. हा उपरोधही तसा सरळ आणि उथळ नाही. नारायण समजूतदार आहे. आदर्शांना चिकटून राहणारा आहे. परंतु त्याच्या विचारशक्तीत वास्तविकता नाही. आणि अनुभवांची खोलीही नाही. अमुक एका गावाला जायला पाहिजे की नको. . . ह्याचा निश्चय न करताच तो रेल्वेच्या डब्यात बसतो. त्यानेच त्याच्या जीवनाला दिशा मिळते. त्याला जायचे आहे. पण कुठे जायचे ते निश्चित नाही. तिसऱ्या वर्गाने त्याचा प्रवास सुरू होतो. साऱ्या प्रवासभर त्याच्या हितचिंतकांमध्ये व त्याच्यामध्ये मोठे अंतर दिसून येते. पण नारायणला ह्याचा बोध होत नाही. ह्या कृतीत दोन प्रकारचा उपरोध आल्याने एक विशिष्ट जटिलता निर्माण होते. एक उपरोध असा आहे की नारायणला आपल्या चहूबाजूंची दुनिया समजत नाही. दुसरा उपरोध असा आहे की त्याला आपल्या अनुभवांच्या अभावाची जाणीव नाही. आपल्या सभोवतालच्या बाजूला मूर्खपणा पाहून नारायणाला दया येते. त्याला त्या लोकांचा अत्यंत तिरस्कार वाटतो. . . "हाय ! कसे ह्या लोकांना सुधारणार ?" तेव्हाच नारायणाच्या लक्षात आले की ह्यांना तर शिक्षणाची आवश्यकता आहे. पण त्याला आपल्या स्वतःलासुद्धा जीवनाबद्दल शिक्षणाची आवश्यकता आहे ही गोष्ट त्याला समजत नाही.

ह्या कादंबरीत श्रीरंगांनी कन्नड साहित्यात प्रथमच मनोवैज्ञानिक शैली स्वीकारली आहे. (कदाचित दुसऱ्या वेळी ह्याचा प्रयोग त. रा. सु. यांच्या 'बिडुगडेय बेडि' मध्ये झाला ) श्रीरंग काही काळ इंग्लंडमध्ये राहिले. म्हणून त्यांच्या लेखनावर इंग्रजी साहित्याचा परिणाम दिसून येतो. त्यांनी मानसशास्त्रीय तंत्राचा प्रयोग केला. नारायणाच्या आजूबाजूच्या जगाकडे ते त्याच दृष्टीतून पाहतात. त्यांच्या मनाचे व्यापार आरशात दिसल्यासारखे स्पष्ट दिसतात. परंतु जेम्स जॉयसमध्ये जो उपरोध नाही तो येथे दिसतो. इथे नायकाचे मन उलगडून पाहण्याचा प्रयत्न झालेला नाही.

ह्या कादंबरीत भाषेचा प्रयोगसुद्धा मोठा वैशिष्टयपूर्ण आहे. विविध पात्रांच्या सामाजिक वर्गानुसारच नाही तर मनाच्या व्यापारानुसार संवादाची भाषा वापरली गेली आहे. त्यामुळे केवळ सहजपणे ओळखू येणारे वर्ग आणि भाषाभेद, सामान्य लेखकाची भाषा दिसून येते. शिवाय त्यांच्या दृष्टिकोणातील अंतर स्पष्ट करून सांगणारे सूचक 'इंडिकेटर' सुद्धा पाहू शकतो.

अशा प्रकारे एका वैशिष्ट्यपूर्ण कृतिद्वारा कादंबरीक्षेत्रात पदार्पण करणारे श्रीरंग एका मागून एक अनेक कादंबऱ्यांची निर्मिती करीत होते. गेली चाळीस वर्षे कन्नड कादंबरीसाहित्य नुसते समृद्धच झाले नाही तर अधिक सत्त्वशाली होत आहे. १९४५ पर्यंत शिवराम कारंथ, अ. न. कृष्णराव यांनी वैशिष्ट्यपूर्ण कादंबऱ्या लिहिल्या. त्यानंतर शिवराम कारंथ ह्यांनी आपली एक अनुपम साधना केली. त्यांनी आपल्या परिपक्व, अनुभवसमृद्ध, जीवनातील गाढ श्रद्धेने 'मरलि मण्णिगे' पासून 'मूकज्जिय कनसुगळु' पर्यंत कथानक–सूक्ष्म–दृष्टिकोणयुक्त, तांत्रिक दृष्टीने सफल अशा अनेक कादंबऱ्या लिहिल्या. कन्नड कादंबरीसाहित्यात कित्येक वेळा अनेक वादविवाद उभे राहिले, परंतु समीक्षकांनी त्यांच्या कादंबऱ्यांची उपेक्षा केली नाही त्यांनी आपला दृष्टिकोण ह्या शब्दात व्यक्त केला आहे :

"साहित्यामध्ये आजकाल अनेक वाद चालू आहेत हे खरे आहे. तो जीवंत साहित्याचा एक गुण आहे. परंतु तंत्र, शैली आणि प्रकारांचे महत्त्व त्यांच्या कार्यावर अवलंबून असते. साहित्यकाराने आपली कल्पना, भावना आणि उद्देश्यांचा वाचकांच्या मनावर असा प्रभाव टाकला पाहिजे की त्यांच्यावर त्याची अमिट छाप राहिली पाहिजे. आनंदकंद आणि विनायक ह्यांच्यापासून जी परंपरा सुरू झाली (कथाक्षेत्रात ती श्रीनिवासांच्या परंपरेला जोडली आहे) तीच कन्नडमध्ये चालत आली आहे. त्यामध्ये आदर्श प्रेम आहे. जीवनाला आत्म्याची भट्टी समजली जाते. त्याग आणि मनाच्या स्थिरतेबद्दल गौरव व्यक्त झाला आहे. अनेक कादंबरीकार ह्याच परंपरेतील आहेत. आश्चर्याची गोष्ट ही की, १९४५ पासून सुरू होऊन जवळ जवळ दहा वर्षापर्यंत जे प्रगतिशील आंदोलन चालले त्याचे प्रमुख आचार्य अ. न. कृ. आहेत. त्यांची पहिली वैशिष्टपूर्ण कृति 'संध्याराग' ह्याच परंपरेतील रचना आहे. प्रगतिशील आंदोलनाला अखिल भारतीय स्वरूप प्राप्त झाले होते. प्रगतिशील लेखकांनी हे प्रतिपादित केले की साहित्यामध्ये समाजातील घाण आणि वाईटपणा दाखवून त्याचे खंडन करण्याची एक प्रचंड शक्ती असली पाहिजे. ह्या कालावधीत अ. न. कृ. च्या शिवाय त. रा. सु. (त. रा. सुब्बाराव) बसवराज कट्टीमनी इत्यादी लोकप्रिय लेखकांनी कादंबऱ्या लिहिल्या. ह्या वर्गातील लेखकांमध्ये भली कला मागे राहिली आणि आवेश प्र ारच अधिक आला. परंतु 'बिड्गडेव' बेडि, 'ज्वालामुखी', इत्यादी श्रेष्ठ कादंबऱ्यांमध्ये कथा-नकाचा विस्तार झालेला आहे. अनावश्यक संकोच सोडला आहे. त्याशिवाय वाचकांची संख्या वाढली हेसुद्धा खरे आहेच.

गेल्या पंचवीस वर्षात 'नव्य पंथा' मुळे कन्नड साहित्यावर मोठा प्रभाव पडला आहे. नव्य पंथद्वारा (कविता सोडून) फारच थोडे साहित्य लिहिले गेले आहे. परंतु

साहित्यासबंधी सूक्ष्म आणि कित्येक वेळा कठोर, विस्तृत आलोचना विवेचना झाल्यामुळे ह्या वाद अत्यंत प्रभावी झाला आहे. एका दृष्टीने ही अखिल भारतीय बौद्धिक चळवळच आहे. परदेशी जाणाऱ्या युवकांची संख्या वाढल्यामुळे, विद्यापीठात इंग्रजी साहित्याचे अध्ययन व अध्यापन ह्यात विस्तार झाल्यामुळे आणि साहित्याला योग्य स्थान प्राप्त झाल्यामुळे पुस्तके, मासिके ह्यांची संख्या वाढली. त्यामुळे ह्या आंदोलनाला प्रोत्साहनच मिळाले. साऱ्या भारतावरच हा प्रभाव झाला त्यामुळे काफका, काम्यू, ब्रेख्त, अयनेस्को, ब्रूह, सार्त्र इत्यादी पाश्चात्य लेखकांचा प्रभाव संपूर्ण भारतीय साहित्यावरच झाला. कन्नड साहित्याबाबतच बोलायाचे म्हटले तर कादंबरीकाराला कोणत्याही सिद्धांताच्या आहारी न जाता जीवनानुभवाशी वस्तुनिष्ठ राहून विश्लेषण करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. अनुभव, किंवा व्यक्तित्व न सांडता, कोणत्याही तयार साच्याचा स्वीकार न करता साहित्याची निर्मिती केली पाहिजे. भावनेच्या आहारी न जाता अलिप्त आणि वस्तुनिष्ठ राहून अनुभव व्यक्त करीत असताना भाषेला एक वेगळेच रूप प्राप्त होते. अशा तऱ्हेने जन्म पावलेली भाषा साहित्यात अवतीर्ण होते तेव्हा संघर्ष करावा लागतो. रचनेच्या आवश्यकतेनुसार भाषा उपयोगात आणावी लागते. बदलावी लागते. नव्यपंथाच्या विचारसरणीचे हे मूळ आहे.

कोणत्याही विचारप्रणालीत स्वतःला गुंतवून न घेता स्वतंत्र मार्गाने जाणारे अनेक कादंबरीकार आहेत. कारंथ ह्यांच्या नावाचा उल्लेख केलाच आहे. 'ग्रामायण' चे लेखक रावबहादुर 'मनेयल्लि मदुमगळ' चे लेखक कुवेंपु हे ह्यामध्ये येतील. शंकर मोकाशी 'पुणेकर' च्या 'गंगव्वा गंगामाई' ह्या कादंबरीत नवीन कादंबरीचे गुण दिसतात. गेल्या काही वर्षांत प्रसिद्धी पावलेल्या डॉ भैरप्पानी 'वंशवृक्ष', 'नायिनेरळु', 'गृहभंग' इत्यादी कादंबऱ्यांत कारंथांप्रमाणे दृढ अनुभवांवर नवीन रचना निर्माण केल्या, 'श्रीरंग' ह्यांचे नाव अशा प्रकारे कोणत्याही विचारप्रणालीशी संबंध न ठेवता लेखन करणाऱ्या-मध्ये उल्लेखनीय आहे.

'श्रीरंग' ह्यांची प्रत्येक कादंबरी म्हणजे एक नवाच प्रयोग आहे. त्यांचे प्रयोग-शीलतेवर अधिक अधिक ध्यान आहे. 'विश्वामित्रन सृष्टि' प्रमाणेच श्रीरंग ह्यांच्या कादंबऱ्या म्हणजे एकदम नवे आणि सफल प्रयोग आहेत. मध्यमवर्गीयांचे कौटुंबिक जीवन आणि त्यांची आदर्शप्रियता ह्यांनाच अ. न. कृष्णराव नी आपल्या कादंबऱ्यात प्रतिबिंबित केल्यामुळे त्यांच्या कादंबऱ्या लोकप्रिय झाल्या. श्रीरंगला एक वैचारिक अधिष्ठान आहे. उथळपणा, किंवा भावुकता यांना आवडत नाही (म्हणून कादंबरी किंवा नाटककार ह्यांच्या रूपाने ते मोठे कडक, कठोर आहेत अशी त्यांच्यावर टीका केली जाते.) भोवतालच्या जगाबद्दल आसक्ती असल्यामुळे ते त्यातील एक

भाग उचलतात, तो पाहिल्यावर त्यांची आसक्ती दुसरीकडे निर्माण होते. म्हणून त्यांच्या कादंबरीत दिसणारे वातावरण किंवा पात्रे दुसऱ्या नाटकात दिसून येत नाहीत. ह्या दृष्टीने पाहिल्यास ते आपल्या समकालीन लोकप्रिय कादंबरीकारांहून खूप भिन्न आहेत.

श्रीरंग ह्यांची एक एक कादंबरी एक एक वैशिष्टय दाखवते. 'प्रकृति' मध्ये त्यांनी तीन पिढयांचे चित्रण केले आहे. ह्या तीन पिढयांमध्ये समाजाच्या भिन्न भिन्न वर्गाचा संबंध कशाप्रकारे बदलतो हे दाखविले आहे. ही कादंबरी एक भावना किंवा अभिप्राय ह्यांचे विवरण नसून जीवनव्यापाराचा अनुभव आहे. तंत्र इथे महत्त्वपूर्ण आहे. वर्तमानकालातून सुरू होणारा वृतांत भूतकाळाकडे वळून पुन्हा वर्तमानकाळाकडे वळतो.

१५ ऑगस्ट १९४७ ला श्रीरंग ह्यांची 'पुरुषार्थ' ही कादंबरी प्रकाशित झाली. लोकमान्य टिळकांच्या अंत्ययात्रेपासून (१–८–१९२०) कादंबरीचे कथानक सुरू होते. आणि स्वातंत्र्याच्या उदयाबरोबर कादंबरीचे कथानक संपते. स्वातंत्र्य प्राप्त करण्यासाठी आपण सर्वस्व अर्पण केले असा विचार करून चारी मित्र पुन्हा भेटतात. तीन पात्रांनी जो आदर्श निवडला होता तो सोडून भिन्न भिन्न मार्ग स्वीकारून ते आपला पुरुषार्थ प्राप्त करतात. शेवटी स्वातंत्र्यासाठी लढणारा केवळ साधूच आहे. प्रामाणिकपणे आदर्श-पालन करणारा साधू सर्वस्वाचा त्याग करतो. चौघांच्या आठवणी चार पुरुषार्थांचे रूप धारण करतात.

हल्लीच्या कादंबरीत, 'त्रिपचक्रव्यूह' मध्ये गांधीयुगाच्या नंतरची कथावस्तू आहे. इथे दोन पिढयांचे अंतर बाप मुलांच्या मध्ये विशेष रूपाने व्यक्त झालेले आहे. श्रीरंग भाषेच्या बाबतीत नेहमी जागृत असतात. इथे दोन पिढयांमधील अंतर शब्दांच्या अभिव्यक्तीत प्रतिबिंबित होते. कमांडर, सांगितल्याप्रमाणे करणे, लीडर, मुख, सार्थक . . . . हा प्रत्येक शब्द भिन्न भिन्न पिढी मध्ये भिन्न अर्थ दाखवतो. शेवटी मुलगा, बापाला म्हणतो. "तुम्ही लोकांनी महात्मा गांधींमध्ये काय पाहिले, आम्हाला कळतच नाही बुवा !"

"अनादी अनंत" श्रीरंग ह्यांची आठवी कादंबरी आहे (१९५९) प्रथम भाग 'अनादी' आणि द्वितीय भाग 'अनंत' ह्या दोन घटनांमध्ये दहा वर्षांचे अंतर आहे. 'अनादी' मध्ये तीन पात्रे आहेत. त्यामध्ये एक मृत सरला आहे. परंतु बाकीची दोन पात्रे रामण्णा आणि कुमुद ह्यांच्या आठवणींच्या ओघात सरला त्यांच्याप्रमाणेच जिवंत आणि

वास्तविक वाटते. त्याशिवाय त्याच्या संवादात एक प्रकारचे रहस्य असल्यामुळे रामण्णा आणि कुमुदच्या मनातील संघर्षांना, त्यांच्या संबंधांच्या परिवर्तनाला ती कुठपर्यंत ग्रहण करते किंवा कल्पना करते ही एक समस्याच आहे. त्यामुळे तिचे व्यक्तित्व एक रहस्यच वाटते. स्त्रीपुरुषसंबंध ही ह्या कादंबरीची कथावस्तू आहे. ( लैंगिक संबंध म्हटल्यास कथानकाच्या व्यापकतेवर अन्याय होईल. स्त्री-पुरुष दोघांच्या मनाचा, संपूर्ण जीवनाचा ढंग इथे आहे ). ह्या कथानकाच्या विकासाबरोबर आणखी काही कथा सांकेतिक रूपाने सुरवातीपासून आल्या आहेत. आणि त्यामुळे कादंबरीची जटिलता वाटते. व्यक्ती-व्यक्तीचा संबंध, भावेचे आकर्षण, भूतकाल-वर्तमानकाळाचा संबंध, शरीर व मनाचा संबंध हे सर्व कादंबरीच्या पहिल्या सहा प्रकरणांत (तेहेतीस पानामध्ये) स्पष्ट होतात. ही एक आश्चर्याची गोष्ट आहे. प्रथम प्रकरणात कुमुद आणि रामण्णा समांतर रेषेवरून चालतात. तेव्हासुद्धा त्यांचा एक पाय भूतकाळात तर दुसरा पाय वर्तमानकाळात आहे. स्त्री-पुरुष आकर्षण, इच्छा, त्या इच्छेची अनेक रूपे, प्रेमामध्ये दडलेला द्वेष, द्वेषाच्या अंकुरापासून विकसित प्रेम, त्या दोघांना लग्न करावयास लागणारी घटना, त्यामुळे त्यांच्या विकासातून स्त्रीपुरुषांच्या संबंधाचे एक आणखी रूप सरलाच्या जीवनाच्या पार्श्वभूमीवर उठून दिसते.

दुसऱ्या भागात पुन्हा तीन पात्रे आहेत. प्रत्यक्ष दोन आणि अप्रत्यक्ष एक. प्रथम भागात कुमुद आणि रामण्णांनाजवळ आणणारी सरला ज्याप्रमाणे प्रत्यक्ष तेथे नसून-सुद्धा प्रत्यक्ष दिसते, त्याचप्रमाणे त्यांच्या संबंधाचे फळ मोहनसुद्धा येथे प्रत्यक्ष अप्रत्यक्षच राहतो. आणि सरलाप्रमाणेच मृत्यूचा घास बनतो. येथे श्रीरंग 'काळाचे' एक विशिष्ट रूप दाखवितात. साऱ्या गोष्टी एका तासाभरात घडतात. परंतु ह्यातच दहा वर्षांच्या जीवनाचा चढउतारच नाही, तर कुमुद आणि रामण्णांच्या संघर्षाचे-ही चित्र दिसून येते. देह-मनाचे संबंध-कुमुदचे शरीरच रामण्णांच्या शरीराशी, त्याच्या इच्छेशिवाय प्रेम करू लागते. (ती म्हणते तिला ते त्यानंतरच लागले) संभाषण, भावसंबंध इथे सर्व एका दुपारशी मिळून जातात. 'पतिपत्नींना जोडणारी शृंखला म्हणजे मूल आहे'. मनस्मृतीच्या ह्या कथनाच्या भूमिकेत लेखक, रामण्णा आणि कुमुदच्या संबंधांचे एक नवीन दर्शन घडवितात आणि मोहनचे अस्तित्व आणि मृत्यू दोन्हींचे अर्थ सूचित करतात. इथे येणारी म्हातारी भूत आणि वर्तमानाला पुन्हा पुन्हा एकत्र आणून कुमुदचा दहा वर्षांचा अनुभव जोडून देते.

'अनादी अनंत' च्या काही भागात (रामण्णाचे सरलाच्या फोटोशी बोलणे, मित्राच्या घरी जाणे, त्याने बोलणे — मग अशा प्रसंगी कुमुदची मानसिक स्थिती इत्यादी) असे

वाटते की वर्णन नाटकी आहे. कुठे कुठे असेही वाटते की ही सारी बौद्धिक कसरत आहे. परंतु ही कादंबरी म्हणजे स्त्री–पुरुष संबंधाची जटिलता भाषेच्या द्वारा व्यक्त करणारी एक कृती आहे ह्यात काहीच संशय नाही. केवळ स्मृतीच्या द्वारेच अकरा बारा वर्षांचे जीवन व्यक्त करणारी ही एक विशिष्ट शैली आहे. भौतिक घटना आणि मनाचा व्यापार एकच दाखविला आहे ही ह्या कादंबरीची एक विशेषता.

सत्तर वर्षांचे श्रीरंग आजसुद्धा नवीन नवीन प्रयोग करीत आहेत. त्यांचे प्रयोग सफल होवोत अथवा न होवोत परंतु त्यांनी एक कुतूहल निर्माण केले आहे.

– एल. एस. शेषगिरि राव

" चल, सिनेमाला जायचं ?"

" हूं. . . .ऊं ?"

" सिनेमा नको, तर कुठे बाहेर फिरायला जाऊ या का ?"

उत्तर मिळाले नाही.

"जरा बाहेर पाय मोकळे करून आलीस की बरं वाटेल. घरात बसून बसून कंटाळा नाही का आला तुला ? चल जरा बाहेर."

तिने तोंडावर हात ठेवून जांभई दिली. हेच तिचे उत्तर.

"तर मग तुला कुठंच यायचं नाही. तुझ्यासाठी म्हणून मी मुद्दाम विचारलं. तसं मला खूप लिहायचं काम आहे. चलायचं असलं तर सांग, मी रात्री लेखन करीन. . . काय . . .नाही यायचं ? ठीकय, पण इथे नुसती बसून तरी करणार काय ? मग मी बसतो लिहायला. तसंच जर काही लागलं सवरलं तर मला येऊन सांग."

बोलता बोलताच रामण्णांनी हातातील वर्तमानपत्र फेकलं . . . आणि एक दीर्घ सुस्कारा टाकून ते खुर्चीवरून उठले. दिवसाच्या बारा तासात रामण्णांचा कुमुदशी बोलण्याचा हा शंभरावा किंवा हजारावा प्रयत्न असेल.

असहकाराच्या वातावरणाचा हा काही पहिला किंवा शेवटचा दिवस नव्हता. चार महिने होऊन गेले ह्या गोष्टीला. असा असह्य ताण सहन करण्याची काहीच आवश्यकता नव्हती. कुमुद कोण ? तिचा आणि माझा संबंधच काय ? तिच्यासाठी मी घरात ही स्मशान-शांतता कशासाठी सहन करू ? कुमुदचा संबंध होता--नातं होतं-ते माझ्या बायकोशी, सरलाशी. बिचारी ! सरलाचा तर कुणावरही चटकन् विश्वास बसायचा. कुमुद म्हणे तिच्या मावशीची लेक. ही मावशी कोण, कुठली कुणास ठाऊक ! आपल्याला एक मावशी आहे असं कधी सरलानं म्हटल्याचं आठवत नाही. एकदा आपल्या भावाकडे गेली आणि परत येताना बरोबर कुमुदला घेऊन आली. मावशीची मुलगी म्हणून तिला आपल्या घरी ठेवून घेतलं. . .मावशीच्याबद्दल काही चौकशी करण्याची संधीच कधी मला मिळाली नाही. कारण मावशी वारली होती. असा हा कुमुदचा आमच्या घरात प्रवेश झाला. ही झाली सहा वर्षांपूर्वीची गोष्ट. पण आता

कुमुदचं ते नातं राहिलं नाही. कारण सरलाला जाऊन चार महिने झाले आहेत. सहा वर्षांचा सहवास. त्यातील घनिष्ठता सारं काही आहे पण हा व्यवहार ? हे सारं किती दिवस सहन करायचं ? . . . छे, आता सहन करण्याच्या पलीकडे गेलं आहे. . . . . पण हे तोंडातून न काढता, हातातलं वर्तमानपत्र खुर्चीवर फेकत, रामण्णा म्हणाले– "जर काही लागलं तर मला येऊन सांग . . . विसरू नकोस."

ही सूचना देऊन रामण्णा आपल्या खोलीत निघून गेले.

## २

रामण्णांच्या खोलीचा दरवाजा लागल्याचा आवाज ऐकताच कुमुद स्वत:ला सावरू शकली नाही. तिने विचार केला. . . . रामण्णांना वाईट वाटलं का ? खरं म्हणजे ती रामण्णांना दु:खी करू इच्छीत नव्हती. छे, कधीच नाही. रामण्णांना दु:ख देण्याचा विचार ह्या जन्मी तरी तिच्या डोक्यात येण शक्यच नव्हतं ! त्यांच्यासाठी, ती प्रत्यक्ष मृत्यूलाही आलिंगन द्यायला तयार होती. पण काय करू ? हृदयाला एक वाटतं आणि मन मात्र दुसरीकडंच भरकटतंय ! हृदयाला रामण्णांचं साहचर्य हवंय. तर मनाला त्यांची साधी चेष्टाही सहन होत नाही. असं का ? कुमुदला हेच समजत नव्हतं . . . . पण आहे हे असेच आहे. कुमुद अगदी बेचैन दिसत होती. सरलाताईच्या मृत्यूचा तिच्या मनावर एक प्रकारचा आघात झाला होता. तिला सारखं वाटत होतं, माझ्यासारख्या बारा वर्षांच्या अनाथ मुलीला आपल्या घरी आणून, मला प्रेमानं जिनं वाढवली. त्या सरलाताईच्या मृत्यु मुळेच कां हे सारं झालं ? मग रामण्णांची स्थिती माझ्यासारखी कां नाही झाली ? आपल्या आवडत्या पत्नीच्या मरणाचे दु:ख पतीला जितके होईल तितके मला होऊ शकेल ? हे स्वाभाविक आहे का ?

तिच्या मनात कित्येकदा असे संशयाचे जाळे पसरे. रामण्णांच्या समोर बसून बोलणं– गप्पा मारणं. . . . तिला किती अवघड वाटे. परंतु रामण्णा तिथून निघून गेले की ती वेडी होऊन जाई. म्हणूनच दरवाज्याचा आवाज ऐकताच तिला जरा दु:खही झाल.... पण लगेच तिला हसूही आलं ! हे अंतरंगाचे गूढ रहस्य होते. हृदयाच्या आकाशात ढगांची गर्जना आधी ऐकायला आली आणि मग वीज चमकू लागली. हसत हसतच ती त्या बंद दरवाजाकडे पाहू लागली. पाहता पाहताचतय सुखाचा अनुभव पचवून

टाकण्यासाठी तिने आपले डोळे मिटून घेतले. सूर्यप्रकाशात पडणाऱ्या पावसाच्या थेंबाप्रमाणे तिच्या त्या हसऱ्या चेहेऱ्यावर बंद करून घेतलेल्या डोळ्यांतून अश्रूधारा वाहू लागल्या. तिचे हे सुख ? का दु:ख ? तिला काहीच उमगेना. किंवा विचारांच्या पलीकडे एक अलौकिक सुखाचा अनुभव तिला मिळाला म्हणून तिचा चेहरा आनंदाने नुसता मोहरून निघाला होता डोळे मिटून घेतल्यावर कुमुदला तर एका अलौकिक आनंदाचा जणू ठेवाच मिळाला. आज, डोळे मिटल्यामिटल्या कुमुदच्या डोळ्यांसमोर जुन्या आठवणींचा चित्रपट उभा राहिला. तेव्हासुद्धा रामण्णांच्या खोलीचा दरवाजा बंदच होता. त्यावेळी ती बारा वर्षांची होती. पहिल्यांदाच सरलाताईबरोबर इथे आली होती. आगगाडीच्या डब्यात बसल्यावर खिडकीतून दिसणारी बाहेरची सृष्टि-शोभा .मागे मागे जोराने पळत जाणारी झाडे .डोंगर. . .! तिला ते सारं "राजा देखो .रानी देखो" सिनेमासारखेच वाटले. तिला 'त्यां' ना पाहायची उत्सुकता होती. सरलाताई तर एकसारखं त्यांच्याबद्दल काही काही सांगत होतीच. मधूनच विचारायची "कुमुद लक्षात आलं ना तुझ्या ?" म्हणून तिच्या बोलण्याकडे लक्ष द्यायलाच हवं होतं आणि त्या बोलण्याचा विषय कोणता ? संबंध प्रवासभर बोलण्याचा एकच विषय– रामण्णांची प्रशंसा. एकसारखं म्हणायची . . ते असं म्हणतात. . . ते तसं म्हणतात ! सरलाताईनी गंभीर मुद्रा धारण करून तिला अगदी स्पष्ट शब्दात सांगितलं होतं. . . "ते लेखक आहेत बरं का ? त्यांचा स्वभाव जरा विचित्र आहे. लहरी आहे. तुझी चेष्टा वगैरे करतील तर रडायचं नाही बरं का !"

आज सरलाताईचा तो चेहरा आठवला की हसू येते. तिने आणखी बजावून सांगितलं होतं. . . "आणखी एक गोष्ट ध्यानात ठेव. त्यांनी तुझी चेष्टा केली तरी तू नाही हं त्यांची चेष्टा करायची . . .ते एकदम चिडतील. रागावतील. कारण त्यांची लहर केव्हा कशी असेल ते काही सांगता येत नाही बघ."

हे सर्व ऐकल्यावर तर कुमुदची रामण्णांना पाहण्याची उत्सुकता अगदी शिगेला पोचली.

स्टेशनवरून ती आणि सरलाताई घरी आल्या. दरवाजा उघडाच दिसला. आत कोणीच दिसले नाही. तरीसुद्धा सरलाताई शांतपणे तिला सांगू लागली– "ए, लवकर हात पाय धुवून घे. मी चहा करते. खोलीचा दरवाजा लागलेला आहे म्हणजे ते आतमध्ये लिहीत बसलेले असतील. आवाज करू नकोस हं . . .चहा तयार झाल्यावर ते येतील !"

कुमुद तरीसुद्धा स्वत:ला सावरू शकली नाही. खोलीच्या दरवाज्यातून. . . . थोड्याशा फटीतून आत डोकावू लागली. किती वेळ ती तशीच पाहत उभी राहिली

कुणास ठाऊक. खोलीतून एकदम आवाज आला "सरला !". . .आणि त्याच क्षणी दरवाजा धाडकन् उघडला. आणि रामण्णा तिच्यासमोर उभे ! काय करावं, कुमुदला काहीच समजेना. ती पुतळ्यासारखी स्तब्ध उभी राहिली.

"सॉरी, सरला. थोडसंच पुरं करायचं राहिलं होतं तेवढं लिहून टाकलं !"

बोलता बोलताच त्यांनी दोन्ही हातांनी माझे खांदे पकडून म्हटले– "सरला, बघ. ह्या पुस्तकाने माझे सारे जीवनच बदलून जाईल. तू वाच सरला म्हणजे तुला कळेल. सरला, तुझा हात माझ्या हातांत दे ! आज तुझा नवरा एक थोर साहित्यकार झाला. . . .महान लेखक झाला. बोलता बोलताच त्यांनी माझे खांदे, आपल्या मजबूत मुठींनी दाबून टाकले !"

तेवढ्यात सरलाताई आतून येत म्हणाली–

"लेखन संपलं ?"

रामण्णा दचकलेच. माझ्यापासून दूर होत म्हणाले–

"अरेच्या, ही मुलगी कोण ? तरीच मला वाटलं, सरला इतकी बारीक कशी झाली ? भावाच्या घरी जेवायला मिळालं नाही म्हणून म्हटलं, एवढी वाळली असेल. कुणास ठाऊक !" . . बोलता बोलता ते स्वतःच्या फजितीवर स्वतःच हसू लागले.

परंतु जी घटना घडली त्यापेक्षा जो अनुभव आला तो कुमुद कधीच विसरू शकली नाही. रामण्णांच्या बाहूंचा तो स्पर्श ······का कुणास ठाऊक, शरीर थरथरत होतं. पण मन, पोटभर खायला मिळाल्यानंतर येणाऱ्या गाढ निद्रेसारखं सुखात डुबत होतं ! आज ह्या सहा वर्षांत जितक्या वेळा ती ह्या बंद दरवाज्याकडे पाहते तेव्हा तिला त्या दिवसाची ती सुखद आठवण येते आणि ती डोळे मिटून घेते. आतासुद्धा डोळे मिटून घेता घेता क्षणभर ती सुखाची किरणे तिच्या चेहेऱ्यावर चमकत आहेत. अश्रू वहात आहेत. ह्या अश्रूंचे कारण सुख ? का दुःख ? तिला काहीच कळेना. आता हृदयात काहूर माजलं आहे. तिने लगेच तोंड पुसले. डोळे उघडून, घाबरतच इकडे तिकडे पाहिले. खोलीचा दरवाजा अजून बंदच होता. तिला धीर आला. एक दीर्घ सुस्कारा टाकून तिने एक पुस्तक वाचायला घेतले.

## २

जेवणखाणं लवकरच आटोपलं होतं. सिनेमाला जाण्याचा बेत रद्द झाला होता. लेखन करायचं म्हणून दरवाजा बंद करून घेतल्यामुळे आता बाहेरही सटकता येत

नव्हतं म्हणून शिकारी कुत्र्यांपासून जीव वाचविण्यासाठी बिळांत लपणाऱ्या सशासारखे रामण्णा, टेबलखुर्चीच्या मध्ये दडून बसले होते. शेवटी टेबलावर कोपरं टेकून आणि हातात डोके पकडून आकाशाकडे पाहण्याचा प्रयत्न करणाऱ्याप्रमाणे ते समोरच्या भिंतीकडे पाहू लागले. त्या भिंतीवर टांगलेला सरलाचा फोटो त्यांना दिसला. शुद्धीत आल्यासारखे करून त्यांनी त्या फोटोकडे पुन्हा एकदा नीट निरखून पाहिले. हे काय ? सरलाचे ओठ हलत आहेत ? मी लिहू शकत नाही. माझी ही अवस्था पाहून सरला, तू मंदस्मित करीत आहेस ? सरला, मी हे कसं लिहू ? तुला सारं सारं माहीत आहे. आणि तरीसुद्धा तू हसत आहेस ?

बोलता बोलता रामण्णांनी एखाद्या हट्टी मुलासारखा दीर्घ सुस्कारा सोडला. पत्नीचा फोटो पाहून रामण्णांनी असा दुःखाचा सुस्कारा सोडला नाही, असे कधीच झाले नाही. त्यांच्या साऱ्या लेखनाची पद्धती सरलाला माहीत होती. इतकंच काय, सरलाच त्यांच्या लेखनामागची प्रेरणा होती.

रामण्णा म्हणत– " सरला, मी लिहायला बसणार आहे !" तेव्हा सरला विचारायची– " कथा, कादंबरी, नाटक काय लिहिणार आपण ?"

" वा ! वा ! तुला काय वाटलं, लिहायचं म्हणजे एखाद्या मुनीमजीसारखा रिपोर्ट किंवा हिशेब ठेवायचा की काय ?" रामण्णा गरजत !

" असं नाही हो. काल तुम्ही सांगत होता ना, त्याची कादंबरी लिहिणार का नाटक लिहिणार असं मला विचारायचं होतं हो !"

तेव्हा रामण्णांना आठवायचं . . काय लिहायचंय बरं ! पण बायकोसमोर तो पराभव कसा स्वीकारायचा ? तेव्हा जरा रागातच ते म्हणत,

अग वेडाबाई, नाटक लिहिणार म्हणून सांगितलं नाही का तुला ?"

" तुम्हीच, सांगत होता नाटक लिहिलं तर अभिनयाने सगळंच काही व्यक्त होत नाही म्हणून विचारलं हो . .की कादंबरी लिहिणार का ?"

काय मजा आहे. नाटक लिहिणार म्हणून मी कधीच म्हटलं नव्हतं. सगळीच थाप होती. नाटकात सारं व्यक्त करता येत नाही, सरलाच्या ह्या म्हणण्यातही काहीच तथ्य नव्हतं. . पण मी कुणाकडेच लक्ष दिलं नाही.

" अग, म्हणून तर काल लिहिणं सुरू केलं नाही. कालच ठरवलं की कादंबरीच लिहायची. आता आजपासून सुरू ! "

" अय्या ! तुम्ही कादंबरी लिहिणार ? बोलता बोलताच सरलाचा चेहेरा किती आनंदित झाला. तिच्या टपोऱ्या डोळ्यातून आनंद नुसता ओसंडून जात होता. तिचा तो आनंद, अभिमान पाहून रामण्णांनी निश्चय केला–

"हो कादंबरीच लिहायची !"

"सरला, तूच माझी स्फूर्ती होतीस!" रामण्णांनी सरलाच्या फोटोकडे पाहून म्हटले.

अशा एक दोन गोष्टीतच नाही, तर दुसऱ्या कितीतरी बाबतीत रामण्णांना सरलाची मदत मिळायचीं. कधी कधी काही भाग लिहून झाला नाही . म्हटलं की ती हिरमुसली होऊन जायची. कधी तिच्याच सल्ल्याने ते कथानकाची दिशा बदलून टाकायचे. पुस्तक पूर्ण झाल्यावर ते पुन्हा तिला सारी कथा ऐकवयाचे. "हं, आता, पुढे काही लिहायचं नाही बरं का . .आता शेवट असाच ठेवायचा बरं !" बोलतां बोलतांच ती हर्षातिशयानं लहान मुलासारख्या टाळ्या वाजवी.

"वा ! माझ्या सहवासाने तूसुद्धा साहित्यकार झालीस बघ !" बोलतां बोलतां रामण्णा तिची पाठ थोपटीत. . आणि मग आपल्या खोलीत जाऊन तिच्या सल्ल्यानेच गोष्टीचा शेवट करायचे. पण सरलाचं म्हणणं आपण ऐकलं असे मात्र त्यांनी कधीच कबूल केले नाही. चहा, जेवणाच्या वेळी मात्र अगदी आवर्जून म्हणायचे–

"तू जसं म्हणालीस तसंच लिहिलं बघ. हे बघ, तसाच शेवट केला त्या कथेचा !" आणि मग मोठ्या अभिमानाने रामण्णा तिला आपली कथा वाचून दाखवीत.

"सरला, मी तुला काही फसवत नव्हतो ग ! मी एखाद्या लहान पोरासारखा वागत होतो. माझ्या जीवनाला बाल्यकाळाची झालर द्यायला आता कोणी नाही सरला ! मी पोरका झालो आहे. पोरका झालो आहे. कसं मी लिहू आता ?" रामण्णांनी सरलाच्या फोटोजवळ आपली व्यथा सांगितली.

बसल्या बसल्या रामण्णा कंटाळून वैतागून गेले. विचार केला. .....एकटंच सिनेमाला जाऊन बसावं ! बापरे ! ही आणखी एक कटकट मागे ! छे, चुकलंच आपलं. ह्या मुलीला इतकं जवळ येऊ द्यायला नको होतं. मग काय, तिला घरातून हाकलून द्यायचं ? कुठे जाईल ती ? लोकांची तोंडं बंद करता येतील का ? . सारी जणं म्हणतील– "बायको गेल्यावर रामण्णाने त्या बिचाऱ्या अनाथ पोरीला बाहेर काढलं !"

आता मरेपर्यंत ह्या मुलीची पीडा सुटणार नाही. कुमुदबरोबर आपलं लग्न कधी होणार नाही ह्याची रामण्णांना खात्री होती. जेव्हा सरलानं अंथरूण धरलं तेव्हाच लोकांची फुसफूस सुरू झाली. शेवटी हे सारं रामण्णांच्या कानावर पडलंच ! कुमुदच्या आणि त्यांच्या संबंधाबद्दल लोकांच्या मनात काहीतरी काळंबेरं होतं हा रामण्णांना एक नवीनच अनुभव होता.

"सरला, ही तुझीच चूक !"

रामण्णांनी सरलाच्या फोटोला सांगून टाकले. एकदम त्यांचे सारे शरीर थरारून निघाले. त्यांना एकदम भास झाला. फोटोतील सरला बोलू लागली–

"तुम्ही कुमुदशी लग्न का नाही करीत ?" "कुमुदशी लग्न ? छी ! आज हे भूत कुठून डोक्यात शिरलं ? अशक्य ! कुमुदशी लग्न ? अशक्य !"

"सरला तुला माहीत आहे. आपण दोघे एकमेकांवर किती प्रेम करीत होतो. जणू दोन शरीरे पण एक प्राण. . .आज तू देहाने माझ्यापासून दूर झालीस म्हणून काय झालं ? तू माझीच आहेस. जोपर्यंत मी जिवंत आहे तोपर्यंत तू माझ्याबरोबरच राहशील. अशा स्थितीत इथे दुसऱ्या कुणाला स्थानच कुठे आहे ? कुमुदशी माझे लग्न होणे अशक्य. कुमुदशीच काय, दुसऱ्या कुणाशीही माझे लग्न होणार नाही."

विचारांच्या आवेगाने रामण्णांचे डोळे भरून आले. आपला आवेग कमी करण्यासाठी ते पुन्हा सरलाच्या फोटोला सांगू लागले.

"सरला, पण ही सारी तुझीच चूक नाही का ?" रामण्णांना सारं नीट समजत होतं. आपण शांत मनःस्थितीत असतो तर असं काहीच केलं नसतं ! दुसऱ्यांवर दोष द्यायचा म्हणजे स्वतःच्याच कमजोरपणाचं लक्षण नव्हे का ? पण तसं पाहिलं गेलं तर इथे चूक कोणाची आहे ? कुणाचीच नाही. सारे आपोआपच घडून आले. . . . .अनुकूल झालं तर बरोबर. नाहीतर चूक.

"भ्रामयन् सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया" ।

हे गीतेत सांगितलं नाही का ? प्रत्येकाच्या हृदयात परमेश्वर आहे. आणि तोच सर्व प्राणीमात्रांना नाचवितो. इथं परमेश्वर नाही. तरीसुद्धा एक कोणतीतरी आंतरिक शक्ती आहे.

"प्रवालशोभा इव पादपाना शृंगारचेष्टा विविधा बभूव" कालिदासाचे हे वचन किती सार्थ आहे. झाडावर कोवळी कोवळी पालवी फुटते. हे जितकं स्वाभाविक तितकीच मनुष्यप्राण्यांची शृंगार-साधना स्वाभाविक आहे. छे ! हा एक आत्मसमर्थनाचाच प्रकार आहे. दुर्बलपणाच आहे. . . . .

रामण्णांनी विचारचक्र तेथेच थांबविले. पण तरीसुद्धा. . . .चूक सरलाचीच आहे हा विचार त्यांच्या मनातून जाईना. सरलाच्या फोटोकडे पाहून रामण्णा पुन्हा विचारांच्या जाळ्यात अडकले.

खरं म्हणजे त्या दिवशी जे घडलं, ते काही तसं विशेष महत्वाचं नव्हतं. तसं व्हायला नको होतं पण अचानक घडून आलं !

जवळ जवळ दोन अडीच वर्षापूर्वीची घटना आहे. बिचारी सरला ! तीन वर्षे मृत्युशय्येवर खितपत पडणाऱ्या पत्नीवर ही चूक लादणे खरं म्हणजे अयोग्यच आहे... चूक लादण्याचा प्रश्न नाही. पण जी घटना घडली ती तर लक्षात घ्यायला हवी ना ! विचार करता करता रामण्णा स्वतःच स्वतःचे सांत्वन करू लागले.

त्या दिवशी सरला अंथरुणावर तक्क्याला टेकून बसली होती. जवळच कुमुद बसली होती. रामण्णा बाहेरून आले. तसेच ते सरलाच्या बिछान्याकडे धावले आणि तिच्या शेजारी बसून त्यांनी विचारले,

"आज पण ताप आला का ?"

सरलाने हसतच मानेने नाही म्हणून सांगितले. पण तरी सुद्धा रामण्णांना राहवले नाही.

"आता तर ताप नाही ना ? बघू !" बोलता बोलताच चादरीखाली हात घालून सरलाच्या शरीराला स्पर्श केला. त्याचवेळी कुमुद पण सरलाच्या शरीराला हात लावून ताप बघत होती. एकदम दोघांच्या हातांची टक्कर झाली. क्षणभर रामण्णा अवाक् झाले. ज्या हाताला त्यांनी स्पर्श केला होता तो घामाने डबडबलेला होता. त्यांनी कुमुदकडे नजर टाकली. तिने त्यांच्याकडे निराश चेहऱ्याने पाहिले. रामण्णांनीच सर्व सांभाळून घेतलं.

"ताप नाही ! घाम आलेला दिसतोय !" आणि मग सरलाला विचारले– "काय, मग घाम आल्यावर ताप पुन्हा चढला नाही ना ! सरलाचा चेहरा फुलला. दुखण्याने ती अशक्त झाली होती. त्यामुळे ती आणखीच नाजुक दिसत होती. हसत हसतच ती म्हणाली– "अहो, ताप मुळीच नाही. मी तुम्हाला आधीच नाही का म्हटलं ?"

सरलाच्या बोलण्यावरून, तिच्या हसण्यावरून, रामण्णांना थोडासा संशय वाटला. सरलाला काही कळलं ? निमिषार्धात जी घटना घडली....त्यामुळे दोघेही अवाक् झाले. ह्या अशा विचित्र घटनेचा सरलाच्या मनावर काय परिणाम होईल ? कदाचित् तिच्या लक्षातही आलं असेल. खरं म्हणजे सरलानेच आधीच जागरुक राहायला पाहिजे होतं ! सावधान राहायला पाहिजे होतं. आजच्या ह्या स्थितीला खरं म्हणजे सरलाच जबाबदार आहे.

"कळलं, तुला सरला ? तू मला कां वाचवलं नाहीस ?" रामण्णा फोटोतील सरलाला समजावून सांगू लागले.

बाहेर जाता येत नाही. लेखनात ही मन लागत नाही. लिहायला काही सुचतही नाही. डोळ्यासमोर सरलाची प्रतिमा असली म्हणजे दुसऱ्या कोणाची आठवणच राहत

नाही. फक्त सरलाची स्मृती ! आतां काय करायचं ? विचारांच्या ओघात रामण्णा जरा रागातच खुर्चीवरून उठले. त्यांनी घड्याळाकडे पाहिले. आताशी कुठे साडेआठ वाजलेत ! झोपण्याची वेळ तरी कुठे झालीय ? झोपण्याचा विचार मनात येताच रामण्णा पुन्हा फोटोकडे वळून धीमेपणाने, हळू आवाजात म्हणाले,

"सरला, तुझाच सारा दोष आहे !"

बडबडतच रामण्णा पुन्हा खुर्चीत कोसळले.

४

कुमुदने एक दीर्घ सुस्कारा सोडला. पुस्तक हातात होतं पण मन कुठल्याकुठे भटकटत होते. ती विचार करू लागली.... आता कुठे जावे ? आजकाल कुठे जायलाही तिचे मन तयार होत नव्हतं ! ती कुठे गेली की बायकांची बोलणी एकदम बंद होत. आणि मग खोटं खोटं हसून त्या तिचे स्वागत करीत. कुमुदच्या चटकन् लक्षात येई की आपल्याबद्दलच सगळ्यांची चर्चा चालू होती. आणि ते तसे स्वाभाविकच होते. किती जरी वाटलं, आपल्यावर टीका व्हायला नको तरी लोकांची का धरता येतात ? काही का असेना पण बाहेर जायला तिच मन विशेष उत्सुक दिसलं नाही. पुन्हा रात्रीचे साडेआठ वाजून गेले होते बाहेर पडण अशक्यच. जेवणखाणं तर आटोपली होतीच. आता झोपायचंच ! झोपेचा विचार येताच कुमुदचे सारे शरीर थरथरून निघाले. चेहेरा घामाने नुसता डबडबून निघाला. आज दोन वर्षे झाली कुमुद आणि रामण्णा एकत्र झोपत आहेत. किती फसवणूक. विचारी सरलाताई अंथरुणाला खिळून होती. दुखण्यातून तो वाचणं कठीणच होत. असाच एके दिवशी रामण्णांच्या हाताचा स्पर्श कुमुदच्या हाताला झाला आणि नकळतच सार घडून आलं. सुरवाती सुरवातीला तर कुमुदला कळल ही नाही की हे कसं आणि काय झालं ? ती सुखाच्या सुंदर स्वप्नात मग्न होती. हाताचा हाताला स्पर्श झाल्यावर जो एक बेहोषी आली होती तो अजून उतरली नव्हती. तिच्या साऱ्या शरीराचा नुसता थरकाप झाला. त्यावेळी रामण्णांच्या आगमनाची ती किती उत्सुकतेने वाट पाहायची. त्यांच्याजवळ झोपण्याचा तो आनंद कुठे ? आणि आज रामण्णांच्या शेजारी...पडून रात्रभर झोपेची वाट पाहण्याचे हे दुःख कोठे ?...परंतु आजच्या ह्या जीवघेण्या दुःखातही कुमुद त्या दिवसांच्या सुखद आठवणी विसरू शकली नाही ! दिवसाढवळ्या जरी त्या आठवणी आल्या तरी तिच्या

शरीरावर भीतीचा काटा उभा राही. त्यावेळी तर कुमुदला वाटलं होतं की ह्या सुखद अनुभवानंतर मी मरून गेले असते तरी माझ्या जीवनाचं सार्थक झालं असतं ! जीवन–मृत्यु ? त्या क्षणाला तर तिला उमगलेच नाही– आपण जीवंत आहोत की मरून गेलो आहोत. साऱ्या अंगभर सुखाचा काटा उभा राहृत होता. मांड्या थरथरत होत्या. छाती धडधडत होती. केवढी नवी अनुभूती होती. लाजेने ती फुलून गेली होती. साऱ्या अंगभर...विशेषत: तिच्या स्तनामध्ये तर एक सुखद संवेदना होत होती. त्या दिवसापासून ती रामण्णांची झाली होती. शरीराने नाही. मनाने ! ज्याने केवळ हस्तस्पर्शाने तिच्या शरीराला नवचैतन्य दिलं होतं, त्याला आपला देह अर्पण करण्यात कोणती अडचण होती ?

कधी कधी कुमुदला फार आश्चर्य वाटे. हे सगळं कसं झालं ? सरलाताई अंथरुणाला खिळून राहिल्यामुळे ? का मी ह्या घरात आल्यामुळे ? का केवळ त्यांच्या स्पर्शाने ? सरलाताईच्या घरी आल्यावर आपला आणि त्यांचा हाताला हात लागला...! ह्या साऱ्या घटनांची आधीच योजना झाली होती का ? रामण्णांनी आपल्याला सांगितलेली दुष्यंत – शकुंतलेच्या कथेसारखीच आपली ही कथा आहे. कुठे तो राजधानीत राहणारा राजा ? कुठे ही वनकन्या ? कण्व ऋषी आश्रमात नव्हते तेव्हाच राजा दुष्यंत तेथे कसा आला ? हे सारं पाहिल्यावर वाटत की दुष्यंत-शकुंतलामीलनाच्या मागे दैवाचा हात होता. माझ्यासारख्या अनाथ मुलीचेसुद्धा हे केवढे मोठे भाग्य नाही का ? माझ्या आणि रामण्णांमध्ये प्रेमाचा अंकुर उगवणे कठीण का आहे ? पंधरा–सोळा वर्षांच्या कुमुदला हे कोडे उलगडले नाही पण तिच्या मनात केवढा कोलाहल निर्माण झाला !

हळू हळू दोघांचे प्रेमप्रकरण सुरू झाले. कुमुदची प्रकृती खालावली तिचा चेहेरा मलूल दिसू लागला.

कधी कधी सरला रामण्णांना म्हणायची–

"बिचारी पोरगी माझ्याबरोबर एकसारखी घरात बसून बसून कटाळून गेली असेल. किती सुकलीय. अहो, तुम्ही हिला जरा बाहेरून फिरून आणा की !"

हे ऐकून कुमुद लाजून लाजून लाल होऊन जाई. रामण्णा काहीच उत्तर देत नाहीत हे पाहून तर तिला वाटे, धरतीमातेने आपल्याला समावून घ्यावे... थोड्या वेळाने रामण्णा म्हणाले.. "बरं..!"

पहिल्या प्रथम ती रामण्णांबरोबर बाहेर फिरायला गेली ती तर एक अविस्मरणीय अनुभूती होती. त्यांच्याबरोबर बाहेर जाण्यास ती किती उत्सुक होती ! पण झालं काय ? घरातून बाहेर पडल्यापासून ते पुन्हा घरी परत येईपर्यंत तिच्या ओठातून एक शब्दही बाहेर पडला नाही.

"सरला, तुझी ही बहीण मुकी आहे की बहिरी! तुला तरी माहीत आहे की नाही?

रामण्णांचे बोलणे ऐकून ती तेथून सटकली आणि आपल्या खोलीत जाऊन ओक्सा-बोक्सी रडू लागली. सारे काही घडले एखाद्या गोष्टीतल्यासारखेच.

"अहो, तिला फिरायला घेऊन गेलात माझं ऐकून ते खरं हो, पण तुम्ही माझ्या बहिणीला रडवलंत का हो? फार छान!"

सरलाचे बोलणे ऐकून रामण्णा कुमुदच्या खोलीत गेले.

"अरेच्या खरंच तू रडत आहेस? वेडी कुठली!" तिच्या चेहेऱ्याकडे पाहत रामण्णा म्हणाले आणि मग तिच्या पाठीवर हात फिरवून तिला समजावू लागले. कुमुदच्या मनावर दुःखाचा केवढा भार होता पण तिची पाठ हर्षानं फुलून गेली होती. अश्रू तर थांबले नव्हतेच... तेव्हा रामण्णा म्हणाले,

"चल, खाली चल बघू. डोळे पूस!" बोलता बोलता त्यांनी तिचा पदर हातात घेतला. कुमुद लाजून दूर झाली. ह्यावेळी त्यांच्या हाताचा स्पर्श छातीला झाला. तेव्हा तर कुमुदला वाटले की आपल्या पायातील सारी शक्ती निघून गेली आहे. तिला काहीच उमगेना! सुचेना! तिला वाटलं आता आपण घेरी येऊन कोसळणार. काहीच आठवेना. जेव्हा ती शुद्धीवर आली तेव्हा तिला कळलं की आपण पलंगावर बसलो आहोत. रामण्णा आपल्या शेजारीं बसले आहेत आणि त्यांच्या हातात पाण्याचं भांडं आहे.

बिचारी! सरलाची तरी काय चूक होती? कुमुदची प्रकृती तिला जरा नीट वाटली नाही म्हणून ती कुमुदला रामण्णांच्या बरोबर बाहेर फिरायला जायला, सिनेमाला जायला, पुस्तके वाचायला उत्तेजन देई.

सरला सारखं म्हणायची—"मी इथे अंथरुणावर पडलेली. तू कशाला ह्या घरात खितपत पडतेस? तासभर चांगली फिरून ये. मी काही लवकर मरत नाही बघ." ते काही असो. पण जेव्हा कुमुदला रामण्णांच्या बरोबर बाहेर जाण्याची संधी मिळायची तेव्हा तिला तसा आनंद व्हायचाच नाही. एक प्रकारची विचित्र टोचणी तिच्या मनाला लागे. सुरुवाती सुरुवातीला रामण्णा जवळ नसले की कुमुद अगदी बेचैन होऊन जायची. आता ते जवळ आले की ती बेचैन होऊ लागली. कधी कधी तिला वाटायचं, एकदम धावत जाऊन रामण्णांचे दोन्ही गाल हातात पकडावेत! त्यांच्या अस्ताव्यस्त केसांचा छानसा भांग पाडावा. ते लिहीत असताना त्यांचा हात पकडून, त्यांनी आपल्या स्वतःच्या गालावर चापट्या मारून घ्याव्यात. ह्या साऱ्या भावना उसळून येत. त्यांना रोकणं तिच्या हातात नव्हतं! कधी कधी स्वतःला ताब्यात ठेवता ठेवता ती अगदी निराश होऊन जाई.

एक दिवस कुमुद आणि रामण्णा सरलाच्या जवळच बसले होते. थोड्या वेळाने सरलाताईचा डोळा लागला. तेव्हा रामण्णांनी हळूच कुमुदला म्हटलं..

"खोलीत चल. आवाज न करता !"

सरलाताईची झोपमोड होईल म्हणून रामण्णा कदाचित् इतके हळू कुजबुजले असतील. पण त्यांचा तो हळूवार आवाज ऐकून कुमुदच्या अंगावर काटा उभा राहिला. नकळत तिची पावले रामण्णांच्या खोलीकडे वळली. रामण्णांना जरा आश्चर्य वाटले.

"तुला वाचायला काही पुस्तक हवे का ?" रामण्णांनी विचारले.

"हूं" तिने उत्तर दिले.

"कोणतं पाहिजे ? काढून देऊ ? तू पहा..कोणतं हवे ते ?"

पुस्तकांचं कपाट उघडून, कुमुद पुस्तकं शोधू लागली. कपाटातून पुस्तक काढायची, पुन्हा ठेवून द्यायची. कोणतं पुस्तक निवडावं ते तिचं तिलाच कळत नव्हतं !

"का, पुस्तक मिळत नाही ?" रामण्णांनी विचारले.

"कोणतं ? कुठे?" कुमुदने वेड्यासारखाच काहीतरी प्रश्न विचारला.

रामण्णा हसू लागले.

"अच्छा, मीच काढून देतो बघ !" बोलतां बोलतांच रामण्णा कपाटाजवळ आले. कपाटाच्या दोन दारांच्यामध्ये ती उभी होती. तिथेच तिला रामण्णांसाठी जागा द्यावी लागली. रामण्णा जवळ आले तशी जणू काही तिच्या पायातून सारी ताकतच निघून गेली. तिला तेथून निसटताही येईना. रामण्णा जवळ आहेत हेही तिच्या लक्षात राहिले नाही. रामण्णांचा गरम श्वास तिच्या खांद्याला स्पर्श करीत होता. ते तिच्या अगदी जवळ होते. अगदी सटकूनच उभे होते. रामण्णांचा श्वास खांद्यालाच स्पर्शून जात नव्हता तर तिच्या हृदयाला आग लावून गेला. तिला काहीच सुचेना. सारेच असह्य झाले होते. श्वास सुद्धा घुसमटू लागला. बुडणारा माणूस वर येऊन श्वासोच्छ्वासासाठी झटापट करतो...तसेच तिने श्वास घेण्यासाठी तोंड पुस्तकांकडे केले.

"हे हवे ?" रामण्णांनी विचारले.

तिने तोंड उघडले. पण तिच्या तोंडातून शब्द बाहेरच फुटेना. समोर उभे असलेल्या रामण्णांकडे ती पहातच राहिली. तिचा चेहरा पांढराफट्ट पडला. तिच्या चेहऱ्यावर आश्चर्याचा भाव नव्हता. भीतीचा मागमूसही नव्हता. सारं काही तिच्या ध्यानात आलं ! इतक्यात रामण्णांनी तिला आपल्या बाहुपाशात घेतलं आणि तिच्या

ओठांच्या पाकळ्यांवर आपले ओठ टेकले. तिला वाटलं आपला श्वास घुसमटत आहे. आणि तरी सुद्धा तिच्या शरीरात एक नवीन चेतना संचारली.

## ५

"छे! काही लिहून होत नाही! झोप लागत नाही. झालंय काय आपल्याला?"

त्या दिवसांची आठवण विसरलीच जात नाही. आतां खरं तर ही एक सारी जुनी कथा झाली आहे. तीन वर्षांपूर्वीचा हा सारा अनुभव. तेव्हा लेखनाला आतून स्फूर्ती होती. लेखन म्हणजे एक नवा अभ्यास वाटत होता. वर्तमानपत्रासाठी लेख लिहिण्याचाही केवढा उत्साह होता. (वर्तमानपत्री लेखनाला स्फूर्तीची तशी आवश्यकता नसतेच) केवढं लिहून व्हायचं!

लिहून लिहून शरीर, मेंदू थकून गेला की सरलाच्या जवळ झोपण्याची सुखद आशा होती. खाऊ मिळेल ह्या आशेने लहान मुले जशी कामं करतात त्याचप्रमाणे रामण्णा सरलाच्या सहवासाच्या आशेने लिहीत, लेखन समाप्त झाल्यावर खुर्चीवरून उठून रामण्णा बिछान्याकडे जात. रात्र केवढी उलटलेली. लिहून लिहून रामण्णा पूर्ण थकलेले. विचार करून मेंदू शिणून गेलेला. धडपडत बिछान्याकडे जाऊन ते इकडे तिकडे चाचपडीत (बिचारी सरला तर केव्हाच गाढ झोपून गेलेली).

तशीच अर्धवट झोपेत सरला विचारी—

"लिहिणं संपलं तुमचं?" तेव्हा रामण्णांना वाटे......सारा थकवा कुठल्या कुठे पार पळून गेला. सुखाचा केवढा विलक्षण अनुभव! डोळ्यांवर येणारी झोपसुद्धा उडून जाई.

"लिहिणं झालं तुमचं?" नवऱ्याला झोपायला जागा करून देण्यासाठी जरा बाजूला सरकतांना सरला पुन्हा विचारायची.

"हूं" रामण्णा म्हणत.

"झोप आली का?"

"होय."

"माझं ऐकणार का? तुम्ही साहित्याच्या जगातून ह्या जगात आलात का?"

"ऐकतोय ना. माझे लेखन संपले. हूं नाही का केले." बोलता बोलताच रामण्णांनी ताणून दिली.

"गोष्ट जमली का ?"

"गोष्ट नाही लिहिली. मासिकासाठी लेख लिहित होतो."

"अय्या ! एका लेखासाठी एवढं मध्यरात्रीपर्यंत जागरण !"

"मग? हेच तर खरं लेखन. झटपट पैसा मिळतो."

"इथे कुणाला एवढा पैसा हवाय हो ?"

"मला हवाय !"

"अगोबाई ! आपलं डोकं असं केव्हा धावू लागलं ?"

"अग मला म्हणजे माझ्या बायकोसाठी, माझ्या मुलांसाठी मला पैसा नको ?"

"त्यांना पैसा पाहिजे हे तुम्हाला कुणी सांगितलं ?"

"हे काय कुणी सांगायला पाहिजे ? आपली बायको आणि मुले ह्यांना सुख मिळणार नसेल तर तो नवरा कशासाठी लिहील ? हो म्हणणार की नाही ?"

"अहो, लेखन का आपल्या हातातील गोष्ट आहे ? देवानं जन्माला घातल्यावर परमेश्वराने प्रत्येकाच्या माथी त्याचं भविष्य लिहून ठेवलंय !"

"वा ! म्हणजे मग तू सुखी आहेस तर ?"

"कां नाही ? लेखनाने तुम्हाला सुख मिळतं ना. तुमचं सुख तेच माझं सुख !"

"छान ! ह्याचा अर्थ असा की, कृष्ण अर्जुनाला गीतेचा उपदेश करीत होते तेव्हा तू त्यांच्या रथाच्या खाली लपून बसली होतीस. काय खरं की नाही ?"

ह्यावर सरला जांभई देई. "चला आता मला झोप येत आहे. तुम्ही पण झोपा आता !"

सरलाच्या बोलण्याचा अवकाश की रामण्णाचे घोरणे सुरू.

"अय्या, मी आपली बडबड करीत बसल आहे. आणि इकडे हे झोपले सुद्धा. बोलता बोलता केव्हा झोपले कुणास ठाऊक. हे ह्यांचं नेहेमीचंच आहे. झोपलेल्या माणसाची झोप मोडायची आणि स्वतः मात्र गाढ झोपी जायचं !"

दुसऱ्या दिवशी सरला झोपमोड केल्याबद्दल रामण्णांना दोष द्यायची. रामण्णा खुष होऊन जायचे.

"अग, तुला रात्रीच्या जागरणाची सवय लावून देतो, मग पुढे जड नाही जायचं!"

सरला विचारायची....'कशासाठी ?'

"अग उद्या मुलं झाली ? आतापासूनच तुला रात्रीच्या जागरणाची सवय लावतो!" तेव्हा सरला खोटा खोटा राग आणून त्याचे तोंडावर हात ठेवून देई ! पण नवऱ्याचं तोंड असे बंद करून काय होणार ? . . .गप्पांपेक्षा काम महत्त्वाचं. रामण्णा तिला आपल्या बाहुपाशात ओढून घेत.

एकदा तर सरलानंच रामण्णांची साहित्याची कोंडी सोडविली. त्यावेळी रामण्णा एक नाटक लिहीत होते. नाटक नाही. . . .मग काय बरं ? हो, बरोबर 'आदिमाया' नावाची एक कादंबरी लिहीत होते. कादंबरीत तीन भाऊ होते. त्यांच्या शेजारी एक मुलगी राहायची. सारीजणं बरोबरच वाढली. पुढे त्या मुलीची कहाणी आधुनिक द्रौपदीची कहाणी होईल. समाज ढवळून निघेल. हा विचार मनात येताच काहीशा भीतीने तर काहीशा अभिमानाने ती कथा रामण्णांनी सरलाला ऐकविली.

तिने सांगितले, "तुम्ही लिहायला सुरुवात करा. मागाहून आपण बाकीचं सारं पाहू !"

"मागाहून काय पाहणार ? माझ्या जीवनाचा आधी विमा उतरवून मगच कादंबरी प्रकाशित केली पाहिजे."

"का, त्यात काय आहे एवढं निराळं ?"

"निराळं ? अग, जी मुलं जन्माला येतील त्यांच्या सांभाळ कोण करणार?"

"जाऊ दे हो ! तुम्ही कादंबरी लिहिणार आहात की क्लबमध्ये गप्पा मारणार आहात ?"

. . .गोष्ट इथंच संपली. कादंबरीलेखन सुरू झालं. मनात कथानकानं जशी गती घेतली त्याचप्रमाणे— तसेच ते रामण्णांनी कागदांवर उतरविले. . . परंतु तरी त्यांना समाधान वाटले नाही. तिघांवर प्रेम करणाऱ्या त्या मुलीची आमच्या समाजात काय परिस्थिती होईल ? जर तिने आत्महत्या केली तर ? द्रौपदीचा दृष्टान्त निरर्थक ठरेल. आत्महत्या केली नाही तर तिला समाजात गौरवाचे स्थान मिळणार नाही. रामण्णांना समजेना. . . .गोष्टीचा शेवट कसा करायचा ? शेवटचे पान लिहिण्याचा प्रयत्न त्यांनी केला पण त्यांना काहीच सुचेना. तीनचार तास ते तसाच विचार करीत बसले. शेवटी रात्री दोनच्या सुमारास थकून बिछान्यावर पडले.

"झालं लिहून ?"

सरलाच्या ह्या वाक्याने रामण्णांना किती आनंद-समाधान वाटायचे. पण आज त्यांना रागच आला.

"हूं....लिहून होतंय ! तुला काय वाटलं....लेखन म्हणजे स्वयंपाक आहे ? शिजवला की झाला तयार !"

"अहो, मला काय माहीत ? तुम्हीच म्हणत होता ना, शेवटचा भाग राहिला आहे, तेवढा पुरा करतो म्हणून. म्हणून मी विचारलं."

"शेवटचा भाग म्हणजे ? अग, सारा चमत्कार तर शेवटच्या काही पानांतच आहे. खूप विचार करून तो भाग लिहायला पाहिजे. बरं, आता खूप रात्र झाली आहे. तू झोप. . . .मी पण झोपतो !"

सरला जांभई देत म्हणाली, "अहो मला पण झोप येत आहे. पण तरीसुद्धा मला किती उत्सुकता आहे बघा. तुमच्या कादंबरीतील ती मुलगी, शेवटी काय होतं तिचं ? तुम्ही कादंबरी पूर्ण केलीत म्हणून विचारलं.....

रामण्णा आता काही आपल्या मनावर ताबा ठेवू शकले नाहीत. झटकन म्हणाले, "एवढा शेवट ऐकून तुला झोप येणार असेल तर नीट ऐक. शेवटी ती विष खाऊन मरून जाते".

"अगबाई ! एक जीव विनाकारण गेला !" रामण्णांना आश्चर्य वाटले. सरलाचा आवाज भरून आला होता. डोळ्यांतून अश्रू वाहणार होते. विषयाला कलाटणी देत रामण्णा हसत हसत म्हणाले–

"अग, ती मुलगी म्हणजे कादंबरीतील एक पात्र. ती मेली काय अन् जगली काय, दोन्ही सारखंच !"

"अहो, कादंबरीतील पात्र असलं म्हणून काय झालं ? उगीचच काय मरायचं ? काही दुःख–संकट नाही. कोणता आजार–दुखणं नाही !"

रामण्णांनी कंटाळवाणी जांभई दिली .... जरा चिडूनच ते म्हणाले, "पाप केलं, म्हणून मेली !"

"पाप केलं होतं ? मला कुठे माहीत होतं ? तुम्ही जेव्हा कथा सांगितली, तेव्हा कुठे सांगितलंत की तिनं पाप केलं होतं !"

रामण्णांची झोप उडाली. ते ताडकन उठून बसले. जरा रागातच म्हणाले,

"तीन तरुणांवर प्रेम करणं पाप नाही का ?"

"काय म्हणालात ? प्रेम करण्यासाठीच ज्या मुलीचा जन्म झाला आहे, तिनं प्रेम केलं तर ते पाप कसं ठरेल ?"

बायकोच्या ह्या मूर्खपणावर रामण्णांनी जरा तिरस्कारानंच म्हटलं, "पाप नाही?

अग, स्त्री एकाबरोबर राहील तर तो विवाह ठरेल आणि एकापेक्षा अधिकांबरोबर राहील तर तो व्यभिचार नाही होणार ? व्यभिचार पाप नाही ?"

"म्हणजे तुमचं म्हणणं आहे की व्यभिचाराशिवाय प्रेम केलं जात नाही !"

"जाऊ दे ग. तुला आताच ते कळायचं नाही !"

"तुम्ही म्हणता, पुरुषाला प्रेम आणि व्यभिचार एकच. पण माझ्यासारखी स्त्री ह्या मताशी कशी सहमत होईल ?"

रामण्णांना राग आला. प्रेम वेगळे. व्यभिचार निराळा. त्यांना वाटू लागलं, . . . . 'वा ! ह्यात एखादं गूढ तत्त्व दिसतंय.' . . . . ते विचार करू लागले. आपली कादंबरी ह्या तत्त्वानुसार लिहायला पाहिजे. सकाळपर्यंत त्यांचे विचारचक्र चालूच होते. उठल्या उठल्याच त्यांनी चहा घेतला. सरलाशी काही बोललेसुद्धा नाहीत. झटकन आपल्या खोलीत गेले आणि पहिल्यापासून सारी कथाच बदलून टाकली. आठ दिवस त्यांनी सरलाशी विशेष गप्पा-गोष्टीही केल्या नाहीत. मनात विषाद होताच. शेवटी सारी कादंबरी पुन्हा लिहून झाली ! आठवड्यानंतर सरलाजवळ येऊन रामण्णा म्हणाले,

"बघ, सरला कादंबरी पूर्ण झाली !"

सरला काहीच बोलली नाही.

आपली काही चूक नसतानासुद्धा शिक्षा भोगलेल्या विद्यार्थ्याप्रमाणे आवाज काढून रामण्णा म्हणाले,

"तूच तर म्हणाली होतीस ना, की कादंबरीचा शेवट कसा आहे तो सांगा. म्हणून कादंबरी पूर्ण झाल्यावर तुला सांगायला आलो !"

"मी काय सांगणार ? मी तर कॉलेजात पाऊल सुद्धा न टाकलेली स्त्री. इतक्या मोठमोठ्या पुस्तकांवर मी काय टीका करणार ?"

"तुला काय मी सगळी कादंबरी वाचून दाखवणार असं वाटलं ?"

"मग हे सांगायला कशाला आलात ?"

"हे बघ, कादंबरी लिहून पूर्ण झाली आहे. ती तुला समजणार नाहीच," आणि जरा उपरोधिकपणेच रामण्णा म्हणाले, "आणि मी काही तुला सबंध कादंबरी वाचून दाखवणार नाही. मी भूमिका लिहिली आहे ती ऐक."

"भूमिका ? माझा काय तिच्याशी संबंध ?"

"तीच तर ऐक." बोलता बोलताच रामण्णांनी वाचन सुरू केले. प्रस्तावनेत आभारप्रदर्शनानंतर शेवटी लिहिले होते,– 'ही कादंबरी ज्या रूपात प्रकाशित होत आहे

तिचे सारे श्रेय माझ्याकडे नाही. दुसऱ्याच एका व्यक्तीकडे आहे. प्रथम मी एका निराळ्या प्रकाराने प्रयत्न केला होता. पण ते नीट जमले नाही. तेव्हा या दुसऱ्या व्यक्तीने माझ्या ह्या कादंबरीचे सारे कथानक बदलून पुन्हा नवीन रूपात कादंबरी लिहिण्याचा सल्ला दिला. त्याप्रमाणे मी संपूर्ण कादंबरी पुन्हा लिहून काढली. आता मला खूप समाधान वाटते आहे. म्हणून शेवटी मी त्या व्यक्तीला, म्हणजे माझ्या सुखदुःखाच्या सहभागिनीला, माझ्या गुणदोषांना सहिष्णू दृष्टीने पाहून मला सन्मार्गावर आणणाऱ्या माझ्या ह्या प्रिय पत्नीला...'

सरलाने आभारप्रदर्शन पुढे वाचूच दिले नाही. "जरा इकडे आणा पाहू, हा काय वेडेपणा!" बोलता बोलता तिने कागद हातातून ओढला. तेवढ्यात रामण्णांनी तिचा हात पकडून तिला आपल्या बाहुपाशात ओढून घेतले.

साऱ्या जुन्या आठवणी एकामागून एक डोळ्यांपुढून सरकत होत्या. का? कशासाठी?

रामण्णा सरलाच्या फोटोकडे टक लावून पाहत बसले. जणू ती काही त्यांच्याशी बोलणारच आहे. फोटोकडे पाहता पाहता एकदम रामण्णाँच्या चेहेऱ्यावर हसू उमललं. फोटो पाहता पाहता त्यांना आठवण झाली. सरलाला फोटो काढणं म्हणजे केवढं संकट वाटत होतं? नेहेमीची हसतमुख सरला कॅमेऱ्यापुढे उभी राहताना किती घाबरत होती ..आपली भीती दडवून ठेवण्यासाठी ती चेहेऱ्यावर गंभीर भाव आणण्याचा प्रयत्न करी.... ह्या सहज आणि कृत्रिम अशा संमिश्र भावामुळे तिच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा बावळटपणा दिसू लागे. फोटोत ती तशीच घाबरलेली, बावरलेली, जराशी बावळट दिसत होती. तिला पाहून रामण्णांना थोडे हसूच आले. फोटोत ती एखाद्या लहान मुलीसारखी दिसत होती. तरीसुद्धा सरलाचे मूळचे सौंदर्य रामण्णा विसरू शकले नाहीत! ती काही अगदी सर्वांग–सुंदरी नव्हती. पण मोठी लोभस, आणि आकर्षक. बोलताना ओठ जरा पुढे करून ते विचकण्याची तिला सवय होती. रामण्णा नेहमी चेष्टेत तिला म्हणत, "नेहेमी चुलीजवळ बसून, फुंकून फुंकून तुझ्या ओठांना हा असा कायमचा आकार प्राप्त झाला आहे!" ही झाली चेष्टा. पण बोलताना सरलाचा चेहेरा अधिकच सुंदर दिसे. रात्रीच्या अंधारात बोलतानासुद्धा, तिची अशी सुंदर प्रतिमा रामण्णांच्या डोळ्यांसमोर तरळे. तिच्या गप्पा, तिचे बोलणे, तिचे शब्द ऐकून रामण्णांचे कान तृप्त होत असत!

रामण्णांनी दीर्घ सुस्कारा सोडला. ते विचार करू लागले. किती आठवणी?... ते मुद्दाम आठवणी शोधत आहेत का? छे त्या आपोआप उसळून येत आहेत. तिच्या आठवणी......! तिच्या गप्पा, तिचे रुसणे, तिचे गाल फुगवून बसणे, तिचे खळखळून

हसणं ! सारे सारे जसेच्या तसे आठवत आहे...... रामण्णांनी स्वतःला सावरले. त्यांचे मन जरा हलके हलके झाले. एकदा विचार आला, लिहायला लागावे ! ते जरा दचकलेच. सरलाच्या आठवणी, तिचे बोलणे, रुसणे, फुगणे, हसणे सगळ्याची आठवण येते. सहा वर्षांच्या सुखी वैवाहिक जीवनात कधी दुःखाची छायासुद्धा नव्हती. सरलाच्या आठवणींनी त्यांना एक प्रकारची सांत्वना मिळते. पण कुमुदची आठवण येते तो फक्त एकाच प्रकारची. प्रसंग तर आठवतच नाहीत. सरला त्यांच्या जीवनाची प्रेरणा होती. स्फूर्ती होती आणि कुमुद केवळ संभोग्य वस्तू ? शी, हा कसला घाणेरडा विचार ? हे खरं की खोटं ?...... छे ! ही आपली नुसती कल्पना आहे ? आज तीन वर्षं जे प्रत्यक्ष वास्तवात घडत आहे ते खरे नाही ? हे जर खरं असेल तर तो सरलाच्या बरोबर अविश्वास ? द्रोह ? सरलाबद्दल त्यांना प्रेम नव्हतं ? ते पुन्हा फोटोकडे पाहू लागले. त्यांना भास झाला, सरला आपल्याला सांगत आहे—

प्रेम वेगळं आहे. आणि व्यभिचार वेगळा ! तिचे ओठ थोडे पुढे आल्याचा त्यांना भास झाला.

"सरला, माझ्या कथेची कोंडी उलगडण्याची, मला धीर देण्याची भाषा करतेस ?"

रामण्णा एवढेच बोलून फोटोकडे अगदी निरखून निरखून पाहू लागले. जणू सरलाच्या उत्तराचीच वाट पाहत आहेत...

## ६

खरं म्हणजे कुमुदला सिनेमा पाहायला यायचं होतं. अगदी मनापासून. दोन दिवसांपासून ती ह्या संधीची वाट पाहत होती. दोन दिवसांपूर्वी तिला सिनेमा पाहायचा होता. आणि ही गोष्ट तिने रामण्णांना अगदी स्पष्ट सांगितलीसुद्धा. पण त्यांनी 'चल' म्हटल्यावर मात्र तिने 'बघू बघू' म्हणून त्यांना उडवून लावले. तिला थोडं वाईट वाटलं असेल. सरलाला जाऊन फक्त तीनच महिने झाले होते...! साहजिकच रामण्णांना तिच्याबरोबर सिनेमाला जायला संकोच वाटत असेल... तिने फारसा हट्ट केला नाही. तिने रात्रीचं जेवण लवकर तयार करून ठेवलं. पण रामण्णांच्या तोंडातून सिनेमाचा विषय बाहेर पडेना. मग काय तीच सिनेमाचा विषय काढणार ?

आपणच असले विषय काढण योग्य आहे ? पण आवरता आले नाही... जरा इकडच्या तिकडच्या गोष्टी करून तिने रामण्णांना सुचविण्याचा प्रयत्न केला. पण त्यांती असे दाखविले की आपल्याला काही समजतच नाही. शेवटी तिने कंटाळून जांभई दिली. तशी रामण्णांनी विचारले,

" सिनेमाला येणार ?"

पण त्यांची विचारण्याची पद्धत. त्यांचा हावभाव, कंटाळवाणा चेहेरा, सारंच तिला अगदी असह्य झालं !

म्हणून चेहऱ्यावर कोणत्याही प्रकारचा उत्साह न दाखविता आणि मनातील निराशा लपवून ती म्हणाली–

.. हूं .. !

आता ह्यावर रामण्णा झटकन् म्हणाले असते···

" चल !" तर सारी निराशा गिळून ती आनंदाने तयार झाली असती. पण तेवढ्यात रामण्णा म्हणाले,

" सिनेमाला नको असेल तर दुसरीकडे कुठेतरी जाऊ या !"

तिच्या डोक्यात लख्ख प्रकाश पडला. कुठेतरी फक्त आपल्याला घराबाहेर काढण्याचा ह्यांचा विचार आहे ! केवढी मोठी निराशा, चीड, अपमान ! तिला त्याचा तिरस्कार वाटू लागला ! उगीच तोंडातून काही शब्द बाहेर पडायचे आणि ही निराशा, चीड, अपमान बाहेर उमळून यायचा. त्यापेक्षा मौनच बरे ! तिने काहीच उत्तर दिले नाही.

रामण्णा खूप वेळ बोलत राहिले. पण त्यांच्या गप्पांकडे तिचे लक्षच नव्हते. शेवटी सारं असह्य होऊन तिने जांभईद्वारा आपला अभिप्राय व्यक्त केला. तिने विचार केला त्याला ह्याचा जो अर्थ घ्यायचा तो घेऊ दे.

थोड्या वेळानंतर रामण्णा, लिहायला बसायचे ढोंग करून तिथून निसटले.

कुमुदने क्षणभर डोळे मिटून घेतले. जणू काही ती मनाशी कसला तरी दृढ निश्चयच करीत होती.

आतापर्यंत रामण्णांच्या सहवासात कुमुद मोठी झाली. त्यांच्याबद्दल तिला काहीही वाटो पण रामण्णा जर आसपास दिसले नाहीत..की तिचे मन..कोमेजून, सुकून जाई..जणू काही सूर्यप्रकाशावाचून..कोमेजून जाणारी वेलच...कुमुदचे मन अगदी थकून भागून गेले होते.

रामण्णा आपल्या खोलीत गेले..पण रामण्णांच्या दूर जाण्याने कुमुदचे मन लगेच घाबरेघुबरे झाले. तिचे मन त्यांच्या मागोमाग धावू लागले.. तिला वाटलं,.. झटकन् पुढे जाऊन त्यांना अडवावं..जरूरच पडली तर त्यांचे पाय पकडावेत आणि आपली चूक मान्य करावी. (खरं म्हणजे तिने कोणती चूक केली होती ?) आज त्यांना खुलवून खुलवून सिनेमाला जायला पाहिजे होते. तिथे अंधारात त्यांच्या स्पर्शाचा आनंद घेत घेत झोपून गेलो असतो..पण हे सारे विचार क्षणभराचेच ! लगेच तिने मनातील ह्या विचारांना दूर ढकलून दिले ! तिचे तिलाच आश्चर्य वाटले. खरं म्हणजे हा आत्मद्रोहच होता. सुखदु:खाच्या गर्तेत सापडलेले तिचे मन..विचारांच्या ओझ्याने क्लांत झाले. ती स्वत:शीच पुटपुटली.

"कशाला हवा तो सिनेमा !"

हा सारा संघर्ष तासाभरापूर्वीचा होता. आत कुमुदचे मन आणि डोके एकाच पातळीवर आले होते. आता ती शांत मनाने विचार करू शकत होती. मनुष्याचे अंतर्मन कसे आहे ? .तिला काहीच माहीत नव्हते. पण ह्या अंतर्मनाचे एखाद-दुसरे अनुभव समजण्याची शक्ती आता तिच्यात आली होती. दोन परस्परविरुद्ध अनुभव पाहून तिचा तिलाच अचंबा वाटे. आजचा हा अनुभव. आणि आपली त्यावरील प्रतिक्रिया पाहून कुमुदला फार आश्चर्य वाटले. 'सिनेमाला चल'..रामण्णांच्या ह्या वाक्याचा अर्थ काय घ्यायचा ! कोणता का शब्द असेना, पण तो रामण्णांच्या तोंडातून आला की कुमुद नुसती बेभान होऊन जात असे. शब्द कोणते, त्यांचा आशय कोणता, ते कोणत्या प्रकारांनी उच्चारले गेले, चेहऱ्यावरचे हाव-भाव,...ह्या साऱ्या गोष्टी तिच्या विचारांपलीकडील होत्या. ती धड ऐकूनही घेत नव्हती. 'सिनेमाला चल' म्हटल्यावर जो उत्साह वाटेल, तोच 'मर जा' म्हटल्यावरही तिला वाटेल. तसं पाहिलं तर..दोन तीन वर्षेच झाली आहेत. पण वाटतं की हजारो वर्षांचा परिचय आहे जणू !

हजार वर्षांची कसली गोष्ट. हजार दिवस सुद्धा झाले नाहीत. तीन वर्षेसुद्धा उलटली नाहीत, म्हणजे हजार दिवसही झाले नाहीत. तिला त्या साऱ्या गोष्टींची अगदी स्पष्ट स्पष्ट आठवण आहे—ती संध्याकाळ. झोपण्याच्या आधी ती रामण्णांच्या खोलीत जाते, काही तरी वाचायला हवं म्हणून. पुस्तकांच्या कपाटात ती पुस्तकं शोधते. इतक्यात रामण्णा तिला जोराने जवळ खेचून आपल्या मिठीत घेतात आणि तिचे चुंबन घेतात. थोड्या वेळाने ती भानावर येते. तिचे सारे शरीर घामाने डबडबून जाते. लाजेने चूर होऊन ती रामण्णांच्या खोलीतून पळून येते. होय. त्याच रात्री.!!! आपल्या खोलीत आल्यावर भय आणि सुख दोन्ही भावनांचा कल्लोळ तिच्या मनात उसळला होता. ती फार फार गोंधळून, बावरून गेली होती. रामण्णांनी आपल्याला मिठीत घेऊन

आपले चुंबन घेतले ह्या गोष्टीची आठवण येताच तिचे सारे शरीर थरथरून निघे, चेहेरा एका आगळ्याच सुखाने उजळून निघे. पटकन खोलीत येऊन ती बिछान्यावर बसली आणि तशीच आडवी झाली. दिवासुद्धा विझवला नाही तिनं, कारण मनातून भीती वाटत होती—रामण्णा एकदम आले तर ? पण थोड्या वेळाने रामण्णा येत नाहीत असे पाहून ती निराश झाली. पाय दरवाज्यापर्यंत गेले, पण दरवाजा उघडून पाहण्याचे साहस तिला झाले नाही. पुन्हा येऊन बिछान्यावर पडली. एकदा मागे वळून पाहिलं, कुणी दरवाजा उघडत तर नाही ना ? मन आणि शरीर झोपाळ्यासारखे झोके घेऊन घेऊन थकून गेले होते. विचारांच्या नादात केव्हा झोप लागली तेसुद्धा तिच्या लक्षात आले नाही. सकाळी उठताच एकदम दचकून तिने सगळीकडे पाहिले. सारे काही जसेच्या तसेच ! रामण्णांच्या भेटीचे चिन्ह काही दिसेना.

रामण्णांची भेट. . त्यांच्याविषयी विचार करणे त्यांचा अनुभव . . ह्या सर्वांची कुमुदला निश्चित कल्पनाच नव्हती. रात्रीच्या त्या अनुभवांच्या आठवणी तिला तशा सतावत नव्हत्या. . पण तो प्रसंग डोळ्यासमोरून हलत नव्हता. सकाळपासून संध्याकाळपर्यंत ती केवढ्या उत्साहाने घरकाम करीत होती. केवढे काम केले तिने ! उत्साहाला नुसतं उधाण आले होते. थकवा तर मुळीच नाही. सरला अंथरुणावर पडल्यावर, स्वयंपाकघरातील सारी जबाबदारी कुमुदच्यावरच पडली होती. बाकी वरच्या सगळ्या कामाला नोकर होता. झाडपूस करायला मोलकरीण होती. पण त्या दिवशी स्वयंपाक करून कुमुदने घरातली आणखी कितीतरी कामं केली.

तेव्हाच सरलाताई म्हणाली, "अग कुमुद. माझ्याजवळ जरा स्वस्थ बसून आराम तरी कर की !"

"नको ग ! कुणी पाहिलं तर काय म्हणेल ?" कुमुद म्हणाली.

कुमुदच्या मनाचा थांगपत्ता सरलाला लागला नाही. ती म्हणाली—"कोण पाहणार ? कोण कशाला काही म्हणेल ग ?"

"अग असं कसं म्हणतेस ? कोणी म्हणेलच ना. बायको अंथरुणावर पडून आहे. . तर एक खोली धड स्वच्छ नाही. एक कपडा स्वच्छ नाही . . असं कुणी म्हटलं तर बरं वाटेल का ताई ?"

"छे ग, काही तरी काय ? तुला काय इथं कामाला जुंपायला का घरी आणलंय मी ?"

"ताई. . असं कुणी आपणहून म्हणणार नाही. पण तू जेव्हा बरी होतीस, तेव्हा घर कसं आरशासारखं स्वच्छ असायचं. मला काय माहीत नाही का ताई ? मला इथे

आणून, खायला प्यायला देऊन नुसतं बसवून ठेवलंस ना, तर लोक तुला म्हणतील, बहिणीला तुम्ही काही शिकवलं नाही ! घरात सगळा पसारा दिसल्यावर लोक काही म्हणणार नाहीत ?"

...मनातले सारे विचार कुमुदच्या तोंडून बाहेर पडत होते.

सरलाला केवढा आनंद झाला होता ! बिचारीला काही ते सहन करता आलं नाही. तिचे डोळे भरून आले. तिच्या तोंडावाटे शब्द बाहेरच पडेनात. . हाताने खुणावून तिने कुमुदला बिछान्याजवळ बोलावले. ती लगेच तिच्या अंथरुणाजवळ गेली असती तर सरलाच्या डोळ्यांतून अश्रुधाराच वाहू लागल्या असत्या. म्हणूनच ती म्हणाली,

"आले ग, आताच आले बघ. थोडसंच काम राहिलंय, मग संध्याकाळपर्यंत तुझ्याच जवळ बसून गप्पा मारीन !" एवढं बोलून ती कामाला लागली.

त्या दिवशी कुमुदने खोल्यांतलं सगळं सामान बाहेर काढून . .झटकून, पुन्हा नीट लावलं ! रामण्णांच्या खोलीकडे तर तिनं जरा जास्तच लक्ष दिलं. त्यांच्या कपाटातील पुस्तकं, कपडे, सारे नीट लावून ठेवले. स्वयंपाकघरातील भांडीकुंडी, डबे स्वच्छ घासून नीट व्यवस्थित लावले. दिवे स्वच्छ पुसले. पलंग स्वच्छ झटकले. गाद्या झटकल्या. . . त्यावरचे पलंगपोस बदलले. कुठेही सुरकुत्या न ठेवता . . बिछाने नीट ठेवले. एक काम पुरं झालं की दुसरं. . ! जरा स्वस्थ बसल्यावर तिला वाटायचं छे, काही तरी राहिलंच. मग पुन्हा तेच काम करून टाकायची.. . .एखादं काम, नीट झालं नाही असं वाटलं, की पुन्हा पटकन् करून टाकलं. संध्याकाळपर्यंत एकसारखं काहीना काम चालूच होतं पण तिला दमणूक कशी ती वाटली नाही ! कुमुदला खूप बरं वाटलं. कुठला एवढा उत्साह आपल्यात शिरला ? .शेवटी सारं काम आटोपून ती सरलाच्या अंथरुणाजवळ आली. सरलाने कुमुदच्या शरीराला किती वेळा स्पर्श करून पाहिला.

कुमुदने विचारले—"ताई, अग एक दिवस जरा कुठं काम केलं, तर माझे हात–पाय का झिजून जाणार आहेत ?. . तू म्हणजे भारीच हळवी बाई !"

सरलाने एकदम काहीच उत्तर दिले नाही. हाताने ती कुमुदला स्पर्श करीत होती, पण तिचे मन कुठेतरी दुसरीकडेच भरकटत होते. थोड्या वेळाने तिने एक दीर्घ सुस्कारा टाकला. कुमुद एकदम शहारली. ती विचार करू लागली. ताईच्या मनात कोणता विचार आला ?

स्वतःच स्वतःला उत्तर देत असल्याप्रमाणे सरला बोलू लागली.

"हे बघ, कुमुद, तू तर माझ्यापेक्षाही ह्या घराला चांगलं सांभाळू शकशील ! काय ?"

"जाऊ दे ग. उगीच काहीतरीच बोलू नकोस बघ !"

"काहीतरी कसं ग ! . . आज घराची स्वच्छता करायला तू किती राबलीस ग दिवसभर ! मला काही आठवत नाही बघ . . इतकं काम केलेलं कधी !

"ताई, तू नेहमीच घर घासून पुसून स्वच्छ ठेवतेस. आम्ही म्हणजे कधी सठी सहामासी स्वच्छता–मोहीम काढणार !"

"बरं झालं बाई, तुला ह्या घरात काम करायची सवय होईल. . .बरं झालं !"

"एखाद्या दिवशी जरा इकडचं, तिकडचं थोडंसं काम केलं तर किती माझी पाठ थोपटतीस ग ताई !"

"म्हणून तर म्हणते ग, छान काम केलंस. आता का मी ह्या दुखण्यातून उठणार आहे ? घरातलं काम करणार आहे ?"

. .सरलाच्या तोंडावर एकदम हात ठेवून कुमुद म्हणाली, "छे, छे, ताई असलं काही अभद्र बोलू नकोस !"

"बोलू नको तर काय करू ग ? कुमुद. आता कशाला काय लपवून ठेवू ? ह्या आजारपणातून मी का आता बरी होणार आहे ?"

"ताई, तू असलं जर काही बोलणार असशील ना, तर मी इथून जातेच. बघ !" कुमुदने जरा चिडूनच सांगितले.

"वेडे, अग रागवू नकोस. तू जर निघून गेलीस तर माझं हे घर सांभाळणार कोण ग ?"

बोलता बोलताच सरलाने कुशी बदलली. .पदराने चेहेरा झाकून घेतला.

कुमुदचा जीव गलबलला. कुशी बदलल्यावर, पदरानं तोंड लपवून घेतल्यावर सरला बराच वेळ काहीच बोलली नाही. कुमुद जराशी घाबरलीच. आतापर्यंत घराची स्वच्छता, लावालावी, सजावट करण्यात उत्साहाला जे उधाण आलं होतं ते पारं निघून गेलं ! ती विचार करू लागली. .सरलाताईने ह्या सर्वांचा असा अर्थ का घेतला ? तिने घरात एवढी साफसफाई आवराआवर केली ते तिला आवडलं का नाही ?

का ?. . कुमुद एकदम दचकली. आतापर्यंत तिने ह्या गोष्टीचा कधी विचारच केला नव्हता.

आता संध्याकाळ झाली. . .रामण्णांची घरी परतण्याची वेळ झाली, तशी मनाला थोपवूनसुद्धा तिचे डोळे त्यांच्या वाटेकडे लागले होते. हृदयात आनंदाच्या लाटा उसळू लागल्या. कुठल्या तरी एका अनिवार इच्छेची भूक. . .आतल्या आत तरफडू लागली. . . कुमुद दचकली, बावरली. कालच्या रात्रीची आठवण येऊन तिचं मन उसळू लागलं. . .

हातातून सुटलेल्या चेंडूसारखं ! हे काय ? त्या रात्रीच्या अनुभवाने काही तरी नवचैतन्य प्राप्त झालं आणि दिवसभर घरात राब राब राबलो. रामण्णांच्या ते लक्षात तरी येईल का ? रामण्णांनी आपलं कौतुक करावं म्हणून का आपण घर एवढं स्वच्छ केलं, सजवलं ? .नाहीतरी त्यांच्या येण्याकडे आपण एवढे डोळे लावून कशासाठी बसलोत ? हळू हळू जवळ येणाऱ्या पावलांच्या आवाजाप्रमाणे तिला आपल्या हृदयाची धडधड स्पष्ट ऐकू येऊ लागली. आता आपलं एक दूर राहिलं, पण सरलाताईच्या मनात संशयाचं जाळं विणलं जात आहे त्याचं काय ? नाहीतर मरणाच्या गोष्टी ती कशाला करील ? मरणानंतर हे घर. . चालविण्याची चिंता ती कशाला बोलून दाखवील? आता ती स्वतः कशीही वागली तरी सरलाताईच्या मनात संशय निर्माण झाला आहे हे मात्र खरे. पदराआड तोंड लपवून ती जी झोपली ती अजून उठली सुद्धा नव्हती. तिने कुमुदकडे पाहिलेसुद्धा नाही. कुमुद मनातल्या मनात चांगलीच घाबरली. रामण्णांविषयी आपल्या मनात आलेले विचार. विचारांचा झगडा. . . हे सगळं योग्य आहे का अयोग्य हा प्रश्न तिला शिवला नाही. त्या दृष्टीने किंवा समाजाच्या नैतिक जीवनाच्या दृष्टीने विचार करण्याची योग्यता तिच्यात नव्हती. तेवढी तिची कुवतही नव्हती.

खालच्या मजल्याला आग लागली तर वरच्या मजल्यावर राहणारा उडी मारू का नको असा विचार करीत नाही. . .खालच्या मजल्यावर आगीचा डोंब उसळला तर जवळच्या खिडकीतून तो चटकन् खाली उडीच मारील. माणसाचा जीव सर्वात प्रिय. कुमुदला हे सारं कळत होतं. उमगत होतं पण ती काही करू शकत नव्हती. कुमुदला एकसारखी काळजी लागून राहिली होती. आपल्यासारख्या अनाथ मुलीला, आपल्या घरी आणून पालनपोषण करणारी सरलाताईच आपल्यावर रागावली तर ? ह्याचीच तिला एकसारखी भीती वाटत होती. रामण्णांच्या येण्याची वेळ झाली तशी तिचे हृदय धडधडू लागले. रामण्णा आल्यावर सरलाताईनं त्यांना सारं सांगितलं तर ? आपल्यावरचा सारा राग ती रामण्णांना ओकून सांगेल ? शेवटी तिने विचार केला की कालच्या त्या प्रसंगाबद्दल तर आपण काहीच करू शकत नाही. आता इथं राहणंही ठीक नाही. म्हणून ती तेथून आपल्या खोलीत निघून गेली. पण रामण्णांची आल्याची चाहूल लागताच तिला स्वतःला सावरता आलं नाही. रामण्णाही आपल्यावर रागावतील ह्या भीतीनं तर आणखीच दचकली ती ! इतक्यात तिला रामण्णांचा जोराने हसण्याचा आवाज आला. कुमुदला आश्चर्यच वाटलं. त्यांच्या गप्पा ऐकण्याची उत्सुकता शिगेला पोचली. पण बाहेर यायला ती घाबरली. रामण्णा कशासाठी एवढे जोरजोराने हसत आहेत ? तिला काहीच समजेना. शेवटी रामण्णांनीच सरला बोलावतेय म्हणून सांगितल्यावर तिला जायलाच लागले. सरलाच्या समोर उभे राहताना तिला वाटलं, आपले

पाय . . दगड झाले आहेत ! . . आपल्या पायाखालची जमीन सरकत चालली आहे. चालता चालता तिला वाटलं, आपण आता खाली कोसळणारच !

हूं...असंच काहीतरी पुटपुटत कुमुदने डोळे विस्फारून इकडे तिकडे पाहिलं....तिच्या हातात पुस्तक होतं आणि ती तशीच खुर्चीवर बसली होती. तिनं एक दीर्घ सुस्कारा सोडला. त्या दिवसाची आठवण येताच डोळयांसमोर दाट अंधार दिसू लागला. तिने घड्याळाकडे पाहिलं. रात्रीचे साडे नऊ वाजले होते.

चला ! झोपण्याची वेळ झाली आता. ह्या विचारानं तिने एक सुस्कारा सोडला- खरं म्हणजे तिला सिनेमाला जायचं होतं. छान झालं ! जुन्या आठवणीचा सिनेमाच पाहिला. विचारांच्या ओघात, निराशेनं ओठ वाकडा करीत ती आपल्या खोलीत निघून गेली.

## ७

चिखलात फसलेल्या माणसासारखी रामण्णांची स्थिती झाली होती. पत्नीच्या फोटोसमोर बसल्यावर तर जुन्या आठवणींना थोपवून धरणे सर्वस्वी अशक्यच झाले. एका आठवणीनंतर दुसरी आठवण. सरलाच्या मृत्यूनंतर एक नवीनच समस्या निर्माण झाली होती. ही समस्या कोणती तेही त्यांच्या लक्षात नीटसं आलं नव्हतं ! आतापर्यंत तर त्यांनी तोंडातून एक शब्दही काढला नव्हता. विचारांच्या ओघात, सरलाच्या फोटोला उद्देशून ते बोलू लागले, "माझ्या जीवनातील समस्या सोडविण्यासाठी तू मला चार धीराच्या गोष्टी सांगत आहेस ?" . . बोलता बोलता त्यांनी फोटोकडे पाहिलं. शब्द हळू हळू मेंदूपर्यंत जाऊन भिडले आणि क्लोरोफार्मच्या गुंगीतून जागे झाल्यासारखी त्यांची अवस्था झाली. कुमुदचा आपल्यापुढे एक मोठा प्रश्न आहे. . हे खरं म्हणजे आतापर्यंत त्यांच्या लक्षातच आलं नव्हतं. पहिल्यांदा ती ह्या घरात आली तेव्हा तर ती एक लहानशी मुलगीच तर होती ना. तिची तीच प्रतिमा रामण्णांच्या मनात स्थिर होती. तिचं वाढीचं वय होतं आणि थोड्याच दिवसांत ती एक पूर्ण विकसित स्त्री झाली होती. सरलाच्या बरोबर ती होती त्यामुळे कुमुदचा यौवनप्रवेश त्यांच्या नजरेत आला नव्हता. तिला एक लहानशी मुलगी समजून रामण्णा तिची चेष्टामस्करी करीत. शिवाय ते कुमुदला नेहमी सरलाच्या बरोबरच पाहत. ह्या सर्व कारणांनी त्यांना

कुमुदबद्दल कुतूहल असे कधी वाटलेच नाही. अशा परिस्थितीत त्या आकस्मिक घटनेने रामण्णा खरं म्हणजे थिजूनच गेले होते.

कसं आणि काय घडलं, ते त्यांना कळेनाच. मन मात्र गांगरून गेलं होतं. त्या दिवशीचा तो प्रसंग ते कधीच विसरू शकले नाहीत. तसं पाहिलं तर तो दिवस इतर अनेक दिवसांसारखाच होता. कुमुद कितीतरी वेळा त्यांच्या खोलीत येत असे. कित्येक वेळा ते लेखनात दंग असत. कुमुद त्यांच्याजवळ येऊन, उभी राहून त्यांच्याशी गप्पागोष्टी करी. पुस्तक वाचायला घेऊन जाई. पुस्तक जरा अवघड वाटलं तर त्या पुस्तकाची गोष्ट, त्यांच्याकडून ऐकून घेई आणि कित्येक वेळा त्यांनी स्वतःच तिला रामायणमहाभारतातील कथा सांगितल्या होत्या. हे सगळं खरं आहे. . .पण तरी खरं कसं म्हणायचं? एकदाच हाताला हाताचा स्पर्श झाला नजरेला नजर मिळाली. .आणि ते सारे, रामण्णा स्वप्नाप्रमाणे पार विसरून गेले होते. त्याच क्षणापासून कुमुद त्यांना वेगळीच वाटू लागली. वयाने, ज्ञानाने, अनुभवाने रामण्णा तिच्यापेक्षा कितीतरी मोठे होते. कुमुद जरी आता वयात आली होती तरी त्यांना ती एक लहानशी मुलगीच वाटत होती. ह्या विचारानेच रामण्णांना थोडा धीर आला. पण तरी काय झाले? त्या रात्री, नेहमीसारखी कुमुद आपल्या झोलीत पुस्तक न्यायला आली, तेव्हा त्या पुस्तकांच्या कपाटाजवळ आपण तिच्याशी एखाद्या पशुसारखे नाही का वागलो? दोन तीन वर्षांनंतर आज ही मानसिक स्थिती पालटली आहे. पण त्या अनुभवाची आठवण येताच रामण्णा पुन्हा गोंधळात पडले. त्या दिवशी आपण तिला आलिंगन देऊन तिचे चुंबन का घेतले? रामण्णांना वाटलं. माणसाची बुद्धी कितीही परिपक्व असू दे. मन किती सुसंस्कृत असू दे पण तरीसुद्धा शरीरावर नियंत्रण ठेवणं असंभवच! मनोरूपी ह्या मर्कटाला ताब्यात ठेवणं खरं म्हणजे कठीणच! दासोचे (संत कवी) म्हणणे कसे? . .कदाचित् त्यांना शरीराचं हे रहस्य समजलंच नसेल! मनाला ताब्यात ठेवणं शक्य आहे. बुद्धिमान माणसाला समजावून सांगणं शक्य आहे. पण ह्या शरीराला कसं ताब्यात ठेवणार?

'ज्ञानलवदुर्विदग्धं ब्रह्मापि नरं न रंजयति' हे काही खोटं नाही. माणसाचं शरीर, मूर्खासारखं आहे. त्याला कितीही समजावून सांगितले तरी पटणार नाही. जनावरासारखेच ते आहे. निसर्गनियमाचंच ते पालन करणार. वृक्ष वेलींप्रमाणेच शरीर वाढत जाते. अशा ह्या शरीराच्या शक्तीनंच त्या दिवशीं त्यांची बुद्धी आणि मन ह्यांचा पराभव करून टाकला. जो देह निर्माण होतो तो दुसरा देह पुन्हा निर्माण करतोच. हा शरीरधर्मच आहे. त्यांच्या शरीरानं त्या रात्री हेच केलं. सरलानं अंथरूण धरले तशी रामण्णाच्या शरीराची तहान वाढली. सरलाच्या जवळ बसणं, तिच्या हातांचा स्पर्श, तिच्याशी गुजगोष्टी. . ह्या साऱ्या सहवासामुळे ती भूक जागी झाली पण शमली

नाही ! म्हणून तर पहिल्यांदा भक्ष्य दिसताच घारीप्रमाणे त्यांनी कुमुदवर झडप मारलीच नसती. त्या दिवशी कुमुदला पहिल्यांदा बाहुपाशात घेताना त्यांना आश्चर्याचा झटकाच बसला होता. त्यांनी तिला घट्ट मिठी मारली. तिचे डोके, ओठ, डोळे, गाल, हनुवटी, खांदे, छाती . .साऱ्या साऱ्याचं त्यांनी भराभर एकसारखं चुंबन घेतलं. एखाद्या राक्षसाचा संचार झाला होता जणू ! म्हणून तर ती मुलगी घाबरीघुबरी होऊन तेथून पळून गेली.

कुमुद जेव्हा रामण्णांच्या बाहुपाशातून दूर दूर निघून गेली तेव्हाच रामण्णा शुद्धीवर आले क्षणभर त्यांना उमगेनाच की ते काय करीत होते. घामानं त्याचं सारं शरीर डबडबलं. ताप उतरला तेव्हा ते भानावर आले. आपली चूक त्यांच्या लक्षात आली ! एकीकडे अंथरूणाला खिळून राहिलेली सरला. तिच्याबद्दल द्रोह, तिरस्कार तर दुसरीकडे आश्रित म्हणून आलेल्या कुमुदवर अन्याय. विचारांच्या ह्या कल्लोळाने, रामण्णांच्या चेहेऱ्यावर एक खिन्न हसू उमटलं. मानवीय संस्कृतीमध्ये ही केवढी आत्मवंचना. सत्यावर पांघरूण घालणे हीच खरी बुद्धिमत्ता. त्याला स्पष्ट करण्यासाठी हा किती छान दृष्टान्त ! द्रोह आणि अन्याय."शब्दांचा उच्चार त्यांनी केला. पण ते केवळ शब्दच होते. कल्पना व्यक्त करण्याचे साधन. त्या शब्दांनी त्यांच्या सुसंस्कृत बुद्धीला तर सांत्वना मिळाली. पण वास्तविक सत्य त्या कल्पनेत नव्हते. वास्तविक सत्य त्या रोमांचात होते. त्या घामाच्या बिंदूत त्यांना धीर मिळाला. . . ओठांच्या त्या थरथरत्या आठवणीत सत्य सापडलं. तिच्या उभारलेल्या स्तनाच्या स्पर्शात, तिच्या मांसल बाहूत. . .त्या आगळ्या स्पर्शात. .कृतार्थ भाव होता. वास्तविक सत्य ? आता ह्या विचारांनीच रामण्णा दचकले. चूक करूनसुद्धा समाधान वाटणे. हे कुठले लक्षण ? हे तामसी समाधान ? छी ! पुन्हा फक्त निरर्थक शब्दच ! जाऊ दे झालं ! एकदा झालं ते झालं ! पुन्हा असं होणार नाही एवढी दक्षता घेतली म्हणजे मिळवली. हा काही रोजचा अनुभव नव्हता. विचारपूर्वक योजनाबद्ध असं काही ते काम नव्हतं ! मग त्याची एवढी काळजी कशाला करायची ? आता ह्या व्यर्थ गोष्टींचा उगीच ऊहापोह कशाला करायचा ? . .असा सुज्ञ विचार करून रामण्णा आपल्या कामाला लागले.

पण मनाला त्या प्रसंगाचा विसर पडेना. दुसऱ्या कुठल्या कामात मन लागेना. किती प्रयत्न करून पाहिला. पण कुमुदला दिलेल्या गाढ आलिंगनाला ते विसरूच शकत नव्हते. . . .शेवटी रामण्णा फारच वैतागून गेले. स्वतःलाच त्यांनी एक शिवी हासडली. पण काही फायदा झाला नाही. आपली चूक कबूल करायची म्हणजेच आपलं भरकटलेलं मन ताळ्यावर येईल असा विचार करून त्यांनी कुमुदची क्षमा मागायचं

ठरविलं. त्याप्रमाणे ते कुमुदच्या खोलीकडे वळले. पण पुन्हा थबकले. मनात संशयाचा विचार डोकावला.– आपण कुमुदकडे क्षमायाचनेसाठी जात आहोत. का ? आपल्या शरीराची भूक भागवण्यासाठी ? त्यांनी स्वतःला सावरून घेतले. बिचारी ! आपल्याकडे आश्रित म्हणून आली आहे. कोवळ्या वयाची आहे. माझ्यावर तिचा विश्वास आहे. माझ्याबद्दल तिला आदर आहे. बिचारी, किती घाबरून गेली असेल ! तिला आपल्याबद्दल काय वाटलं असेल ? तिची समजूत घालणं हे आपलं कर्तव्य आहे. असा प्रभावी विचार डोक्यात शिरल्यावर रामण्णांनी पुन्हा पावलं, कुमुदच्या खोलीकडे वळवली. पण कुमुदची समजूत घालायची तर त्याच्या आधी तिच्या शरीराला स्पर्श करण्यालाच आपण अधिक आतुर, उत्सुक आहोत हे लक्षात आल्यावर रामण्णांची पावलं पुन्हा माघारी फिरली. ते हताश, बेचैन झाले. . . स्वतःवर रागावले. छे, ही एक लज्जास्पद, अपमानास्पद गोष्ट आहे. ते मनाशीच पुटपुटले. त्यांचं स्वतःचं शिक्षण, संस्कृती, व्यवहार हे सारं काय आहे ? मनात तांडव नृत्य करणारे हे विचार कसले ? पुन्हा त्यांनी विचार केला की खरं म्हणजे ह्या सर्वांची नैतिक किंवा अनैतिक जबाबदारी अंथरुणाला खिळून पडलेल्या सरलाचीच आहे. आतापर्यंत अशा विचारांना आपल्या मनात थारासुद्धा नव्हता. हे सारं कुमुदच्या सहवासाने घडले. कामुक जीवनानं त्यांची एकप्रकारे चेष्टाच केली. पण ती गोष्ट . . . कशी का असेना तेथेच समाप्त झाली होती. तरी आज दोन तीन वर्ष उडून गेल्यावर पुन्हा वाटतं की ती कथा संपली नाही. . . . अंथरुणावर. . . तळमळत पडले असताना एकदम एक विचार त्याच्या डोक्यात आला. रामण्णा झटकन् उठून बिछान्यावर बसले. छे, हा काय विचारांचा गोंधळ. आतापर्यंत कधी असल्या विचारांना मनात थारा नव्हता. कुमुद कुठे गेली ? आपल्या खोलीत गेली ? की सरलाच्याजवळ ? ती चांगलीच घाबरली होती ह्यात शंका नव्हती. आणि भ्यायलेली मुलगी सरलाच्या जवळ गेली तर ? घडलेली सारी हकीकत तिला सांगितली तर ? . . . विचार करता करता रामण्णा एकदम शहारून उठले. जसा काही तापच चढला. पुन्हा त्यांनी विचार केला, जाऊन बघून तर यावं. ते शांतपणे उठले. खोलीच्या बाहेर पडले. क्षणभर थबकले. कुमुद आपल्या खोलीत आहे किंवा नाही ते तरी पाहावं ! एकदम जणू काय भुताला घाबरावं तसे रामण्णा सरलाच्या खोलीकडे धावले. कुमुदच्या खोलीत शिरल्यावर आपण काय करू ? त्यांचा स्वतःवर विश्वास नव्हता. घाबरूनच त्यांनी सरलाच्या खोलीत प्रवेश केला. घरात भूत दिसल्यावर भित्र्या माणसाला बाहेर अंधारात पळून जाण्याचं साहसही होत नाही. सरलाच्या खोलीतून काहीच कसला आवाज आला नाही. कुणास ठाऊक ! रामण्णांना घाबरून कुमुद इथेच तर झोपली ना ! पाहून तर येऊ या. विचार करता करता त्यांनी हळूच दरवाजा उघडला.

'कोण ?",

सरलाचा आवाज ऐकून रामण्णा एकदम दचकलेच. त्यांना वाटले, आता सरला चरफडेल. चोरी करता करता पकडलेल्या चोराप्रमाणे ते घाबरून गेले.. चाचरतच ते म्हणाले.

"कोण ? अग. दुसरं कोणी नाही. मीच आहे !"

"कां आज लिहिण्यात मन लागत नाही का !" जखमेवर मीठ चोळावं तसं रामण्णांना वाटलं !

"नाहीं ग. लिहीतच होतो. तू हाक मारण्यासारखं वाटलं, तुला काही पाहिजे असेल, म्हणून उठून आलो बघ."

"अय्या, मला सुद्धा कुणाचा आवाज ऐकू आला. अहो, कुमुद अजून झोपली की नाही ?"

"मला नाही माहीत बुवा. मी लिहीत होतो. हाक मारू का तिला ?.." शेवटचे वाक्य तोंडाबाहेर पडताच, रामण्णांनी जीभ चावली.

"अहो, तिला कशाला हाक मारता ? बिचारी लहान पोर आहे, झोपू दे तिला."

"नाही, तुला काही पाहिजे असेल म्हणून म्हटलं !"

ह्यावर सरला फक्त हसली !

"मला आता काय पाहिजे ? तुम्ही आहात, कुमुद आहे. दोघं मिळून हे घर चालवालच. मला आता कशाचीच काळजी नाही बघा. बस, आता एकदा डोळे मिटले म्हणजे झालं !"

तो ढगांचा गडगडाट नव्हता. रामण्णांच्या हृदयाची धडपड होती ! सरलाच्या ह्या बोलण्याने रामण्यांच्या हृदयाचे तुकडे तुकडे झाले. ही असं कां म्हणाली ? सरलाला साऱ्या गोष्टी समजल्या ? उमगल्या ? तिला आपला संशय आला ? विचारांच्या गर्तेत फसलेल्या रामण्णाने सरलाच्या अशक्त, फिक्कट चेहऱ्याकडे पाहिले. त्यांच्या मनात वेदना ठसठसू लागली. जवळ जाऊन त्यांनी सरलाच्या कपाळावर हात ठेवला.

"वेडी कुठली! खरंच सरला. तू अगदी वेडी आहेस बघ. झाडंवेली, सूर्यप्रकाशातच जिवंत राहतात. तुझ्या डोळ्यातील ह्या सूर्यप्रकाशातच तर माझ्या जीवनाची धावपळ चालू आहे !"

"इतके प्रसिद्ध लेखक तुम्ही ? आणि प्रेमाच्या गोष्टी करताना इतके अळखळता?"

"प्रेमाच्या गोष्टी ? माझ्या ह्या बोलण्यात प्रेम आहे?

'मग कशांत बरं ?"

रामण्यांनी झटकन् वाकून सरलाच्या कपाळाचे चुंबन घेतले.

"रस कुठे असतो ते रस चोखणाऱ्या भुंग्यालाच माहीत असतं बघ. कमळाला कुठे त्याचा पत्ता असतो ? बोलता बोलता त्यांनी सरलाच्या अंगावरची चादर नीट केली.

"अहो, आता किनई मला मरायचं नाही हं ! किती भाग्यवान आहे मी."

"काय म्हणालीस ? भाग्य ?"

हसत हसतच सरलानं रामण्णानं चुंबन घेतलेले आपले कपाळ त्याला दाखविले. रामण्णा आपल्या खोलीत जाऊन गाढ झोपी गेले.

ह्या साऱ्या आठवणींना उजळा देत रामण्णांनी पुन्हा सरलाच्या फोटोकडे पाहिले.

"सरला, त्या दिवशी तू म्हणालीस, की मी किती भाग्यवती आहे. आणि नंतर मला सोडून निघून गेलीस. पण माझ्या भाग्याची तू कधी कल्पना केलीस सरला ?

बोलता बोलताच रामण्णांनी मनातल्या मनात मृत पत्नीच्या फोटोला प्रश्न विचारला. शुद्ध अंतःकरणाच्या सरलाच्या गोष्टींनी त्यांचं क्षुब्ध मन शांत झालं होतं हलकं झालं होतं. रात्रभर गाढ झोप लागल्यावर, दुसऱ्या दिवशी उठताच, रामण्णांच्या हृदयात कुठेतरी एक खोल वेदना उमटली. आता ह्या गोष्टींचा स्वीकार करण्यास भय कसलं ? हृदयाला साक्ष ठेवून स्वीकार करायलाच हवा. परंतु दुसऱ्या दिवशी एक निराळीच भीती त्यांना ग्रासू लागली. कुमुदला कसं तोंड दाखवावं ? त्या रात्री तिच्याशी राक्षसासारखा व्यवहार केल्यावर तिच्यापुढे कसे जायचे ? तिच्यापासून आपला चेहेरा लपवायचा तरी कसा ? सकाळी चहापासून रात्रीच्या जेवणापर्यंत तीच तर आपलं सगळं पाहते शेवटी रामण्णा सरलाच्याच आश्रयाला गेले होते. उठल्यावर लगेच सरलाच्या खोलीत गेले. तिच्याजवळ बसले. तिच्या-बरोबरच चहा घेतला. परंतु रामण्णा फार फार बेचैन होते त्यांना कुमुदची भीती वाटली नव्हती. कुमुदच्या एकंदर वागण्यावरून, कुमुदच्या चेहेऱ्यावर एक प्रकारचे समाधान दिसत होते. रामण्णांच्या मनात शंका आली.. खरंच ही कुमुद दुसरीच दिसत आहे, का खरंच तिची मूळची कांती अशी तेजस्वी आहे. जरा साहस करून त्यांनी कुमुदकडे नीट ध्यान लावून पाहिले. तेव्हा लाजून आणि गालातल्या गालात हसून आपलं तोंड दुसरीकडे वळवलं होतं.

रामण्णांनी जरा डोकं हलविले. कदाचित् आठवणीचा तो लोंढा त्यांना सहन झालं नाही. खुर्चीवरून उठून खोलीतल्या खोलीत ते शतपावली करू लागले. मग एकदम मोठ्याने म्हणाले," त्या दिवशी गोड हसूनच तिने चेहेरा एकदम वळवला . .आज इतके

दिवस झाल्यावरही रामण्या ते दृश्य विसरले नव्हते. पण आज त्याच कुमुदला सिनेमाला घेऊन जायला ते तयार नव्हते.

कालचक्र कसं फिरलं होतं ? त्या दिवशी सरला तिथं घरात होती. तरीसुद्धा आपण कुमुदची शिकार केली होती. "आता हे काय ?" असं विचारणारी सरला आज जिवंत नाही. त्यावेळी तर कुमुदची स्थिती शिकाऱ्यापासून स्वतःला वाचविणाऱ्या हरिणीसारखी होती. पुन्हा कुमुदची ती लाजरी बुजरी मूर्ती पाहून, तिचं मंद स्मित पाहून असं वाटलं, की ही सारी निसर्गाचीच किमया आहे. आपण काही केलं, तरी कुमुदपासून आपल्याला तसं भय नाही ह्या विचारानं रामण्णांचं मन अगदी हलकं हलकं झालं होतं. सारा दिवस मोठ्या आनंदात, उत्साहात गेला होता. संध्याकाळी घरी आल्यावर तर एक मजाच झाली. तेव्हा ती मजा वाटली म्हणा. आता तीच खरी समस्या झाली होती. त्या दिवशी रामण्णा संध्याकाळी घरी आले तो काय ? घराचं सार रूपच पालटलं होतं. सगळीकडे नुसतं चकचकीत, स्वच्छ, ठीपटाप ! प्रत्येक वस्तु व्यवस्थित नीट लावून ठेवली होती.

तेव्हा त्यांनी सहजच विचारलं,

"अरे, हे काय ? आज काय सगळं घर धोब्याला दिलं होतं वाटतं ?"

त्यावर सरला चेष्टा करीत म्हणाली–

"काय हो ? आज तुम्हाला धोब्याची आठवण आली. मग तुम्हीसुद्धा रामा सारखा सीतेचा त्याग करणार का ?

क्षणभर रामण्णा घाबरूनच गेले. पण सरलाच पुढे बोलू लागली–

"असं बघता काय ? घरं सगळं साफसूफ करणारी दुसरीच कोणी तरी आहे. आता तुमच्या बायकोत ती ताकद राहिली नाही बघा. म्हणून तर म्हटलं, आता ह्या आजारी, रोगी बायकोला द्या टाकून . ."

सरलाचं बोलणं पूर्ण झालं नाही तोच सारी गोष्ट कळल्यामुळेच रामण्णा खळखळून हसले ! कुमुदनंच ही सारी स्वच्छता, आवराआवरी केलीय हे चटकन् त्यांच्या लक्षात आलं. पण सरलाच्या विनोदावर ते हसले ? का ? कुमुदच्या मनात आपल्याबद्दल विश्वास निर्माण झाला म्हणून ? आजसुद्धा कुमुदला नीट समजू शकले नाहीत. त्यांनी खोलीतली शतपावली थांबवली. घड्याळाकडे पाहिलं. साडेनऊ वाजले होते. त्यांनी दीर्घ सुस्कारा सोडला. त्यांनी विचार केला, चला, आता सिनेमाची कटकट तर गेली. . . ह्या जुन्या जुन्या आठवणींचा, जुन्या गोष्टींचा तर पुरता वैताग आलाय. तेव्हा ते एक पुस्तक हातात घेऊन पुन्हा खुर्चीवर बसले. दोन्ही पाय टेबलावर पसरले. आणि खुर्चीला पाठ लावून ते वाचू लागले.

८

कुमुदने विचार केला, जीवनातील ह्या उसळणाऱ्या आठवणींचा सिनेमा आज पाहावयास मिळाला . . . पण ह्या भुतकाळातील आठवणीत डुबून जाणं खरं म्हणजे चुकीचंच आहे. खोलीत आल्यावर बिछान्यावर पडल्या पडल्या तिला सिनेमाची आठवण आली.

एकदा ती सरलाताईला म्हणाली होती, "सिनेमात काम करायला छान वाटत असेल नाही !" त्या दिवशी . . . कोणता बरं तो दिवस होता ? तोच तो दिवस. बरोबर, आता आठवला. त्या आदल्या रात्री "तो प्रकार" झाल्यानंतर खरं म्हणजे ती आनंदाने उजळून गेली होती. त्या उत्साहाच्या भरात तिने केवढी आवराआवर, साफ-सफाई केली होती. सरलाताईने हाक मारली म्हणून ती तिच्या खोलीत गेली होती. थोड्यावेळाने रामणा तिथे आले. कुमुदला भीती वाटतं होती . . .ते आपल्याबद्दल काही सांगतील का ?

तेव्हा तर रामण्णा आपल्याकडे पाहून हसले होते. त्याच दिवशी ! संध्याकाळी जेवणाच्या वेळी गप्पा-गोष्टी चालू होत्या. जेवण झाल्यानंतर रामण्णा सरलाताईच्या अंथरुणाजवळ बसले होते. स्वयंपाकघरात ती एकटीच जेवण घेत होती. बाहेर नवरा-बायकोंची बोलणी चालली होती. अशावेळी ती मुद्दामच त्या बोलण्याकडे काही लक्ष देत नसे . . . कारण तिला माहीत होतं की रीतीप्रमाणे नवराबायकोंची बोलणी उगीच तिसऱ्याने ऐकू नयेत. पण त्या दिवशी मात्र का कुणास ठाऊक तिला त्यांची बोलणी ऐकण्याची मोठी उत्सुकता लागून राहिली होती . . . शिवाय जेवताना आणखी कुठलं दुसर काम करणार ? आपल्याविषयीच ह्यांच्या गप्पा चालल्या आहेत का, . . . ही शंकाही तिच्या मनात येऊन गेली. म्हणून तोंडातला घाससुद्धा मुळीच आवाज न करता चावत चावत ती त्या दोघांची बोलणी ऐकू लागली.

सरलाताईचा आवाज तिला ऐकू आला.

"आज तुम्ही पाहिलंत ? कुमुदनं घर कसं स्वच्छ आवरलंय."

"का, तू तिला कामाला लावलंस वाटतं ?" रामण्णांनी विचारलं.

"छे, तुमचं आपलं काही तरीच ! उगीचच्या उगीच तिला कामाला जुंपायला मला काही वेड नाही लागलंय !"

"मग आज एवढा उत्साह तिच्यात कसा शिरला ग ?"

"अहो उत्साह कसला ? आपल्या घरात, विचारीचा वेळ जाता जात नाही. मी तर इथे अशी अंथरुणावर खिळून पडलेली. ती बिचारी एकसारखी माझ्या जवळ जवळ

असते. बाहेर जायला तिला वेळच मिळत नाही. "तुम्ही तर काय, तुमच्या कामात दंग..."

"मग, तुला काय वाटतं, मी तिच्या बरोबर खेळू?" रामण्णांनी हसत हसत विचारले.

इकडे स्वयंपाकघरात बसलेल्या कुमुदच्या अंगावर काटाच आला.

"उगीच वाटेल ते बोलू नका हो. तुम्हाला मुळी कुणाची जरूरच नाही. जर तुमचे भाऊ-बहीण इथे असते तर त्यांना असंच इथं घरात सोडून तुम्ही बाहेर गेला असतात का?"

"छे ! छे ! अग, तसं नाही. तूच सांग, मी काय करू?

"काय करू म्हणजे काय? आज इतकी वर्षं मुलगी आपल्या घरात आहे. ती काय दुसऱ्याची आहे? तिलाही आपल्याशिवाय दुसरं कुणी आहे का?..आपणच तिच्याकडे पाहायला नको का?"

रामण्णा मध्येच म्हणाले,

"तिच्याकडे पाहायचे ह्याचा अर्थ काय? बाहेर जाताना तिला काय खिशात घालून घेऊन जाऊ?

"अहो, मी काही तुमच्यासारखी साहित्यिक नाही. तुमच्यासारखं लफ्फेदार बोलणं मला कुठं येतं हो? इतर चार सामान्य माणसं बोलतात तशीच मी बोलते. तिला खिशात कशाला घालायला हवं? मला माहीत आहे. तुमचा डोळा तर नेहेमीच खिशावर!..."

"अग, कुठल्याकुठे गोष्ट नेलीस तू? तुझ्या बहिणीपासून गोष्ट सुरू झाली आणि माझ्या खिशापर्यंत येऊन ठेपली...हा...हा..."

रामण्णांचं बोलण ऐकून कुमुदला हसू आलं. त्या आपल्या हसण्याची आठवण येऊन कुमुदच्या चेहेऱ्यावर आजही हसू फुलले. सरलाताईसुद्धा बोलण्यात किती चतुर होती.

"तुम्ही तर कुणासाठी एक पैसासुद्धा खर्च करणार नाही."

"तुला कशाला पैसे पाहिजेत?"

"अहो, मला कशाला पैसे हवेत? बिछान्यावर पडून मला इतका कंटाळा आलाय! आता मला फक्त विष खाण्यापुरतेच पैसे हवेत!"

हे ऐकून इकडे कुमुदच्या घशाखाली घासच उतरेना. ती दचकली.

"हे बघ सरला असं आडून आडून कशाला बोलतेस? स्पष्ट सांग. तुझ्यासाठी खर्च करताना मी कधी मागं पुढं पाहिलं तरी आहे का?"

"अहो, मला कशाला पैसे हवेत ? पुन्हा पुन्हा सांगते. तर तुम्ही माझ्याच बद्दल विचारता. मी तुम्हाला कुमुदच्या बद्दल सांगत होते हो. बिचारीला दिवसभर किती घरातलं काम पडतं ! वेळ जाता जात नाही तिचा. म्हणून पुन्हा आणखी काहीतरी काम काढून बसते. कधी कुठे बाहेर तरी जाते का ? कधी सिनेमा नाही. . घरात लहान मुलं असती तर तिला जरा करमणूक ही झाली असती !"

"अग वेडाबाई, पुरे आता. जास्त बोलू नकोस. दमून थकून जाशील बघ. रडू नकोस ग. कुमुदला सिनेमाला जायचंय ? चला, केव्हा पाहिजे तेव्हा घेऊन जातो. मला वाटलं, काही विशेष आहे. ह्यासाठीच का तुला एवढं वाईट वाटत होतं !"

ह्यावर सरला म्हणाली होती.

"जाऊ द्या हो !"

कुमुदला एवढेच ऐकू आले. जेवण आटोपून ती बाहेर येईपर्यंत रामण्णा आपल्या खोलीत निघून गेले होते.

दुसऱ्या दिवशी सरलाताईने तिला सांगितले,

"कुमुद, आज ह्यांच्या बरोबर तू सिनेमाला जा !" त्यांना एकट्याला सिनेमाला जायला आवडत नाही. मला विचारत होते. तुझ्याबद्दल. . तुला घेऊन जाऊ का ?"

सरलाताईचे बोलणे ऐकून, तिचे सौजन्य पाहून कुमुद गालातल्या गालात हसली.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी, सिनेमाहून परतल्यावर कुमुद सरलाकडे धावत धावत गेली. तेव्हा तिने विचारले.

"पाहिला का सिनेमा ?"

"पाहिला ग ताई ! इंग्रजी सिनेमा होता. फार छान होता. . .कुमुद अगदी आनंदात होती.

"इंग्रजी सिनेमा ? कथा समजली ?"

"त्यांनी समजावून सांगितली."

"वा ! छान." काय गोष्ट होती, सांग तर खरी !

"त्या सिनेमाची कथा कौटुंबिक होती बघ. नवरा बायकोचं एकमेकांवर गाढ प्रेम होतं . . . एकदा नवरा, एका धूर्त स्त्रीच्या जाळ्यात सापडतो तेव्हापासून तो आपल्या बायकोकडे धड पाहायलासुद्धा तयार नसतो. त्यांना आठ वर्षांचा एक मुलगा असतो. तो माणूस आपल्या बायको मुलाला घराच्या बाहेर हाकलून देतो. लोक त्या बाईला सल्ला देतात. . . . .असल्या नवऱ्याचा संबंधच सोडून दे. पण त्या बाईला ते पटत नाही. तिचा ठाम विश्वास आहे की आपल्या

नवऱ्याचं आपल्यावर खरंखुरं प्रेम आहे. आज ना उद्या ती धूर्त स्त्री आपल्या नवऱ्याला फसवून निघून जाईल आणि मग आपल्या नवऱ्याचं रक्षण आपणच करायला पाहिजे अशी तिची पक्की समजूत होती. ती आपल्या पतीची वाट पाहात होती. परंतु त्या माणसाला आपल्या बायकोची क्षणभर सुद्धा आठवण येत नव्हती. इकडे त्या बाईला, मुलाला धड खायला मिळत नव्हतं. ना अंगभर कपडा मिळत होता. तरीसुद्धा तिच्या नवऱ्याला काही अक्कल आली नाही. शेवटी त्या धूर्त स्त्रीने त्या माणसाचा सारा पैसा खर्च करून टाकला. उरला सुरला पैसा घेऊन ती बया त्याला सोडून पळून गेली. तो माणूस बिचारा हताश, निराश होऊन गेला. आता कुठे जाणार ? जीवन कसं जगणार ? आपल्या बायकोला तोंड दाखवावयाचीसुद्धा त्याला लाज वाटू लागली. शेवटी निराश होऊन तो आत्महत्या करायला निघाली. . . तेवढ्यात त्याची बायको आली. मग सर्व जण सुखात राहू लागतात."

"सरलाताई शेवटी शेवटी तर मला अगदी रडू आलं बघ त्या नटीने तर किती सुंदर अभिनय केला .... खरोखर मला वाटलं, ती स्त्री अगदी हुबेहूब तशीच असेल बघ!"

सरला हसत हसत म्हणाली,

"चल, वेडी कुठली ?"

कुमुद अगदी गोंधळून गेली. . ."ताई मग ती सुंदर अभिनय कशी करू शकली ग ?"

"त्यात काय ? त्या बायका अशाच असतात बघ. सिनेमात फक्त अभिनय करायला येतो त्यांना. बाकी काही नाही."

"मग अशा आदर्श पत्नीचं काम करणारी. . .

"काही सांगू नकोस. किती लग्न झाली असतील तिचं तिलाच माहीत!"

सरलाताईचं बोलणं ऐकून कुमुद हादरूनच गेली. तिचा घाबरा घुबरा चेहेरा पाहून सरला हसूच लागली.

"अग, इतकं घाबरायला काय झालं ? खोटं नाही सांगत मी. वाटल्यास तू 'ह्या'ना विचार. ही लोकं किती वेळा लग्न करतात आणि किती वेळा सोडचिठ्ठी देतात.

"अय्या, असं आहे ?". . .कुमुदने निराश होऊन विचारले, सरलाताईने विचारले,

"तुला इतकं बाईट का वाटलं ?"

कुमुदने आपला अल्लडपणाच दाखविला. सिनेमाची कथा ऐकून कुमुदला वाटलं, सिनेमात अभिनय करणे खरंच किती कठीण आहे नाही !

"असं जर आहे तर तशीच कथा लिहायला हवी. विवाहानंतर प्रेमाने राहायला हवे. . .म्हणून का ही कहाणी लिहिली ?. . .सरलाने खूप सांगून पाहिले मग लग्न झाल्या-नंतर प्रेमाने राहायचे. . .अशी कथा कशाला लिहिली ?"

सरलाच्या बोलण्याने कुमुदचा भ्रम दूर झाला. सरलाने तिथेच गोष्ट संपविली नव्हती. आपण स्वतः पाहिलेल्या काही सिनेमांच्या चांगल्या गोष्टी ती कुमुदला सांगू लागली.

"हे बघ कुमुद, तू तो सिनेमा पाहिलास ना ? पत्नीला, पती आणि मुलगा यांच्या शिवाय दुसरीकडे कुठेच सुख नाही. स्त्रीच्या हृदयात नेहेमीच मातृहृदय लपलेले असते. तू पाहिलेस ना ? इतके कष्ट देऊन मुद्धा तिने आपल्या पतीला वाचविले. इतके कष्ट सोसून सुद्धा स्त्रीने आपल्या नवऱ्याला वाचविले. पुरुषांना आपल्या नवरेपणाचा मोठा अभिमान असेल, अहंकार असेल, पण संकटे आल्यावर हात धरून सांत्वना देणारी स्त्रीच ! आता बघ. 'हे' किती गोष्टी लिहितात. पण एका कथेत तरी वाचलंस का की स्त्रीला सुख मिळालं आहे. एकदा मी त्यांना विचारलं सुद्धा होतं, 'स्त्रीच्या वाटचाला एवढं दुःख कशासाठी !' तेव्हा 'हे' काय म्हणाले माहीत आहे ?'. . आपलं केलेलं भोगतात, दुसरं काय ? . . .करणं भोगणं हे सगळं काल्पनिक झालं. गोष्टीतलं ! स्त्रीला काय हवंय ? हे जाणून घेतल्याशिवाय, लिहिणारा तिला नेहेमीच तिला चुकीच्या पद्धतीने रेखाटतो. लेखकच चुकीच्या रस्त्याने चालत आहे, तर त्याची पात्रेही तशीच चुकीच्या रस्त्याने जातील. तूच सांग, खरं आहे की नाही ? "तुला काय कळतंय ? तू तर जुन्या काळातील स्त्री आहेस" म्हणून माझी चेष्टा केली तेव्हा मी म्हटलं— ह्यात नवा काळ कुठला ? आणि जुना काळ कुठला ? स्त्री तर सदैव स्त्रीच आहे. ह्या नवीन युगात स्त्रीला काय मिशा उगवल्या आहेत ?"

सरलाच्या ह्या गोष्टी ऐकून कुमुदला हसून हसून पुरेवाट झाली.

पण त्यावेळी जी गोष्ट हसण्यासारखी वाटली तीतच तिला आज मोठा अर्थ सापडला होता. पण आता ती ते कुणाला सांगणार ? सरलाताई तर सुख-दुःखाची ही दुनिया सोडून दूर दूर निघून गेली होती. आज जर ती जिवंत असती तर तिने हे सारं तिला सांगितलं असतं ? कसं सांगितलं असतं ?

"तुझ्या पतीवर माझा जीव जडलाय. तुझे यजमानसुद्धा माझ्यावर प्रेम करताहेत बघ. . .मला वाटलं तर आताच मला पती, मुलं ह्याचं सुख भोगायला मिळेल. ताई. मी तुझा उपदेश ऐकला." हे सारं ती सरलाताईला सांगू शकत होती ? नवरा मुलं बाळं. . . सरलाताईने दोघांच्या बद्दलही सांगितलं होतं ना ?

लग्न न करता मुलं होणं यात सुख कोणतं ? आणि नवरा असून मूलं नाही तर तेही जीवन दुःखीच. मुलं, नवरा आहेत पण विवाहसंबंध नाही तर कुठलं सुख ? स्त्रीचं जीवनच किती परस्वाधीन आहे आणि किती गुंतागुंतीचे आहे.

सरलाताईचं ते सारं बोलणं कुमुदला अगदी स्पष्ट स्पष्ट आठवत होतं. बिचारीला मुलं बाळं झाली नाही म्हणून किती दुःखी होती. म्हणूनच तिला सिनेमात काम करण्याची इच्छा झाली होती. स्त्रीला सुखाची आशा राहिली नाही की तिला वाटतं सिनेमाच्या व्यवसायात पडावं. तिच्यात ती योग्यता असेल, तर ती प्रयत्न करील. मग पैसा आणि कीर्ती ! कमीत कमी एवढे तरी मिळेलच ना !

विचारांच्या ओघात, तिला समजलं. . .ती बिछान्यावरून उठून टेबलावरील आरशाच्या समोर उभी आहे. क्षणभर तिने आपलंच प्रतिबिंब ओळखलं नाही . आणि हे कोण समोर उभे म्हणून ती गोंधळात पडली. . .लगेच तिचा लक्षात आलं ! तिच्याकडे कोण येणार ?. .लोक तर काय केव्हापासूनच तोंडाला येईल ते बोलत आहेत. शेजारणी तिला बघून अशा बिचकतात, दचकतात, की जणू काही ती एखादी अस्पृश्यच आहे. खरं म्हणजे तिला ह्या जगात कोणी नाही. इतकंच काय, पण रामण्णा सुद्धा तिचे कोणी नाहीत. कशी वेडाबाई आहे ती. रामण्णांना तिने आपलेच मानले आहे. रामण्णांसाठी ती जितकी वेडी झाली आहे. तितकेच रामण्णा पण तिच्यासाठी वेडे झाले आहेत ह्याचा तिला पूर्ण विश्वास आहे. इतकंच काय ? तिने किती स्वप्ने रचली आहेत. !

तिने पुन्हा आरशात पाहिले. हा कुणाचा चेहेरा ? हा सुकलेला, लाडीक चेहेरा तिचाच ? सरलाताई किती वेळा म्हणायची, "कुमुद, माझी दृष्ट लागायची बाई तुला !"

मृत्यूपूर्वी एक महिना आधी सरलाताईने हेच वाक्य पुन्हा पुन्हा उच्चारले होते. . . आता त्या गोष्टीला चार महिने झाले होते. एवढ्यात किती फरक पडला ? ह्या जगातून निघून गेलेल्या सरलाताईची खरंच तिला दृष्ट लागली नाही ना ! का, सरलाताईच्या विरुद्ध तिने हे जे सारे केलं...त्याबद्दल तिचा शाप तर तिला लागला नाही ?

आपल्या ह्या चालचालणुकीत दोष अवश्य आहे. .ह्याची कुमुदला पूर्ण कल्पना आहे. सरलाच्या मृत्यूनंतर तर तिला ही गोष्ट फारच टोचली. जिने आपल्याला आश्रय दिला, जी आपलं पालन पोषण करतेय अशी स्त्री अंथरुणाला खिळून पडली असताना तिच्या नवऱ्याशी असे संबंध ठेवणे हा एक प्रकारचा द्रोहच आहे. हे पापच आहे. . .! ती आरशातील आपल्या प्रतिबिंबाशी बोलू लागली– "तू पापी आहेस, पापी ! तुझे तोंड सुद्धा पाहायला नको".

एवढे बोलून ती रागाने अंथरुणावर जाऊन बसली. पुन्हा ती विचार करू लागली. हे पाप आहे ? ही चूक आहे ? तसं बघायला गेलं तर त्यात चूक कसली ? तिला अजून त्या साऱ्या गोष्टी आठवतात. ज्याला ती आता पाप म्हणतेय त्याची सुरुवात कशी झाली ? कुणी केली ? तिच्या डोळयासमोर सारे स्पष्ट स्पष्ट दिसू लागले. आठवायची गरजच पडली नाही. पण मन मात्र त्या आठवणींनी नुसतं तरफडत होतं.

सिनेमा पाहून परत येण्याचा तो प्रसंग...सिनेमा पाहताना, रामण्णांच्या जवळ बसायला मिळालं. त्यांचा सहवास घडला. त्यामुळे दुसऱ्या दिवशी कुमुद विशेष खूष होती. उत्साह आनंद नुसता ओसंडत होता. हा तिचा उत्साह वाढण्याचे आणखी एक कारण होतं. खूप प्रयत्न केल्यानंतर एकदा तिची आणि रामण्णांची दृष्टिभेट [झाली. नजरेला नजर मिळाली. तेव्हा तिच्या लक्षात आलं' रामण्णा तिच्याकडे पाहून हसत आहेत. तेव्हा लाजलाजून तिने आपला चेहेरा वळवला. तरी सुद्धा तिला रामण्णांचा तो हसरा चेहराच डोळयांसमोर दिसू लागला. दिवसभर तिचे पाय जमिनीला लागतच नव्हते. जणू काही नेहेमीच्या साध्यासुध्या चालण्यातही नृत्याचा आनंद आला होता. खूप वेळ कडक ऊन पडल्यावर, ढग पसरले तर त्यात आश्चर्य ते कसले ? असाच एक ढग येऊन गेला.

सरलाताई रामण्णांना सांगत होती–

"अहो, आपली कुमुद सिनेमात काम करणार म्हणतेय !"

"हो, का ?" ..रामण्णाने एवढेच उत्तर दिले. आणखी काही तरी चेष्टेने, पण मनाला लागेल असे ते बोलून गेले होते... काय बरं बोलले ते ? (छे! जे आठवायला हवे, ते काही जळ्ळं आठवता आठवत नाही. आणि नकोत त्या गोष्टी मात्र एकसारख्या छळतात). जाऊ दे झालं, ..त्यांच्या त्या बोलण्यावर सरलाताईचं हसणं आणि आपल्या मनाला झालेल्या वेदना. रामण्णा बाहेर निघून गेले. ! पण कुमुदला खाण्याची इच्छाच राहिली नाही. बाकीचं सारं काम तिनं आटपून टाकलं. बाहेर अंथरुणावरून सरलाताईने विचारले.

"कुमुद, ऐकलंस का, तू ते काय म्हणाले ते !" कुमुद ह्यावर काहीच बोलली नाही. काम आटपून ती बाहेर आली. आणि म्हणाली,

"ताई, तुला काही हवंय ?"

सरलाताई चटकन् म्हणाली.

"अग हे काय.... जेवण झालं तुझं, इतक्यात ?"

"नाही ग, मला भूकच नाही मुळी."

"का ? भूक नसायला काय झालं ?"

"का कुणास ठाऊक. माझं डोकं फार ठणकतंय !"

"डोकं दुखतंय ? कशानं ? ... उगीच काही तरी थापा नको मारूस. मघा पर्यंत चांगली हसत होतीस, गप्पा मारीत होतीस आणि आताच डोकं दुखायला लागलं ?"

"नाही ग ताई. खरंच सांगते, डोकं दुखतंय, फार फार दुखतंय....

सरलाने क्षणभर कुमुदकडे पाहिलं आणि मग म्हणाली, "का, 'ह्यांच्या' बोलण्याचा राग आला का तुला ?"

"कुणाचं बोलणं ?"

कुमुदच्या बोलण्यातला दुरावा सरलाताईला समजला. ती म्हणाली,. . ."चल ग मला सगळं ध्यानात आलं !"

"नाही, ग, तसं नाही !"

"वेडाबाई, आज इतके दिवस इथे राहतीस तू. अजून तुला ह्यांचा स्वभाव कळला नाही ? ते उगीचच चेष्टा करतात. त्यांच्या मनात काही नसतं."

"नाही ग ताई, तू काय म्हणतेस ते मला काऽही समजतंच नाही बघ."

"अग, माझ्या समोर कशाला ढोंग करतेस ? मला सारं समजलं, तू त्यांच्यावरच रागावली आहेस बघ. वेडाबाई, ते काय बोलतात त्याचा त्यांनाही धड पत्ता नसतो बघ. त्यांच्या डोक्यात एखादा नवा विषय घोळत असला ना.. किंवा कधी काही नवीन लिहिण्याची स्फूर्ती आली तर सुरू करी पर्यंत जो समोर येईल ना त्याची चेष्टा करीत बसतात. परवाच मला म्हणत होते. अग तुझं नाव सुद्धा त्यांच्या लक्षात रहात नाही बघ. नेहेमी आपले तंद्रीतच असतात. मला सारं समजतं ! आज ना उद्या तुला त्यांच्या स्वभावाची कल्पना येईलच बघ." हसत हसत सरलाताई पुढे म्हणाली,

"जा, आपलं ताट घेऊन ये. माझ्याशी गप्पा मारता मारता थोडंसं खाऊन घे. बघू दे, कशी भूक नाही ते !"

छे ! पण कुमुदचं मनच लागेना. मनात वेदना सलत होती. तिला जास्त वेळ उभं सुद्धा राहता येईना.

"नाही ग. माझ्या डोक्याला अगदी ठणका लागलाय बघ. . .तुला काही लागलं तर मला बोलाव. मी येईन लगेच...." एवढं बोलूनच ती आपल्या खोलीत धावली.

खोलीत आल्यावर सुद्धा तिचं मन स्थिर झालं नाही. खोलीत अंधार दाटला होता. पण दिवा न लावताच ती अंथरुणावर पडून राहिली. तिचं सारं लक्ष बाहेरच्या दरवाज्याकडे होतं. बाहेरच तिथे तिला पावलांची चाहूल लागली. ती हळूच उठली. पावलांचा मुळीसुद्धा आवाज न करता ती सरलाच्या दरवाज्याजवळ लपून बसली. आत

गप्पा चालल्या होत्या. स्पष्ट असं काही ऐकूही येत नव्हतं. शेवटी तिने रामण्णांचा आवाज ऐकला. "छे ! छे ! अग हे काय ? तिला एवढं वाईट वाटत असेल तर मी तिची माफी मागतो . . तिला बोलावून आणतो." तो आवाज जसजसा जवळ आला, तसं तसं तिला वाटलं, रामण्णा जवळ जवळ येत आहेत. तिला पाहून ती चांगलीच घाबरली आणि पुन्हा बिछान्याकडे आली.

काळ अनंत आहे. . कुमुदच्या मनात तेव्हाच विचार येऊन गेला. रामण्णांच्या येण्याला दोन एक मिनिटं लागली. तेवढ्यात तिला वाटलं की, जणू काही ती अनादि काळापासून त्यांचीच वाट पाहत आहे. धडाधडा आल्यामुळे आणि भीतीमुळे तिचे मन अगदी बावरून गेले होते. . हृदयाची ही धडधड रामण्णांना ऐकू येऊ नये म्हणून तिने आपले दोन्ही हात छातीवर ठेवले. इतक्यात रामण्णा आले. खोलीत प्रकाश नव्हता. . . ते जरा दचकलेच. '.. कुमुद. . . कु. . . मु. . . द . .' म्हणून त्यांनी हाक मारली. त्यांना काहीच उत्तर मिळालं नाही. काय उत्तर देणार ? तिला भीती वाटली की तिनं उत्तर दिलं, तर ते दरवाज्यातच उभे राहून बोलत बसतील. आत येणारच नाहीत. . . . स्वतःच्याच हृदयाची धडधड ऐकत बसली. रामण्णा आत आले. आणि पुन्हा त्यांनी कुमुदला हाक मारली. 'कुठे आहेस कुमुद ? झोप लागली का तुला ? . . .' बोलता बोलताच ते कुमुदच्या बिछान्याच्या कडेला बसले.

'डोकं दुखतंय का तुझं' . . . विचारता विचारताच त्यांनी आपल्या बोटांनी कुमुदचं डोकं दाबलं. . . . मोक्ष कोणता ? सुख–दुःख देश काल इत्यादी तारतम्याच्या पलिकडे एक सत्य आणि सात्त्विक सुखद अवस्था ! !

कुमुदला ह्या गोष्टीचा पत्ताच नव्हता. तिला जर कळतं तर त्याच वेळी तिला जणू मोक्षप्राप्ती झाली असती. कुमुद अशी बेभान होऊन गेली-- जणू जिवंतपणीच ती अमर झाली.

"खरंच, तुझं डोकं दुखतं का ? वेडाबाई. डोकं दुखायला पहिल्यांदा डोकं तरी हवं ना ? खरंच तुला डोकं असतं ना तर माझी गोष्ट छान समजली असती बघ. . . . चल बघू. उठ लवकर, जेवून घे. सरलाला किती वाईट वाटेल ?"

कुमुदला पहिल्या गोष्टीचं हसू आलं. पण मग सरलाताईला वाईट वाटेल हे ऐकून तिला पश्चाताप झाला. पण ती उठली नाही. . . . रामण्णा मनाशीच काहीतरी कुजबुजले आणि शेवटी तिचा हात पकडून तिला बाहेर घेऊन आले. 'कुमुदच्या शरीरातून जणू वीजच सळसळून गेली. रामण्णांच्या हाताचा स्पर्श झाल्यावर तिचे मन आणखीच जोराने उसळ्या मारू लागले. तिचा हात धरताना रामण्णांचे हात कडक झाले होते. कुमुदला एक एक क्षण युगा युगासारखा वाटू लागला. . . . पण इतक्यात रामण्णा म्हणाले—

"अग सरलासाठी तरी तू जेवण करून घे. तसं असेल तर मी माफी मागतो तुझी. माझी चूक का झाली काही ?"...रामण्णा कुमुदला खोली बाहेर घेऊन आले.

त्या रात्री जेवताना कुमुदचं कुठे लक्षच नव्हतं. 'बरं झालं बाई, पोटभर जेवलीस ना ?' सरलाताईने असे विचारले तेव्हा कुठे तिला कळलं की आपलं जेवण आटोपलं आहे.

'डोकं राहिलं का ? कदाचित् भूक लागली असेल म्हणूनच डोकं दुखतंय असं वाटलं असेल तुला. ह्या वेडाबाईला काही कळलंच नाही.'

सरलाताईनं अशी चेष्टा केल्यावर कुमुदला वाटलं' आपण किती जेवलो कुणास ठाऊक.

'पोटभर जेवावं माणसानं, मग कुणाचं बोलणं मनाला लागत नाही... सरलाताईनं थट्टा केली होती, खरं म्हणजे कसं तरी जेवण आटपून, आणि सरलाताईच्या मनातली शंकेची जळमटं काढून टाकून ती परत आपल्या खोलीत आली.. एखाद्या मोठया संकटातून स्वतःचा बचाव करूनच जणू काही ती परत फिरली होती एक दीर्घ सुस्कारा टाकून ती अंथरुणावर पडली. दिवा लावला तर मनातील विचार कुठेतरी पळून जातील ह्या समजुतीने तिने खोलीतला दिवासुद्धा लावला नाही. तिच्या मनाला एकसारखा एकच विचार छळत होता. रामण्णा म्हणाले होते—

'नंतर मी तिची क्षमा मागेन.'...

ते पुन्हा आपल्या खोलीत येतील ? मग तर दिवा लावूनच ठेवला पाहिजे. पण त्या दिव्याच्या प्रकाशात रामण्णांना तिचा लज्जेने आरक्त झालेला चेहेरा दिसेल ना ! म्हणून तिने ठरविले दिवा लावायचाच नाही. अंधारातच ती दरवाज्याकडे टक लावून बघत राहिली. खरंच रामण्णा आले तर ? खरंच ते क्षमायाचना करू लागले तर ? त्यांना काय सांगायचं ? छे ! हा कुठला वेडपटपणा. रामण्णासारखे पुरुष तिची माफी मागतील हो ? आपणच आधी सगळं सांगून टाकायला हवं होतं ! रामण्णा मात्र खरंच थट्टेखोर आहेत. 'तुला काऽही डोकं नाही' म्हणता म्हणताच आपल्या डोक्यावरून हात फिरवीत होते.

इतक्यात तिच्या कानावर हाक आदळली—

'कुमुद...'! ती दचकली रामण्णांचाच आवाज होता. 'अरे देवा. आले वाटतं !' ...ती ताडकन् उठणार होती. पण पावलांनी तिच्या इच्छेला साथ दिली नाही. उठून तीच त्यांची क्षमा मागणार होती. पण कुमुदच्या तोंडातून शब्दच फुटेना. खोलीत पसरलेल्या अंधाराने तिला धैर्य दिलं ! तिच्या जरा जिवात जीव आला. आपली ही

अवस्था त्यांना दिसणार तरी नाही. . . . कुमुद उठली नाही. रामण्णांच्या लक्षात सारं काही आलं. ते सरळ येऊन तिच्या पलंगाच्या काठावर बसले.

'काय म्हणतंय डोकं ?'

आता उत्तर काय देणार. कपाळावर आलेल्या तिच्या केसांच्या लटा रामण्णांनी मागे सारल्या. तिला काहीच उमगेना. काय उत्तर देणार ती ?

मग रामण्णा म्हणाले. 'कुमुद मी तुझी क्षमा मागायला आलोय. . . . तू हो म्हणशील तेव्हाच मी बाहेर पडेन बघ.'

तेव्हा कमीत कमी हो तरी म्हणायला हवेच होते. त्या शब्दावरच तिचे भविष्य अवलंबून होते. . . तिला तोंड सुद्धा उघडता येईना.

'मी म्हटलं ना. तू मला क्षमा केल्याशिवाय मी इथून बाहेर पडणार नाही !' बोलता बोलताच पाय ताणून देऊन रामण्णा बिछान्यावर पसरले.

कुमुदचं सारं शरीर थरथरू लागलं. . . .पण रामण्णांना काहीच दिसत नव्हतं.

"अरेच्या, तुला ताप तर नाही ना आला ?' त्यांनी कुमुदच्या पोटावर हात ठेवला. तिचे सारे शरीर थरथरत होतं.

'काय, ग, मला क्षमा करणार नाहीस ? अगदी हट्टी पोरगी आहेस बघ तू.' रामण्णा कुमुदच्या कानात कुजबुजले, रामण्णांचे तोंड तिच्या तोंडाजवळ आले. "चल, आता घाबरण्याचं नाटक पुरे. . . . बोलता बोलताच त्यांनी डावीकडे वळून, उजव्या हाताने कुमुदला जोराने कवटाळून घेतलं. कुमुदला काय झाले होतं कुणास ठाऊक. तिच्या तोंडातून शब्द म्हणून फुटेना. तिचे ओठ अर्धवट उघडले होते.

"कुमुद, तू तोंड बंद ठेवणार असशील ना तर मीसुद्धा तुझं तोंड बंद करून टाकीन बघ !" असे म्हणतच त्यांनी कुमुदच्या ओठावर आपले ओठ टेकले आणि उजव्या हाताने तिला आपल्या जवळ ओढून घेतले.

त्या रात्री कुमुदच्या मनात एक विचित्र भीती निर्माण झाली ! निसर्गाने स्त्रीसाठी कोणता धर्म पुढे ठेवला आहे. ह्याची तिला कल्पनासुद्धा नव्हती. तिला एवढे मात्र कळले की, हा रस्ता तसा सोपा, सहज नाही. मग सत्य कोणते ? शरीराला पीडा ? का मनाला मोठा आनंद ? कधी कधी त्या वेदनेतही केवढा मोठा आनंद होता तिला हे उमगलं नाही. रामण्णांनी तिच्या वक्षस्थळाला स्पर्श केला. त्या हातामध्ये सत्त्व होते. हे सुख, का दुःख तेच तिला कळेना. तिच्या ओठांवर रामण्णांचे ओठ टेकलेले होते. तिचा खालचा ओठ चावला गेला, तेव्हा तिला वाटले, रक्ताबरोबर सुखही नुसते ओसंडत आहे. किती असह्य जीवघेणी वेदना. पण पुन्हा तिला वाटले. की ही वेदनाच नव्हे. नाही नाही म्हणताच, हो, होची भावना प्रबळ ठरली. जणू एखादे लहान मूल मांडीत शिरले !

रामण्णांच्या तोंडातून निघालेले शब्द. . . .'कुमुद, कुमुद'. तिच्या मनात खोलवर शिरले. . . त्या दोनच शब्दांनी तिला जणू प्रेमालिंगन दिले. कुमुदनेही रामण्णांच्या शरीराला आपल्या हातांनी घट्ट मिठी मारली! ...आपल्या छोटयाशा बाहूत रामण्णांना समावून घेण्याची एक धाडसी प्रेमइच्छा तिच्या मनात निर्माण झाली.

'प्रेम'. . हा शब्द आठवताच, कुमुद स्वप्नातून जागी झाली. जुन्या आठवणी तिने झटकून टाकल्या. जोराने श्वास घेतला.

'प्रेम' ह्या शब्दाचा दोन वर्षांत चांगलाच बळी गेला. 'कुमुद कुमुद' हाक मारून ज्यांनी अंधारात आपले हृदय तिच्या पुढे उघडे केले होते. . . .त्याच रामण्णांबद्दल तिला काऽही वाटतं नव्हते. ती विचार करू लागली. आता तो विचार कशाला ? त्या पहिल्या रात्री ती चूक झाली ? रामण्णा असे विचित्र वागले नसते तर मग तिने तरी एवढे साहस केले असते ? तिची काहीच चूक नव्हती. हे सारं पाप तिनं स्वतःच्या इच्छेने केले ? छे ! सारं खोटं आहे. जें घडले तेच सत्य. विचार करता करताच तिने दीर्घ सुस्कारा टाकला आणि ती अंथरुणावरून उठली! आता जागत बसलो तर ह्या आठवणी आपला पिच्छा सोडणारच नाहीत ती झोपायची तयारी करू लागली. चादर ओढून घेता घेता तिचे हात तिथेच स्थिरावले. . . .आणि एखाद्या पुतळयासारखी ती स्तब्ध उभीच राहिली.

## ९

एखादी गोष्ट सहजपणे मिळते तेव्हा माणसाला सुरुवाती सुरुवातीला मोठी आशा वाटते. आणि ती गोष्ट एकदा मिळाली की तिचा तिरस्कार वाटू लागतो. रामण्णा आश्चर्यचकितच झाले. त्यांच्या मनात हा विचार कसा आला ? हातातले पुस्तक ते वाचू लागले. ह्या पुस्तकामुळे ? छे ते शक्य नाही. . . .मग आपण जी पुस्तके लिहितो त्यामुळे ? . . .त्यांना ह्या गोष्टीचा तसा नेहेमीच अनुभव आला होता. एखादी गोष्ट महत्त्वाची वाटली की ती लिहून काढण्यासाठी ते अगदी बेचैन होऊन जात. नंतर ती कथा सुरू करून काही दिवसांत पूर्ण करून टाकल्यावर त्यांना त्या कथेविषयी केवढी आत्मीयता वाटते. का ? थोडयाच दिवसांत लिहून झालेले पुस्तक एकदम महत्त्वपूर्ण कसे होते ? . . .पण हा विचार आताच कसा डोकावला ? आता आपल्या हातात पुस्तक

आहे म्हणून ? हातात पुस्तक पुस्तकापेक्षा 'हातात आहे' हे महत्त्वाचं. आतापर्यंत जुन्या आठवणी एकसारख्या दाटून येत होत्या. दोन अडीच वर्षांपूर्वी कुमुद त्यांच्या बाहुपाशात होती. त्याची आठवण त्यांना आली.. .आता त्यांच्या मनात कुमुदविषयी एक प्रकारची जुगुप्सा आहे म्हणूनच त्यांचे आंतर मन समाधानी आहे. ते समाधान त्यांच्या बाह्य मनालाही दिसले. . . .म्हणून का हा विचार डोकावला ? सहज एखादी गोष्ट प्राप्त झाली की सुरुवातीला त्याबद्दल जास्तच आशा वाटते, हे सत्य आहे. त्यांच्या आणि कुमुदच्या बाबतीत तर ही गोष्ट अक्षरश: सत्य होती. त्या दिवशी कपाटाच्या जवळ कुमुदला मिठीत घेताना रामण्णांनी तिच्या चेहेऱ्यावर ओसंडलेला आनंद त्यांना दिसला होता. त्यांच्या मनात एक आशेचा अंकुर निर्माण झाला होता. त्यांना वाटत होते. . .कुमुदला आपण आवडलो आहोत. पण तरीसुद्धा त्यांना पूर्ण खात्री वाटत नव्हती. एखाद्या वेळी सरलानेच तिच्या मनात ही गोष्ट भरून दिली असेल. कुणास ठाऊक. ह्या विचारानेच ते शहारले तो प्रसंग आठवला की रामण्णांचा चेहेरा खुलून जाई. दुसऱ्या दिवशी मात्र रामण्णा सरलाच्या जवळ जवळ घोटाळत राहिले. त्यांना कुमुदच्या चेहेऱ्यावर भय, किंवा राग दिसला नाही. उलट तिच्या भुवया त्यांना एखाद्या स्वागतमंडपाच्या कमानीसारख्या दिसल्या. त्यामुळे त्यांची आशा पालवली. . . .आपले मन. . .कसे कुठे चालले आहे हे समजावून घेण्याचा त्यांनी प्रयत्न केला . . . रामण्णांनी विचार केला. . . . छे, आता कुमुदचा संपर्कही नको. सरलाच्या जवळ बसून गप्पा मारता मारता त्यांना आदल्या रात्रीचे स्पर्शसुख आठवले. आणि त्यांच्या तोंडाला पाणी सुटले. सरलाने गालातल्या गालात हसून म्हटले. . . "देवा, मला हे सारं सहन करण्याची शक्ती दे !" . . . आजूबाजूचा संदर्भ ध्यानात न आल्यामुळे रामण्णा एकदम दचकलेच. आणि त्याच्या तोंडातून सहज उद्‌गार बाहेर पडले.

'काय, काय म्हणालीस ?'

सरला हसत हसत म्हणाली– 'छे, काही नाही हो !' आणि मग तिने आपल्या अशक्त हाताने रामण्णांचा हात दाबला. . . . किती वात्सल्य . . . ममता !

त्या दिवशी घराची स्वच्छता झाल्यावर आणखी एक विशेष गोष्ट झाली. . . . कोणती बरं ? हो, बरोबर. आता आठवलं !

दुसऱ्या दिवशी कुमुदला सिनेमाला घेऊन जाण्याचा तो प्रसंग ? . . . आणि ते सुद्धा सरलाच्या सांगण्यावरून.

त्या गोष्टीची आठवण येताच रामण्णांनी परत वळून सरलाच्या फोटोकडे पाहिले. आणि एक दीर्घ सुस्कारा टाकला.

"वेडी कुठली ! मी किती प्रयत्न केला. तूच सगळे बिघडवून टाकले. तूच आपल्या हाताने आपले जीवन दुसऱ्यांच्या हातात देऊन टाकले. सरला, ही सारी तुझीच चूक आहे बघ !...रामण्णा फोटोतील सरलाला समजावून सांगू लागले.

रामण्णा विचारू लागले.... जे काही झालं त्याबद्दल सरलाला दोष द्यायचा. तिचं बिचारीचं अंतःकरण किती सरळ, किती निर्मळ ... इतक्या शुद्ध हेतूनं केलेल्या ह्या गोष्टीबद्दल तिला दोष कसा द्यायचा ? पण खरं म्हणजे तिचाच दोष आहे. नाही का ? इथे सगळा व्यवहारच उलटा झालाय.... जीवनाची रीतच उलटी झाली. अन्यायाच्या कमाईवर लोक मंदिरं उभारतात. मग सारे जण त्यांना पुण्यात्मा म्हणतात. पापाने प्रेरित झाल्यावर पुण्य केलं जातं. मग पुण्याने प्रेरित झाल्यावर पाप का नाही केलं जात ? कोणतंही काम करते वेळी त्या मागचे अंतःकरणच महत्त्वाचे आहे का त्या नंतर होणारा अनर्थ महत्त्वाचा ? देशकालाच्या पलीकडे, ... ज्ञान देणाऱ्या ह्या जगात क्रियाच मुख्य आहे. म्हणून जो अनर्थ झाला तोच खरा महत्त्वाचा आहे. रामण्णांनी विचारांचा लोंढा अडविला. छे ! ह्या अति विचाराने आपल्याला वेड तर लागणार नाही ना ? कुठली ही गोष्ट ? कुठला संदर्भ ? आपल्या मनाचे समाधान करण्यासाठी आपण ह्या कोणत्या पर्वतावरून गडगडत खाली येत आहोत. मनुष्याच्या ह्या स्वभावामुळेच शेवटी ज्ञान प्राप्त करण्याऐवजी तो स्वतःच त्या पर्वताखाली दबून चक्काचूर होऊन जातो. रामण्णा स्वतःकडेच पाहून तिरस्काराने हसू लागले. आणि फोटोतील सरलाला म्हणाले —'सरला, पाहिलंस का तुझ्या नवऱ्याची स्थिती कशी झालीय ती ? तुला वाटत होतं.... माझी इच्छा असती तर मी काही करू शकेन. ..पण सरला. नको होतं ते मी केलं. आणि आता ते पाप पचवायला मी असमर्थ आहे ग....म्हणून माझा जीव तरफडत आहे. खरंच फार फार तरफडत आहे.'

नंतर रामण्णा उठून शतपावली करू लागले. जणू काही अजीर्ण झालं म्हणून चालण्याच्या व्यायामाचीच आवश्यकता होती ! आपले दोन्ही हात त्यांनी पाठीमागे बांधले होते. खाली मान घालून, पावले न्याहाळीत ते इकडून तिकडे हिंडत होते.... एकदम त्यांच्या तोंडातून उद्‌गार निघाले..."छे ! त्या सिनेमाला जाण्याच्या प्रकारानेच हे सारे रामायण घडले !" आम्हा दोघांना सिनेमाला पाठवणारी ही सरलाच. तेव्हा राग आला. ...पण त्यांच्या लक्षातच आले नाही. आपण कुणावर रागावत आहोत.... म्हणून जोराने खुर्ची ओढून...जोरात आपटली...आणि ती मध्ये दाणकन् बसून समोरच्या भितीकडे पाहू लागली.

त्यांच्या मनात सिनेमाचा विचार खदखदत होता. आणि समोर भिंत होती. भिंतीकडे पाहता पाहता त्यांना त्या दिवशीच्या सिनेमाचा प्रसंग आठवला. खुर्चीवर बसल्या

बसल्याच ते थोडे डावीकडे सरकले. . . .जणू काही कुमुद त्यांच्या डावीकडे बसलीच आहे. . . . त्या दिवशी, जवळ बसलेल्या कुमुदला स्पर्श करण्याची, तिचा हात आपल्या हातात घेण्याची अनिवार इच्छा झाली होती. एकदा वाटले, डाव्या हाताने कुमुदला कवटाळून जवळ घ्यावे. पण रामण्णांनी आपले मन आवरून घेतले. आणि कुमुदला सिनेमाचे कथानक मोठ्या उत्साहाने ते समजावू लागले. त्या दिवशी त्यांनी कुमुदशी किती गप्पा मारल्या. पण कुमुदने नुसते हूंसुद्धा केले नाही. एखाद्या वेळी— अंधारात गप्पागोष्टी चालू असताना . . . . सिनेमाच्या त्या मंद प्रकाशात रामण्णांना कुमुदचे दोन डोळे लुकलुकताना दिसले. तेव्हा तिची हनुवटी वर करून तिच्या ओठांचे चुंबन घेण्याचा अनिवार मोह त्यांना झाला. तसाच आवंढा गिळून त्यांनी बोलणेच थांबविले. आता हा दोष कोणाचा ? त्यांचा स्वतःचा की सरलाचा ! . . . इतका कालप्रवाह लोटल्यानंतर रामण्णा हा प्रश्न स्वतःला विचारू लागले.

आता दोष कुणाचा का असेना — घटना घडली होती. अगदी पूर्वनियोजित असावी तशीच. सिनेमा पाहण्याचा एक नवाच अनुभव कुमुदला मिळाला होता. त्यामुळे ती विशेष उत्साहात होती. आणि कुमुदच्या सहवासाचा, तिच्याकडे पुन्हा पुन्हा पाहण्याचा आनंद रामण्णांना मिळत होता. सिनेमा पाहिल्यानंतर दुसऱ्या दिवशी. . . त्यांच्या तोंडातून कसे काय गेले कुणास ठाऊक . . . .'काय मजा आली नाही सिनेमाच्या वेळी' . . . सहज त्यांच्या तोंडातून हे वाक्य बाहेर पडलं ! गोष्ट किती क्षुल्लक . . . आज ती आपण पार विसरूनही गेलो. पण त्या दिवसापासूनच एक नव्या, अविस्मरणीय कथेला सुरुवात झाली. कुमुद रागावलेली होती का खरंच तिचं डोकं दुखत होतं कुणास ठाऊक. तिची समजूत घालण्यासाठी म्हणून रामण्णा तिच्या खोलीत गेले तेव्हाच त्यांना विश्वास वाटला की कुमुद आता आपल्या हाती आलेली आहे. अजूनसुद्धा त्या पहिल्या अनुभवाची स्मृती रेंगाळत आहे. तिचा हात हातात घेऊन तो वर उचलू लागताना जे घडले ते अजून आठवते. . . .आता त्याची आठवण आल्यावर त्यांना वाटले आपण सुसंस्कृत मनुष्य आहोत का पशू ? (परंतु पशूंना आठवण येते कशाची ?) आतासुद्धा आनंदाने सारे शरीर रोमांचित होऊन जाते. कुमुद आपले दोन्ही हात छातीवर ठेवून बिछान्यावर पडली होती. तिचा हात आपल्या हातात घेण्यासाठी त्यांनी हात पुढे केला. कुमुदच्या हाताचा स्पर्श . . . त्याचबरोबर तिच्या वक्षस्थळाला रामण्णांचा हात स्पर्श करून गेला. . . . आता ही मुलगी घाबरून एकदम ओरडणार तर नाही ना, ह्या भीतीने रामण्णा स्वतःच हवालदिल होऊन गेले. परंतु तिने स्वतःच आपल्या वक्षस्थळावरील आपले हात दूर केले व रामण्णांच्या हाताला जागा करून दिली. तेव्हा रामण्णांना पूर्ण विश्वास झाला. तिला आपण हवे आहोत. ते बेभान झाले. मोठ्या प्रयत्नाने त्यांनी आपले मन आवरले.

'कुमुदला बोलावून आणतो.' असं सरलाला सांगून ते कुमुदला बोलवायला तिच्या खोलीत आले होते. म्हणून जास्त वेळ घालविणेही ठीक नव्हते. पण जी संधी मिळाली होती ती बाया घालविणे हेही चूकच ठरले असते. असा विचार करून, थोडंसं बोलून ते लगेच उठले. किती चमत्कार ! हळूच कुमुदला म्हणाले,

"अग, आता तरी सरलासाठी खाऊन घे. मग मागाहून मी तुझी क्षमा मागतो." त्यांना वाटले. . . .कामतृप्तीतून स्फूर्ती निर्माण होते का ?

स्फूर्तीच्या विषयी अनेक विचार उठण्याचे आणखी एक कारण होते. कुमुदच्या जवळ जाण्याने त्यांना जणू एक नवीन शक्ती, नवीन जीवन मिळाले होते. . . .ह्या विषयात अनुभवी असूनसुद्धा. त्यावेळीच त्यांनी एक नवीन पुस्तक लिहायला सुरवात केली. ते पुस्तक त्यांनी पहिल्यापेक्षा किती कळकळीने लिहिले. . . .लिखाण किती उत्तम साधले होते. ह्या गोष्टीचे रामण्णांना राहून राहून आश्चर्य वाटले. तसं पाहिलं तर त्यांनी जे केले ते पापच होते. . . .समाज. नीट सुरळीत चालावा म्हणून काही नियम तयार केलेले आहेत. . . .अर्थात लौकिक दृष्टीने, रामण्णांनी जे केले तो अपराधच होता. पापच होते. परंतु त्यामुळे त्यांचे मन किती उल्लसित झाले होते. बुद्धीला प्रखर धार आली होती. . . अंगात नवीन ताकत संचारली होती. का ? कशामुळे ? कुमुदवर त्यांचे प्रेम जडले होते ?

दुसऱ्या दिवशी सकाळीच त्यांना ह्या प्रश्नाचे उत्तर मिळाले. निश्चित उत्तर हेच होतं की कुमुदवर त्यांचे प्रेम नव्हते. कारण उठता क्षणीच रामण्णा सरलाकडे धावत धावत गेले आणि तिला आपल्या नवीन पुस्तकाबद्दल खूप खूप सांगितले. . .ते सारं ऐकून सरलाने त्यांच्याकडे किती अभिमानाने, किती गर्वाने पाहिले. रामण्णांना सरलाचा तो आनंदलेला चेहेरा पाहून केवढे सुख मिळाले होते. त्यांना वाटले. जगात फक्त आम्ही दोघंच आहोत. सरला आणि मी. तिसरं कुणी नाही. एवढेच काय रामण्णा सारा दिवस सरलाच्या जवळच बसून राहिले. सरलाने विचारलेसुद्धा— "काय, आज लिहायचं नाही ? रामण्णानी उत्तर दिलं— "रात्री लिहीन !"

नंतर सरलाने हसत हसत चेष्टेने विचारले— "अहो. तुम्ही उगीचच इथे माझ्या-जवळ कशाला बसला आहात ?" . . .तेव्हा रामण्णांनी उत्तर दिलं होतं. . . .उगीचच कसे सरला. . .? तू तर नेहेमीच माझ्या अंतःकरणात बसलेली आहेस बघ. . . तेव्हा लाजलाजून सरला म्हणाली होती, . . ."चला. तुमचं ते गोड गोड बोलणं सुरू झालं बघा." "अग, हे नुसतं गोड गोड नाही, अगदी खरं तेच बोलतोय बघ. वेडाबाई तूच तर माझी स्फूर्तिदेवता आहेस. . . .तू माझ्या अंतःकरणात आहेस म्हणून तर माझ्या हातून एवढं लिखाण होतंय बघ." बोलता बोलता त्यांनी सरलाच्या कपाळाचे चुंबन घेतले.

ह्या सर्व गोष्टींचा पक्का विचार करून ते मनाशी म्हणाले....माझं खरं प्रेम सरलावरच आहे ! पण लगेच पुन्हा संशयाचे पिशाच्च त्यांच्या डोक्यात शिरले. त्यांनी विचार केला. सरलावर आपलं प्रेम आहे म्हणूनच का आपण असे पाप केले ? का सरलावर आपण अन्याय केलाय त्याची भरपाई आता हे प्रेमाचे प्रदर्शन करून देत आहोत.दिवस जसाजसा जाऊ लागला तसातसा हा संशय जास्त वाढू लागला. सकाळ-पासून ते जसजशी कुमुदची नजर चुकवीत होते....तसतशी तिला बघण्याची उत्सुकता वाढतच होती. 'कुमुदकडे आता मुळीच ढुंकूनसुद्धा पाहायचं नाही '. . .आणि 'कुमुदकडे एकसारखं पाहात राहावसं वाटतं' ह्या दोन दोरांनी ओढले जात असतानाच रामण्णांनी एक तिसराच रस्ता पकडला. ते चोरून चोरून कुमुदकडे पाहू लागले. रात्री जेवण झाल्यावर त्यांनी थोडा वेळ सरलाशी गप्पा मारल्या...." आता मी लिहायला बसतो. . . ." असं म्हणून स्फूर्ती आल्यागत झटकन् उठले. बाहेर जायच्या वेळी दरवाज्यात जरा थबकून ते सरलाला म्हणाले. "तुला सांगीन, उद्या सकाळी, किती लिहून झालं ते !". . .पण त्यावेळी त्याची दृष्टी कुमुदच्या खोलीकडे होती. कुमुद दाराच्या मागेच उभी होती... ते तिला म्हणाले. . .'मी आता माझ्या खोलीत जातो बरं का !' जणू काही ते कुमुदला येण्याची सूचना देत होते.

काही दिवस. शरीर आणि बुद्धी दोन्हींच्या संघर्षात पडून रामण्णा थकून गेले होते. शरीराची मागणी पुरी होत होती. . . . मनाने आवरून धरल्यावर सुद्धा शरीराची भूक वाढतच होती. पण शरीर आणि बुद्धी ह्यांचा संघर्ष चालला होता असं काही म्हणता येणार नाही. कारण प्रत्येक वेळी शरीर तृप्त झाले की त्यांच्या बुद्धीलाही एक प्रकारची विलक्षण धार चढत असे. रामण्णातील लेखकाला ह्या गोष्टीचे जितके आश्चर्य वाटले, तितकेच भयही वाटले. मानवाच्या सांस्कृतिक कर्तृत्वावर, अशाप्रकारे शारीरिक तृप्तीचा इतका प्रभाव होऊ शकतो ! आता शारीरिक भुकेला इतके महत्त्व आहे, तर ! नीती, संस्कृती ह्यांना काही अर्थच उरणार नाही ही सारी स्वतःची फसवणूक, निव्वळ आत्मवंचनाच नाही का ? छीः छीः. .हे काही योग्य नाही. मनुष्य, भूक ही काही नैसर्गिक वासना समजत नाही. जे काही दिसेल ते खात नाही. दुष्काळाच्या प्रसंगी अशी एखादी दुसरी घटना कुठे कुठे घडली असेल. नाही असे नाही. पण कामवासनेच्या बाबतीतही हे खरे आहे का ? बायकोचे आजारपणही रामण्णांना दुष्काळी परिस्थिती सारखेच होते ? का नाही ? प्रत्येक नैसर्गिक वासना, त्या त्या योग्य वेळी तृप्त झाली नाही तर माणूस वेडा होऊ शकतो.

आपल्या जीवनातील ह्या परिस्थितीबद्दल आता रामण्णांनी एकदाच विचार केला. पहिल्यांदा आणि शेवटी ! कुमुद आतासुद्धा ह्या घरात आहे. सरलाची अडचणही

राहिलेली नाही, पण तरीसुद्धा त्यांचे मन आता कुमुदकडे ओढ घेत नाही. आज कुमुदच्या मनातून सिनेमाला जायचेही असेल पण ते गेले नाहीत.... छान झालं. रामण्णांना वाटलं आपण सिनेमाला गेलो असतो तर जुन्या आठवणींनी डोकं खाल्लं असतं आणि आपण थिएटरमधून निघून आलो असतो. रामण्णा खुर्चीवरून उठले. पुन्हा खोलीत फेऱ्या मारू लागले. सरलाच्या फोटोसमोर उभे राहून, कसला तरी विचार करून त्यांनी मान डोलावली....परत माघारी फिरले. आणि खुर्चीवर बसून उगीचच काही तरी बडबडू लागले.

"छे. मी काय उगीच बडबड करीत आहे !" रामण्णा स्वतःलाच विसरू लागले. त्यांना एक वाक्य आठवले. ते वाक्यच त्यांना का आठवले ? "काम" शब्द मनात रेंगाळत होता म्हणूनच असे झाले असेल. तेच वाक्य रामण्णांनी मोठ्याने उच्चारले

"सोऽकामयत । बहुस्यां प्रजायेय इति"— हे लिहिणारा मोठा ऋषी असला तरी त्याची चांगलीच विकृत असली पाहिजे. तरीसुद्धा उपनिषदत्कालातील ह्या वृद्ध महर्षीच्या निवेदनात केवढे महान सत्य लपलेले आहे. सृष्टी कशी निर्माण होते हे साऱ्यांनाच माहीत आहे. तेच ह्या जटाधारी साधूने सर्वांना सांगितले ह्यात विकृती नाही तर आणखी काय आहे ? प्रथम सृष्टी अस्तित्वात नव्हती. पण 'तो' (व्यक्ती) होता. त्याला इच्छा झाली....माझ्या सारखेच अनेक निर्माण करीन. उत्पत्ती करीन. तेव्हा नवीन निर्मिती सुरू झाली. जगाचे मूळ किती सोपे आहे. पण ह्यात नवीन असे काय ? जग निर्माण होण्यामागची सारी प्रेरणा शक्ती म्हणजे 'काम' पण त्याच जागी जर 'कामवासना' शब्दाचा उपयोग केला तर तो कानाला अगदी असह्य वाटतो. तरीसुद्धा उपनिषदात सृजनासाठी, निर्मितीसाठी काम आणि कामवासना ह्या दोन्ही शब्दांचा उपयोग केला गेला आहे. कारण ह्या दोन्हीमुळेच निर्मिती होऊ शकते. 'काम' हीच निर्मितीमागची मूळ प्रेरणा. मूळ शक्ती असे ठासून सांगून ह्या प्राचीन महर्षीनी मानव जातीवर केवढे उपकार करून ठेवले आहेत ! वा ! छान झाले. म्हणजे आपल्या आतापर्यंतच्या ह्या वागणुकीला उपनिषदाने सर्टिफिकेट मिळाले तर !

रामण्णांनी खुर्चीवर बसल्या बसल्या घड्याळाकडे पाहिले. अकरा वाजून गेले होते. छे ! आपण किती वेडे आहोत. उगीचच विचार कर करून आपण डोकं दुखवून घेतलं. आपण सरलावर प्रेम करतो का कुमुदवर ? इथे कुणाला हवा आहे हा प्रश्न ? त्याची जरूरी तरी कुठे आहे ? सरलाला जाऊन आता तीन महिने झाले. कुमुदचीही त्यांना विशेष ओढ वाटत नाही. हे आता माहीत झालं असताही उगीचच विचार करण्यात काय अर्थ आहे ? झोप येईपर्यंत एखादे संस्कृतचे पुस्तकच वाचावे. उपनिषदातील ते

वाक्य आठवले ते बरेच झाले. असा विचार करता करता रामण्णा, टेबलाजवळच ठेवलेल्या शेल्फवरील पुस्तक शोधू लागले.

## १०

झोपण्याची तयारी करता करताच, कुमुदने अंथरुणावरील चादर काढण्यासाठी हात वर केला. तेव्हा कुमुदला घड्याळाचे काटे चमकताना दिसले. अकरा वाजून गेले. रात्रीची वेळ आहे हीं असे समजताच कुमुद सगळं काही विसरून गेली. आणि एखाद्या पुतळ्या-सारखी स्तब्ध उभी राहिली. हीच ती वेळ होती. ती कधी तरी विसरणं शक्य आहे का ? एक दीर्घ सुस्कारा घेऊन ती पुन्हा बिछान्यावर जशीच्या तशी बसून राहिली. क्षणापूर्वी तिने विचार केला होता. . .पण पुन्हा विचार बदलला. रात्रीचे अकरा वाजले हे लक्षात येताच तिच्या डोळ्यापुढे एक चित्र उभं राहिलं. तिचा आपल्या स्वतःच्या शुद्ध अंतःकरणावर, शुद्ध चारित्र्यावर विश्वास होता. ते सारं एका बाजूला राहिलं. रात्रीचे अकरा वाजले आहेत. त्या दिवशी हीच वेळ होती. दोन तीन दिवस होऊन गेले. पहिल्यांदा ती खूप बावरली होती. सुरवाती सुरवातीला त्या आठवणींनीसुद्धा ती भिऊन जायची. दुसऱ्या दिवशी तिच्या मांड्या थरथर कापत होत्या. सरलाताईच्या समोर जाण्याचे साहसही होईना. रामण्णा आपल्याशी काही बोलतील ? अंधारात जो चेहेरा तिला प्रेमळ वाटला, जे डोळे विजेसारखे चमकताना दिसले ते आता काही निराळेच वाटतील ? ती त्यांचा सामना करू शकेल ?. . .विचार करता करता ती घरातले काम करू लागली. परंतु सरलाताई आणि रामण्णा ह्यांच्यात काहीच बदल तिला दिसला नाही. हे पाहून कुमुदला फारच आश्चर्य वाटले. दुसऱ्या रात्री रामण्णा परत तिच्या खोलीत आले. परंतु त्यांच्याशी बोलण्याचं धैर्य तिला झालं नाही. तिसऱ्या रात्री मात्र तिने सारे धैर्य गोळा करून आपले तोंड उघडण्याचा प्रयत्न केला. ती रामण्णांच्या येण्याची वाट पाहातच बसली होती. येता क्षणीच रामण्णांनी विचारले "काय देवी ! आमच्यावर कृपादृष्टी आहे ना ?"

तोंड उघडण्याचा प्रयत्न करुनही कुमुदला काही बोलताच येईना. तिने फक्त मान हलविली.

"ओ हो ! हे काय ? आम्ही आलेले कळलं नाही वाटतं ?" तेव्हा ओठावर

आलेले हसू दाबून तिने मान हलविली. रामण्णांनी जवळ येऊन तिचा चेहेरा आपल्या-जवळ आणला आणि म्हटले—

"अग, मान डोलावणे कठीण वाटत असेल तर तोंड उघड फक्त !"

ह्यावर कुमुद म्हणाली.

"आपल्याशी गप्पा गोष्टी करण्याची माझी योग्यता कुठे ?" तिचं वाक्य पूर्ण झालं नाही तोच रामण्णा म्हणाले,

"तुला काय वाटलं, गप्पा मारायच्या म्हणजे तोंडच उघडायला पाहिजे !"

"म्हणजे ?"

"म्हणजे ह्या चार दिवसांत तूच माझ्याशी जास्त बोललीस बघ."

"मला हे काऽही कळत नाही बघा."

"बापरे ! कळत नाही म्हणतेस आणि इतक्या बाता करतेस. मग कळल्यावर तर किती लंब्या चौड्या गप्पा मारल्या असत्या."

आपण झोपेत तर काही बडबडलो नाही ? कुमुद भीतीने शहारून गेली.

"स्वप्नात तर काही मी बडबडले..." पुढे कुमुद बोलणार तोच रामण्णा जोर जोरात हसू लागले.

"वेडाबाई ! स्वप्नात ? अग तूच मुळी माझे एक गोड गोड स्वप्न आहेस. तू जागी आहेस...इतकी घाबरलीस का मला पाहून ? म्हणून तर म्हटलं की बोलायचं म्हणजे तोंड उघडायला कशाला हवं ?

"तुझ्या प्रत्येक पावलागणिक तू बोलत आहेस. तुझी प्रत्येक नजर केवढं बोलून जात होती. तुझे अर्धवट उघडलेले ओठ बोलून जात होते. इतकंच काय पण कुमुद, तुझं मौनच किती बोलके होते ! ह्या साऱ्या गोष्टीमुळेच मी असा वेडा झालो की नाही सांग ! बोल ग, कुमुद, आता, तोंड उघडून बोल...." बोलता बोलताच रामण्णांनी कुमुदच्या ओठावर प्रेमाचे कुलूप लावून टाकले. त्या दिवशी रामण्णांच्या बाहुपाशात किती गप्पा गोष्टी, गुजगोष्टी झाल्या होत्या.

"कुमुद, तू माझी स्फूर्तिदेवता आहेस. खोटं नाही सांगत ! पाहिजे तर माझ्या खोलीत येऊन पाहा. तुझ्या प्रेरणेनेच मी एका नव्या पुस्तकाचा शुभारंभ केला आहे."

"खरंच ?"

"मग, तू फार फार वेडी आहेस बघ कुमुद. एक रात्र तुला भेटलो नाही तर माझी लेखणी कुंठित होते बघ. तुझ्या मुळेच मला एक नवीन चेतना मिळाली बघ. माझ्या साहित्यिक जीवनाचा तू प्राण आहेस कुमुद..." आणखी किती किती ते बोलत होते.

त्यांचं ते मधाळ बोलणं ऐकून कुमुद स्वतःच आपली भान विसरून गेली. रामण्णा आपल्याला सोडून कुठे दुसरीकडे तर जाणार नाहीत ना ? ह्या भीतीने कुमुदने त्यांचा आपणहून स्वीकार केला....ह्या साऱ्या प्रकरणामुळे खरं म्हणजे ती अगदी थिजूनच गेली होती.

रामण्णा अजून आले नव्हते. तिने मनगटावरील घड्याळाकडे पाहिले. रात्रीचे बरोबर अकरा वाजले होते. इतका उशीर ? रोज लवकर येणारे रामण्णा आज अजून आले नव्हते. वाट पाहणंही अगदी असह्य होऊन गेलं. क्षणभर श्वास रोखून तिने दाराला कान देऊन ऐकले....कुणीतरी फुसफुस करीत होते. आता एवढ्या रात्री कोण बोलत आहे ? सरलाताई तर रात्री नऊ वाजताच झोपून जाते....खरंच रामण्णा, तिथेच तिच्या जवळ बसून काही वाचत असतील. वाचनात दंग झाल्यामुळे, आपल्याकडे यायला विसरले असतील. एखाद्या खोडकर मुलासारखी कुमुद स्वतःशीच हसली. मला विसरून ...वाचनात दंग झालेत ? हळूच जाऊन पाहिले पाहिजे. तुम्हीच मला स्फूर्तिदेवता म्हणून सर्टिफिकेट दिलेत. आणि तुम्हीच खोलीत येऊन पाहा म्हणून म्हणाला होतात... म्हणून आले असे सांगू ! म्हणजे झाले. तिला पाहून रामण्णा दचकतील. ह्या कल्पनेनेच ती आनंदली आणि स्वतःशीच खुदकन हसली. बिछान्यावरून उठून. हळूच काही आवाज न करता ती रामण्णाच्या खोलीजवळ गेली पण त्या क्षणीच वीज पडल्यागत ती अवाक उभी राहिली. खोलीचा दरवाजा बंद होता आत प्रकाश दिसत होता....कुमुद अगदी निराश झाली पण आणखी एक दृश्य पाहून तिला केवढा राग आला. तो फुसफुस बोलण्याचा आवाज सरलाताईच्या खोलीतून येत होता, दरवाजा अर्धवट उघडलेला होता. आत खूप प्रकाश दिसत होता. ते सारं पाहून कुमुदचा पारा चांगलाच चढला. तिला वाटलं, झटकन् आपल्या खोलीत जावे, दिवा विझवून टाकावा आणि अंथरुणावर नुसतं पडून राहावे मुडद्यासारखे! तिचा राग अनावर झाला होता. . काय चाललंय काय ? तिची उत्सुकता शिगेला पोचली होती....ती हळूच दाराजवळ आली. तिला वाटलं रामण्णा आपल्या प्रिय पत्नीशी गप्पा मारता मारता मला विसरून गेले... ! पण पुन्हा वाटलं, ती त्यांची बायकोच आहे. तिच्याशीच ते गप्पा मारणार ! आपण कशाला त्याच्यामध्ये जा ! ”

कुमुद माघारी वळली. तेव्हा सरलाताईचे एक वाक्य तिच्या कानावर आदळले.

“एवढं झालं म्हणजे मी मग सुखाने डोळे मिटीन ! ”

हे ऐकताच कुमुद घाबरली म्हणजे ? सरलाताईचं मरण जवळ आलं ?

ती खोलीत शिरणार इतक्यात रामण्णांचे शब्द तिच्या कानांवर पडले.

“आता मला केवढं सुख मिळतंय. कशाची कमी आहे ?”

कुमुदला सारेच असह्य झाले. तिने दरवाज्यातून डोकावून पाहिले ते दृश्य पाहून वादळाने जणू लांब लांब फेकली गेली....धाडकन् आपल्या खोलीत येऊन ती बिछान्यावर आढळली.

पुन्हा घड्याळाकडे पाहात कुमुदने एक दीर्घ सुस्कारा टाकला. तिला वाटलं, मन घट्ट करून आपण जर झोपलो नाही ना, तर ह्या जुन्या आठवणी आपला जीव घेतील नुसता. ह्या आठवणी म्हणजे खरोखरच अगदी जीवघेण्या होत्या. सरलाताईच्या मृत्यूचा तो प्रसंग. तो भयानक अनुभव. केवढा अन्याय झाला होता. त्या दिवशीचे ते दृश्यही किती भयानक होते. जाऊ दे, विचारी सरलाताई कित्येक महिने अंथरुणाला खिळून पडली होती. तिला आपल्या पतीची, संसाराची किती काळजी वाटली असेल. अशा वेळी नवऱ्याने तिला थोडा धीर दिला तर काय बिघडले ? तिची बिचारीची काय चूक ? आणि रामण्णांचे तरी काय चुकले त्यात ? आणि तिने विशेष धक्का देणारं असं काय पाहिलं ?

आपल्या नवऱ्याच्या मांडीवर डोके ठेवून सरलाताई मोठ्या प्रेमाने आपल्या नवऱ्याचा चेहेरा न्याहाळीत होती. रामण्णा एका हाताने सरलाताईचे केस कुरवाळीत होते. आणि दुसऱ्या हाताने सरलाताईचा हात पकडून तो आपल्या गालावर चोळीत होते....आणि हसत हसत सरलाताईकडे पाहात होते. एवढंच तर पाहिलं होतं !

पण त्या दिवशी मात्र ते दृश्य पाहून तिचा अगदी थरकाप उडाला होता. विचारानी तिचे मन अगदी तुटून फाटून जाण्याच्या बेतात होते. एक विचार दुसऱ्या विचाराला ढकलीत ढकलीत पुढे खेचत होता. आता आपल्या जीवनात सुख कसले ? आता रामण्णांना पुन्हा आपल्या खोलीत पाऊल म्हणून ठेवू द्यायचे नाही. तिने मनाशी निश्चय केला. रामण्णांना आपल्या शरीराला स्पर्श म्हणून करून द्यायचा नाही, कसे अगदी प्रेमाने सरलाताईकडे पहात होते. कुमुदच्या हृदयात जणू काटे बोचत होते. धोकेबाज, कपटी. आपण इकडे त्यांच्या येण्याकडे डोळे लावून बसलो आहोत. आणि तिकडे हे महाराज आजारी बायकोच्या अंथरुणावर बसून राहिले आहेत. आता मरेपर्यंत त्यांच्याकडे दर नजर करूनसुद्धा बघणार नाही. की त्यांच्याशी एक शब्द सुद्धा बोलणार नाही. यायचं असलं तर या. ..! कुमुद रागातच चरफडली मग तिच्या लक्षात आलं. तिने खोलीला आतून कडी लावून घेतलीय. मग ते येतीलच कसे ? आणि आता आले नाहीत तर आपल्या मनातील साऱ्या गोष्टी त्याना कशा सांगायच्या ! दरवाजा बंद पाहून बाहेरच्या बाहेरच निघून जातील. जाऊ देत ! पण छे, चुकलंच. त्यांना इथे येऊ द्यायला हवे होते. आपल्याला बिछान्यावर पाहून ते इथेच पहुडतील. मग चांगलं समजावून सांगता येईल. हा विचार मनात आल्यावर कुमुदने कडी काढली. दरवाजा उघडाच

ठवला. दिवा लावला. आणि मग ती अंथरुणावर येऊन पडली. ह्यांच्या बायकोला तर आपलं अंथरूण सोडता येत नाही. मला इथे कुणाची भीती आहे? दु:खाने बेभान होऊन कुमुद स्वत:शीच बोलू लागली.

किती तरी वेळ कुमुद तशीच बिछान्यावर पडून राहिली. आता येतील, मग येतील, एक दोन मिनिटातच येतील, आणि आले तर मी त्यांना तोंडसुद्धा दाखवणार नाही. असा विचार करून ती भिंतीकडे तोंड करून पडून राहिली. छे! अजून सुद्धा रामण्णा आले नाहीत, मधून मधून ती दरवाज्याकडे दृष्टी टाकी. . . . रामण्णाच्या येण्याकडे ती अक्षरश: डोळे लावून बसली होती.

आपल्या त्या रात्रीच्या वागणुकीचं कुमुदला फार फार आश्चर्य वाटले. खरं म्हणजे तिला रामण्णाचा केवढा राग आला होता. तिनं अगदी दृढ निश्चय केला होता रामण्णांशी एक शब्द ही बोलायचा नाही. पण छे! शेवटी जेव्हा रामण्णा आले तर काय झाले? मनात जे जे योजून ठेवलं होतं ते काही काही झालं नाही. म्हणून रामण्णांचा तिला आणखीच राग आला. रामण्णा येतील मग थोड्या इकडच्या तिकडच्या गप्पा करतील. उशीर झाला म्हणून तिची क्षमा मागतील. तिचा रुसवा काढतील. तरी सुद्धा ती काही बोलणार नाही. त्यांच्याकडे बघणार सुद्धा नाही. शेवटी त्यांना अशी बोलेल, की रामण्णांच्या मनाला चांगलेच लागून राहील.

रामण्णा खोलीत आले आधी त्यांनी दरवाजा बंद केला. दिवा विझवून टाकला. . . . कुमुदच्या हातातून एक शस्त्रच जणू निसटून गेले. कारण अंधारात बोलल्या-शिवाय आपला राग कसा दाखवणार? म्हणून तर ती भिंतीकडे तोंड करून पडली होती रामण्णानी एक दीर्घ सुस्कारा सोडला. वा! हा सुद्धा फसवण्याचा एक नवीन प्रकार दिसतोय, असा विचार करून कुमुद अंधारात डोळे मिटून पडली. आज ती रामण्णांवर चिडली आहे. ती आज त्यांच्यावर रुसलेली आहे. रामण्णा तिच्याजवळ येऊन पडले. कुमुद जरा बाजूलाच सरली. रामण्णांनी तिला जवळ घेतलं. कुमुदचे मन सुखावले, पण तरी सुद्धा तिने रामण्णाकडे आपला चेहेरा वळविला नाही. मनात विचार केला एकदा त्यांना बोलू दे तरी. मग पाहून घेईन, पण रामण्णा काहीच बोलले नाहीत. आपले अनुभवी हात ते तिच्या शरीरावरून फिरवू लागले. तिला आपल्या मोहजालात वश करू लागले, गारुडी जसा सापाला वश करतो तसे. रामण्णांच्या स्पर्शाने तिचे अवघे शरीर तळहातावर ठेवलेल्या बर्फासारखे वितळून गेले. तिचे हृदय रामण्णांच्या हृदयाला संपूर्ण शरण गेले. जणू त्यांच्या शरीराचा आश्रयच तिने घेतला. तारुण्यसुलभ नैसर्गिक गरजेपुढे तिचा क्रोध कुठल्याकुठे पळाला, क्षणभर ती सारं विसरून सुखाच्या सागरात डुंबू लागली. दुसऱ्या क्षणी ती वर्तमानकाळ विसरून चिरंतन सुखा-

साठी धमडू लागली. तिचे हृदय जणू संपूर्ण जगाला क्षमा करण्यासाठी वात्सल्याचे मूर्तिमंत रूपच धारण करून विश्वरूप होऊन गेले. तिला एवढा सुखाचा ठेवा देणाऱ्या रामण्णांवर कधी कुणी रागावेल का ? मागच्या जन्मी तिने काही तरी महान् पुण्य केलं असेल म्हणून तर तिला ह्या जन्मी हे एवढे सुख भरभरून मिळाले. . . . विचार करून तिने स्वत:ला रामण्णांच्या बाहुपाशात लोटून दिले. तेथे तिसरे कुणी सुद्धा नव्हते. हे सारे काय चालले आहे ? स्वप्न का कुणा भूतपिशाच्यांची करामत. . . . हा विचार तिच्या मनात येतो न येतो तोच तिला कुणाचा तरी दार बंद करून लोटल्याचा आवाज आला. रामण्णा बाहेर निघून गेले होते.' हे काय ? असे कसे झाले ? . . . असे स्वत:शी बोलतच कुमुद धाडकन् बिछान्यावर बसली. ते कशासाठी आले ? आणि पुन्हा असेच का निघून गेले ? ह्या प्रश्नांची उत्तरं कुमुदला माहीत नव्हती का ? पण कदाचित त्यांना त्याची परवाच वाटली नसेल. कुमुदला सारं असह्य झालं ! फार फार असह्य. अंगावरील कपडे सगळे अस्ताव्यस्त झाले होते. कपाळावर घामाचे बिंदू जमले होते. छाती धडधडत होती. आतून बाहेरून दाबली गेल्यामुळे थकलेली वक्षस्थळे, थरथर कापणाऱ्या मांड्या ' ' रामण्णांच्या कर्तृत्वाचे सारे साक्षीदार. त्यांच्या येण्याचे फक्त हेच प्रयोजन होते ? तिच्या शरीराशिवाय त्यांचा तिच्याशी दुसरा कसला संबंध नव्हता ?

एकदा तिला वाटले आपण खूप खूप रागावलेले आहोत ह्याची रामण्णांना पूर्ण कल्पना आली असेल. बिचारे ! नुसते लांबलचक सुस्कारे टाकीत होते. त्यांना मनस्ताप होत असेल. काय होणार ? थोड्या वेळापूर्वी सरलाताईजवळ बसले होते. तिथे तर काही झालं नाही ना ? सरलाताई काही टोचून खोचून तर नाही बोलली त्यांना ? हा विचार येताच कुमुदला वाटलं, आपलं हृदयच बंद पडणार. ती क्षणभर चांगलीच घाबरली. तिचा रामण्णांवरचा राग मावळून गेला. अंथरुणावर खितपत पडलेल्या सरलाताईनेच रामण्णांचे मन दुखावले असेल. आता तिला ह्याची खात्रीच पटली. कुमुद विचार करू लागली. खरंच सरलाताई. काय म्हणाली वरं...हो, हो, ते निचं वाक्य, आठवलं आता. . . . "एवढं झालं म्हणजे मग मी सुखानं डोळे मिटीन" एवढं म्हणजे काय ? आजारी बायकोने नवऱ्याला आपल्याजवळच नेहमी ठेवून घ्यायचं काय ? आता तिच्या सुख दु:खाची कुणाला गरज आहे ? ती मरून गेली तरच इतरांना बरं !

अंथरुणावर बसल्या बसल्या कुमुद एकदम भीतीने शहारली आणि पटकन् उठून बसली. जुन्या आठवणी तिला अगदी भेदरून टाकीत होत्या. ती रडूच लागली. छी ! त्या दिवशी सरलाताईच्याबद्दल आपल्या मनात किती घाणरडे विचार आले ! खरंच

आपलं मनच पापी आहे. आज त्याच पापाचे प्रायश्चित आपल्याला मिळत आहे. बिचाऱ्या सरलाताईला आपण आपल्या सुखाच्या मार्गावरील अडथण, अडथळा समजलो....आता ती बिचारी निघून गेली. पण तरी आपण सुखी आहोत का ? आता कुमुदच्या लक्षात आलं. आपलं सुख किंवा दुःख दुसऱ्या कुणाच्या हातात नसतेच. सरलाताई जिवंत असताना हे आपल्या लक्षात कसं आलं नाही ? पण तेव्हा ध्यानात येणं शक्यही नव्हत ! तिला सुख म्हणजे काय तेच उमगलं नव्हतं. रामण्णांचा सहवास प्राप्त करून घेणे हेच आपले सुख आहे असे समजून, रामण्णांना, सरलाताईपासून ओढून घ्यायचे हेच तिच्या जीवनाचे ध्येय झाले होते....रामण्णांचा सहवास मिळवणं हे त्यांच्या लहरीवरच अवलंबून आहे. . . .तेव्हा तिला काहीच समजले नव्हते. छे, काय हा वेडेपणा. सहवास, सांनिध्य, म्हणजे फक्त शरीराचे सांनिध्य का ? त्या सुखाचा अनुभव घेऊन आता ते शरीरसांनिध्य तिला असह्य वाटू लागले आहे.

कुमुदला आपल्या सुखाचा रस्ता कुठे आहे तेच कळेना. त्या वेळी तिने दुसऱ्यांच्या माथी दोष लावला होता. आता तिला कळलं ही सारी आपली चूकच झाली. सरला-ताईबद्दल किती घाणेरडे विचार आपल्या डोक्यात आले होते. खरंच आपण पापी आहोत.

राहून राहून कुमुदला वाटत होतं. . . .हे सारं सारं आता पार विसरून गेलं पाहिजे. पण ही एक आठवण मात्र तिला मुळीच विसरता येत नाही. तिला समाधान एवढंच होतं की, जे व्हायचे ते झालच. पण त्या नसत्या आठवणीनेच आपल्याला प्रायश्चित घेण्याची तरी संधी मिळेल. त्या रात्रीचे ते रामण्णाचे एखाद्या यांत्रिक बाहुल्या-सारखे येऊन निघून जाणे. . .कुमुदला अगदी असह्य होऊन गेले. क्रोध, असूया, द्वेष, असहनशीलता एका मागून एक तिच्यावर भुतासारखी झपाटून गेली. त्या दिवशी तिला पूर्ण विश्वास वाटला. . . .रामण्णाचे तिच्यावर अगदी खरेखुरे प्रेम आहे. पुन्हा तिला दाट संशयही आला की सरला त्यांच्या प्रेममार्गातील एक काटा आहे.

रामण्णा तिच्या जीवनाचे जणू प्राणवायूच होते. त्यांच्या जीवनात तिला सूर्य-प्रकाशाचे दर्शनच होणार नव्हते. . . .जसजसा तिचा रामण्णांच्यावरचा विश्वास वाढू लागला तसतशी तिची सरलाताईबाबतची भीती कमी होऊ लागली. अशा प्रेमासमोर बिचारी सरलाताईसारखी अशक्त, मरतुकडी, रोगी स्त्री किती काळ टिकाव धरणार ? कुमुदच्या डोळ्यांवर झोप अनिवार झाली तशी तिच्या मनात सरलाताईच्या बद्दल कीवच उत्पन्न झाली. उगीच तिच्याविषयी निरर्थक घाणेरडे विचार कशाला मनात आणायचे ? सरलाताईला अंथरुणावरून धड उठताही येत नाही. मग तिच्यापासून आपल्याला भय कसलं ? रामण्णांना तरी तिच्यापासून काय सुख मिळतंय हो ? ती

जिवंत राहिली काय किंवा मेली काय, त्यांना दोन्ही सारखंच. आपण आपलं सरला-ताईशी नेहेमीप्रमाणे वागायचं म्हणजे तिला कसलाच संशय येणार नाही. ह्या व आपल्या स्वतःच्याच युक्तिवादावर ती खूश झाली. तिचे हृदय रामण्णांच्या प्रेमाने तुडुंब भरून गेले आता तिथे कुणाला दुसऱ्याला स्थान नाही. ह्या विचाराने कुमुदचे खूप समाधान झाले.

पण पुन्हा तिला रामण्णांचा तो दीर्घ सुस्कारा आठवला. ती पुन्हा विचार करू लागली. त्यात एक प्रकारचा मनस्ताप अवश्य आहे. कोणता ? तो दूर करायलाच हवा. बायकोने त्यांच्याजवळ काही सांगितलं का ? म्हणून ते एवढे निराश झाले ? सरला-ताईला सारं काही समजलंय. किंवा सरलाताईला समजलंय, हे मला कळलं तर मी घाबरून जाईन. . . म्हणून रामण्णा निराश झालेत ? चिंतातुर झालेत ? म्हणून का त्यांनी असा दीर्घ सुस्कारा टाकला ? छे ! एवढंच ना, आपण उगीचंच हे मनाला लावून घेतो. . . किती वेळाचा तो मनस्ताप ? शेषनागाने लपेटून आठ बलाढ्य हत्तींनी जरी मला रामण्णांपासून ओढण्याचा प्रयत्न केला तरीसुद्धा माझे मन रामण्णांना सोडणार नाही. त्यांच्या मुद्दा हे लक्षात आलं असेल. रामण्णांवर आपलं किती प्रेम आहे ह्याची कुमुदला खात्री आली. शेवटी तिने रात्री झोपताना देवाची प्रार्थना केली—

"देवा, मी त्यांच्यावर जितके प्रेम करते, तितकंच त्यांचे प्रेम माझ्यावर असू दे. देवा, एवढेच माझे मागणे आहे. मग मला कुणाची भीती नाही. मग मला कुणाच्या मदतीचीही गरज नाही."

आता कुमुदला जुन्या आठवणी असह्य झाल्या. ती दुर्बुद्धी होती का सुबुद्धी ? . . रामण्णांचे प्रेम माझ्यावर असो म्हणजे सारं मिळवले. . . . हे शब्द त्या दिवशी तिच्या तोंडातून निघाले होते. त्या शब्दांतील लपलेला अर्थ आज दोन अडीच वर्षांनंतर कुमुदच्या ध्यानात आला. म्हणूनच रामण्णांना आपल्याकडे आकर्षित करून घेण्यासाठी तिला देवाची प्रार्थना करावी लागली. त्यावेळी तिला ह्या सर्वांत कुठेही संशयाला जागा दिसली नाही. आता मात्र दिसत आहे. . . वाक्य पुरं करायच्या आधीच कुमुद अंथरुणावरून उठली. डोळ्यावरची झोप उडाली नव्हती. डोक्यात विचारांचा गोंधळ चालूच होता . म्हणून अंथरूण वगैरे ठीक करून जो एखाद्या यंत्रासारखी तक्क्याला टेकून बसली. नकळतच तिने एक जांभई दिली. . मुळीसुद्धा आवाज न करता !

## ११

द्वीपादन्यस्मादपि मध्यादपि, जलनिधेर्दिशोऽप्यंतात् ।
आनीय झटति घटयति, विधिरभिमतभिमुखीभूत: ।।

रामण्णांनी डोळे चोळत चोळत पुन्हा एकदा पाहिले. हे काय ? किती वेळ झाला, हा श्लोक समोर ठेवून बसले आहेत. . .मनात नाना तऱ्हेच्या विचारांचा गुंता वाढतच होता...त्या चिंता, ते विचार. सारं सारं विसरून जाण्यासाठी त्यांनी हा संस्कृत ग्रंथ वाचण्याचा निश्चय केला होता. इकडे तिकडे शोधता शोधता त्यांना श्रीहर्षाचे रत्नावली नाटक मिळाले होते. . तरुण असताना ह्या नाटकाच्या वाचनाने रामण्णा किती प्रभावित झाले होते. . .आज नाटक हातात घेतल्यावर त्यांना केवढा आनंद झाला होता. खुर्चीत मोठ्या आरामात बसून, समोरच्या टेबलावर पाय पसरून त्यांनी पुस्तक वाचायला सुरुवात केली. सूत्रधार, प्रस्तावनेच्या शेवटी "द्वीपादन्यस्मादपि" श्लोक म्हणतो. ह्या श्लोकाच्या अर्थाने रामण्णांचे मन प्रभावित झाले ! बुद्धी आणि तर्क ह्यांवरच विश्वास ठेवणारे रामण्णा. पण ह्याही पेक्षा, साऱ्या घटनांना घडवून आणणारी निसर्गाची युक्ती (कदाचित् शक्ती) त्यांना अधिक मजेदार वाटली. हीच गोष्ट त्या श्लोकात होती म्हणून रामण्णांना तो श्लोक फार आवडत असे. विधिलिखित हीच निसर्गाची खरी करामत. दैव, निसर्गाची युक्ती (अथवा शक्ती) आहे. मनात असले तर, दोन निरनिराळ्या बेटांवरून, किंवा दहा दिशांच्या एका कोपऱ्यातून एक प्रसंग किंवा एक व्यक्ती आणून दैव आपला प्रभाव दाखवते. मनुष्याला जी आकस्मिक घटना वाटते ती खरी निसर्गनियमात बांधलेली घटना असते. किती मजेशीर पण तरी सुद्धा केवढे महान् सत्य आहे. अतिशय उत्तम श्लोकांपैकी हा एक श्लोक आहे. "द्वीपादन्यस्. . " वाचता वाचताच रामण्णांनी स्वत:ला आवरून धरले. ते सारं ठीक आहे. पण आता जवळ जवळ अर्धा तास एक तास झाला असेल. इतका वेळ रामण्णा ह्या श्लोकाभोवतीच घुटमळत होते. असं का ? रामण्णांनी पुन्हा एक दीर्घ सुस्कारा सोडला. जी गोष्ट विसरून जायला हवी म्हणून त्यांनी ह्या पुस्तकाच्या मदतीने बुद्धिपूर्वक प्रयत्न केला होता . शेवटी त्या गोष्टीची आठवण पुन्हा ह्या श्लोकाद्वारे उचंबळूनच आली. जेवताना दातांत अडकलेल्या भाजीच्या तुकड्यासारखी ही आठवण त्यांना एकसारखी छळत होती. दातात काहीतरी अन्नाचा कण अडकलेला असला म्हणजे मग तो काढल्याशिवाय चैन पडत नाही. पण निश्चितपणे ती कोणती बरं आठवण ? थोड्या वेळापूर्वी ती अगदी डोक्यात केवढा त्रास देत होती. तीच आठवण.

थोड्या वेळापूर्वी त्यांनी स्वतःलाच प्रश्न विचारला. "आपण सरलावर प्रेम करतो का कुमुदवर ? जाऊ दे. इथं कुणाला समजून घेण्याची आवश्यकता आहे ? असं बोलून त्यांनी आपले अंग झटकून टाकले होते. आता हेच सारे प्रश्न श्लोकाच्या द्वारे त्यांच्या हृदयात शिरून संघर्ष करीत होते. कशाला उगीच विचार करायचा ? असं स्वतःशी पुटपुटताना रामण्णांच्या चेहेऱ्यावर केवढी उदासीनता पसरली ! परंतु दोन वर्षांपूर्वी मात्र त्यांची मनःस्थिती फारच वेगळी होती. त्यावेळी त्यांना कुमुद की सरला ह्या दोन प्रश्नांपैकी एकाचे उत्तर निश्चितच हवे होते. दिवसभरात नाही तरी रात्री हे सांगायलाच हवे होते. ह्या प्रश्नांनी ते अगदी निराश होऊन जात. एकदा एक, दुसऱ्यांदा दुसरेच उत्तर देणे त्यांना ठीक वाटले. त्या रात्री मनात विचारांचा प्रखर संघर्ष झाला होता. त्यामुळे थकून भागन ते एखाद्या पशूसारखेच वागले. रामण्णांनी विचार केला. पशू आणि मानव ह्या दोघात फरक फक्त बुद्धीचाच आहे. बुद्धी निष्क्रिय होताच मनुष्य, पशूच्या पातळीपर्यंत जाऊन पोचतो हेच बरोबर आहे. त्या रात्री त्यांना तोच श्लोक आठवत होता.

खरं म्हणजे त्या रात्री रामण्णा, कुमुदबरोबर अगदी एखाद्या जनावरासारखे वागले. आजसुद्धा त्यांना त्या गोष्टींची राहून राहून आठवण येत आहे. त्या दिवशी त्यांना नंतर फार वाईट वाटले. आपल्याला काय झालं एकदम ? आपलं मन एवढं का बिथरून गेलं ? नंतर तीन चार रात्री, ते कुमुदच्या खोलील जात असत. इंद्रियसुखाच्या इच्छेने. फक्त कामेच्छा ? तारुण्याने मुसमुसलेल्या त्या तरुण मुलीच्या सहवासाने त्यांना नवा उत्साह मिळाला. एक मोठा पराक्रम . . साहस करून पाहिले. म्हणून हा उत्साह सळसळत होता ? . . . काहीही असो. ह्या एका नव्याच अनुभवाने एक निराळीच रंगत आली होती. तीन चार दिवस ती धुंदी उतरली नव्हती. त्या दिवशी संध्याकाळी साधारण दहा वाजल्यानंतर त्यांच्या डोक्यात कुमुदकडे तिच्या खोलीत जाण्याचा विचार आला. ते हळूच दरवाजा उघडून ते बाहेर आले. पुन्हा दरवाजा मुळीच आवाज न करता बंद करू लागले . . . तोच त्यांना सरलाच्या खोलीतून खोकलण्याचा आवाज आला. त्या अनपेक्षित आवाजाने रामण्णा दचकलेच. दरवाजा बंद करता करता त्यांचा हात थरथरू लागला. आणि आवाज झालाच तेव्हा झटकन निर्णय घेऊन ते सरलाच्या खोलीत शिरले. ते म्हणा ठीकच झाले. कारण ते झटकन खोलीतून बाहेर आले, तसा दरवाजांचा आवाज झालाच. परंतु सरलाच्या खोलीत पाऊल टाकताक्षणीच त्यांचे ते सारे विचार कुठल्या कुठे पळाले. आणि अगदी आनंदी चेहऱ्याने ते सरलाकडे धावले. सरला ा चेहेरा थकलेला दिसत होता. पण चेहेऱ्यावरची कांती तशी कमी झाली नव्हती . . . थोडीशी काळवंडलेली दिसत होती. अशक्तपणामुळे तिला धड श्वास ही घेता येत नव्हता. तिच्याकडे पाहताच हे लक्षात येत होतं, तरी सुद्धा रामण्णांना पाहून

सरलाने हसण्याचा प्रयत्न केला. किती असामान्य स्त्री आहे ही ! आपल्या वेदना दुसऱ्याला दाखवीत नाही. सदैव दुसऱ्यांना प्रसन्न ठेवण्याचे व्रतच जणू घेतलंय. हे सारं पाहून रामण्णांना गहिवरून आले. ते लगेच तिच्या जवळ बसले. तिच्या डोक्यावरून हात फिरविला. पाठीवरून हात फिरविला.

"अहो, मला काय झालंय ? एवढं घाबरून कशाला आलात ?"

रामण्णांना काय उत्तर द्यावे हेच सुचेना.

"लेखन सोडून आलात वाटतं, पुन्हा ?"

रामण्णांना विषय बदलण्याची संधी मिळाली.

"अग, असं काय महत्त्वाचं लिहीत होतो ग !"

"छे ! व्यर्थ आहे माझं जगणं. मलाही सुख नाही." बोलता बोलता सरलाने अश्रु आवरून धरण्याचा प्रयत्न केला आणि ती एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर गेली.

रामण्णा क्षणभर स्तब्ध राहिले. जणू काही सवयीनेच त्यांचा वत्सल हात एखाद्या थंडगार वाऱ्याच्या झुळकीसारखा सरलाच्या पाठीवरून फिरत होता. रामण्णांच्या प्रेमळ स्पर्शाने सरलाचे दुःख जरा ओसरले. त्या मौनातच दोघांच्या हृदयांचेही मीलन झाले.

रामण्णांनीच प्रथम बोलायला सुरवात केली.

"का सरला? तब्बेत जरा बिघडली का ?"

पडल्या पडल्याच मान हलवून सरला म्हणाली—

"छे, हो, काही तरी काय ! मी बरी आहे की !"

"मग इतक्या वेळा तुला झोप आली नाही ?" कुठेतरी आत आत काटा टोचल्या-सारखं झालं रामण्णांना "अग झोप लागत नव्हती, तर मला बोलवायचं नाही का ?"

सरला काहीच बोलली नाही.

रामण्णांनी सरलाला नीट व्यवस्थित झोपविले. तिची हनुवटी हातात घेऊन विचारले,

"सांग, सरला, काय होतंय तुला ?"

"छे, हो, काऽही नाही !"

"काही नाही कसं ? तू खोटं सांगतेस सरला. तुझा चेहरा पाहूनच माझ्या लक्षात आलं की तुला काही तरी होतंय.

सरला हसत हसत म्हणाली,

"काही नाही हो . . . मला अगदी चागलं बरं आहे."

"मग झोप का नाही आली ?"

"किती झोपणार हो ? आज किती वर्ष तेच चाललंय. केव्हा हे सारं संपणार आहे कुणास ठाऊक !"

वेडाबाई उगीच विचार करीत बसतेस बघ. तुला किती वेळा सांगितलं मी सरला, उगीच असले भलते सलते विचार डोक्यात आणूच नकोस मुली !''

"मग काय करू ? मला स्वत:लाच जगायचा इतका कंटाळा आलाय ! दुसऱ्यांना माझा किती त्रास ?''

"अग, तू एका जागी. अशी बिछान्यावर पडली आहेस ना. म्हणून तुला असं वाटत असेल, सरला आणि आम्हाला कसला त्रास. तुला आता लवकरच बरं वाटेल बघ. ह्या आशेवरच . . . आपण जगतो आहोत ना ?"

"मी आता ह्या दुखण्यातून बरी होणार ? छे ! ही निव्वळ कल्पनाच आहे तुमची. सगळ्या प्रकारची औषधं झाली. सतरा प्रकारची इंजेक्शनं झाली. चांगले चांगले डॉक्टर आले.''

"मग काय ? तू बरी होणार म्हणून तर मी हे सर्व करतोय बघ.''

"तुम्ही आपलं कर्तव्य चोख बजावलंत हां. माझं हे दुखणंच मुळी असलं आहे त्याला कोण काय करणार ?''

रामण्णांनी हसत हसत विषयाला कलाटणी देण्याचा प्रयत्न केला.

"काय कर्तव्य केलं ग मी मोठं ? इतकी वर्षे तू मला चांगलंचुंगलं खायला घातलंस. किती भरभरून सुख दिलंस . . . कधी जुने शर्ट दुरुस्त कर, तर कधी सदऱ्याची तुटलेली बटणं लावून काढ. . . . सरला, तू माझी केवढी सेवा केलीस ! तुटलेल्या बटणांचा हिशेब करून ठेवलाय. त्यांचं जेवढं बिल झालंय, ना. तेवढ्याची तुला औषध आणून दिली बघ. !"

"पुरे हो तुमची चेष्टा ! . . . माझ्या म्हणण्याचा तसा अर्थ नाही हो . . . पण मी म्हणते . . . आता एखाद्या सुकून सुकून मरून जाणाऱ्या रोपट्याला विहिरीतून पाणी काढून, घालण्याचा एवढा आटापिटा कशाला हो ?''

"सरला. तू मरणाचा विचार सोडून दे बघ. तुला बरं करण्याची जबाबदारी माझी आहे. खरं की नाही ? हे बघ. एक गोष्ट लक्षात ठेव. विंचू दिसला की "आस्तिक आस्तिक'' म्हणायचं !"

"म्हणजे काय? . . . सरलाने हसत हसत विचारले."

" अग, असले घाणेरडे विचार मनात आले ना, म्हणजे मला जवळ बोलावून घ्यायचं, कळलं ? तुला झोप लागेपर्यंत मी इथं तुझ्याजवळ बसून राहीन."

थोडा वेळ सरला काहीच बोलली नाही. मग एक दीर्घ सुस्कारा टाकून म्हणाली.

"काही तरीच बाई, तुमचं बोलणं."

"म्हणजे ?" रामण्णांना काहीच उमगले नाही.

"अहो मी म्हणते उगीच दुसऱ्यांना किती त्रास द्यायचा ?"

"अग, इथे येऊन तुझ्याजवळ बसण्यात त्रास कसला ?"

"तुम्हाला त्रास नाही हो वाटणार. तुम्ही तसं कधी दाखवतही नाही. पण तरीसुद्धा मी तुम्हाला हाक मारणार नाही."

"म्हणजे, माझं लेखन तुझ्यापेक्षा महत्त्वाचं आहे काय ?"

"मग बरोबरच आहे. तुम्हाला लेखनाने आनंद मिळतो. आणि किती तरी असंख्य वाचकांनाही आनंद मिळतो. . . . तेव्हा ते लेखन सोडून इथं, मरायला निघालेल्या बायकोजवळ काय होणार आहे ?"

"तू लेखिका असतीस, सरला, तर आम्हाला तुझ्याशी बोलायचीसुद्धा संधी मिळाली नसती." . . . रामण्णा हसू लागले. . . . त्यांनी सरलाला पण हसायला लावले. . . . आणि तो विषय विसरून जाण्याचा प्रयत्न करू लागले.

"तरी सुद्धा बघा. . . माझ्या मनात गेले चार दिवसांपासून नको नको ते विचार येत आहेत बघा. किती प्रयत्न करते बघा."

"सरला माझं ऐक तू. मनात असे घाणेरडे विचार आले ना की मी सांगतो ती युक्ती लक्षात ठेव. मनात आले की, ते विचार लगेच झटकून टाक. शिंक जशी झटकन येते तसे विचार डोक्यात झटकन् शिरतात. त्यांना थोपवून धरायचं म्हणजे ?"

"ह्या विचारांना हाकलून द्यायचं म्हणजे काय सोपं का आहे ? खोकण्यासारखं ? की शिंक देण्यासारखं ?"

"दुसऱ्या कुणाजवळ . . . म्हणजे मलाच सगळं सांगून टाकावं. बरं, कालपरवाची गोष्ट सोडून द्या. आज काय विचार आला ते सांग बघू."

"छे, काही तरीच काय."

"बघ हं, औषध घेतलं नाहीस तर दुखणं बरं होईल का ?"

"तुम्ही हसू नका मला. खरं सांगा हसणार नाही ना ?"

"नाही ग."

"तुम्ही रागवणार का ?"

"नाही, नाही, नाही. काय विचारणार ? हसणार नाही. रागवणार नाही . . . कोणता विषय आहे ?"

"सांगून तरी काय फायदा ?"

"अग, आधी सांगतरी. मग फायदा वगैरे सारं बघू मागून !"

"अहो, आधी नुसतं सांगून ते काही मनातून निघून जाईल का ?"

"मग काय केल्याने हे विचार मनातून निघून जातील ?"

"तुम्ही माझं ऐकाल ? . . . मला वचन द्या बघू आणि मग जरा थांबून सरला म्हणाली, जाऊ दे बाई उगीच तुम्ही वेळ कशाला घालवता वाया ? अकरा वाजायला आले. मलाही आता झोप आलीय" . . .

एक दोन मिनिटं रामण्णांनी सरलाकडे नीट लक्ष देऊन पाहिले. हळूहळू तिच्या चेहेऱ्यावर हसू फुलू लागले. त्यांनी सरलाच्या डोक्यावरून इतक्या कोमलपणे, हळुवारपणे हात फिरविला . . . जणू त्यांचे हृदयच बाहेर आलंय. हळूच त्यांनी सरलाचे डोके उचलून घेतले. आणि आपल्या मांडीवर ठेवले. . . . आणि तिचा चेहरा पाहू लागले. सरलानेही डोळे भरून आपल्या पतीला पाहिले. नजरेला नजर मिळाली. आणि नंतर हृदयाला हृदय मिळाले. तिच्या मनातील गोष्ट रामण्णांना समजली.

रामण्णांनी हसत हसत म्हटले., "सरला, ती एक गोष्ट सोडून, मी तुला पाहिजे ते करीन बघ !"

त्यांना चिडवत सरला म्हणाली.

"कोणती ती गोष्ट ?"

"आता, ह्या क्षणी, तुझ्या मनात आहे ना ती !

"मला माहीत होतं ! . . . सरलाने दीर्घ सुस्कारा घेत म्हटलं . . .

"ते शक्यच नाही . . . हे तुला खरं म्हणजे केव्हाच कळायला हवं होतं !"

"सांगा बघू. कसं शक्य नाही हो ?" सरला दुखण्याने अशक्त झाली होती. पण तिच्या आवाजात चांगलाच हट्टीपणा होता.

"सरला, तुला काही समजत नाही. हे बघ, तू आता लवकर बरी हो. आणि हे असले घाणेरडे विचार मनातून काढून टाक बघू !"

"लवकर बरी हो !" सरलाने स्वतःशीच हे वाक्य म्हटले. . . . "काही होणार नाही तुला. लवकर बरी होशील . . . काय उगीच खोटं खोटं बोलता, असं अंथरुणावर खितपत पडून पडून एक वर्ष लोटलं. सारं घर जणू खायला उठलंय ! ह्या घराला मी

कोणतं वैभव दिलं ? आता बोलून काय उपयोग ? आणि हे बघा, तुम्ही अजून काही म्हातारे झाला नाहीत. घरात मूलबाळ हवं !"

"वेडाबाई, आधी बायको हवी. मग पोरांची गोष्ट."

"माझ्यासारखी आजारी, अंथरुणाला खिळलेली बायको मिळाली तुम्हाला. . . . पण कुठलं मूळबाळ हो ?"

रामण्णा काय उत्तर देणार ? कधी कधी सरला अशीच बोलायची. . . . पण आता तिला काय उत्तर द्यावे हे त्यांना सुचलेच नाही. सरलाला काही तरी भीती वाटत होती. ह्या संकटातून आपण निभावणार नाही हे तिला चांगलंच माहीत होतं. तिच्या डोक्यातून ही भीती घालविण्याचं रामण्णांना जमलंच नाही. ह्या बाबतीत त्यांनी जास्त विचारही पण कधी केला नाही. त्या विचाराची त्यांना आतल्या आत भीतीच वाटत होती आतासुद्धा त्या आठवणीने त्यांचे शरीर थरथर कापू लागले.

"का ?" सरलाने रामण्णांना विचारले, तिने त्यांचे थरथरणे पाहिले होते.

रामण्णा जरा रागावूनच म्हणाले– "सरला तुझ्या बाबतीत वाईट विचार मनात आला की माझे सारे शरीर थरथर कापते बघ . . . . तोंडातून शब्दसुद्धा फुटत नाही बघ. मी तरी काय करू ? तूच सांग सरला." हताश होऊन रामण्णांच्या तोंडातून हे शब्द बाहेर पडले.

पडल्या पडल्याच आपल्या हातांनी रामण्णांच्या गालाला कुरवाळून सरला म्हणाली,

"अहो आता कुणाला वेडं म्हणावं तेच मला कळत नाही बघा . . . मी कशाला वाईट चिंतू ? . . . मी मेल्यावर तुम्ही काय कराल, ते कुठे कोण पाहणार आहे ? . . . आणि मला मरायचं नाही ना . . . तर मग माझ्या डोळ्यासमोर माझी इच्छा पूर्ण करा !"

सरलाची पुरती गोष्ट रामण्णांनी ऐकलीच नाही, सुरवातीचे पहिले शब्दच त्यांनी एकले . . . आणि तेवढ्यानेच उत्साहित होऊन म्हणाले– "सांग, सांग, तू तुझी इच्छा सांग, तसं मी करीन बघ !"

रामण्यांच्या तोंडून वाक्य पुरे होते न होते तोच सरला म्हणाली–

"ते भाग्य पाहण्यासाठी तरी देव मला आयुष्य देऊ दे. खरच माझं ऐकाल ? माझी इच्छा पुरी कराल ? खरंच ?

सरला बोलत होती. रामण्णा मान हलवीत होते. तेव्हा सरला पुढे म्हणाली,

"मग, आणखी एक लग्न करून टाका बघू."

"काय ?" रामण्णा असे दचकले, जणू काही त्यांच्या अंगावर वीजच कोसळली.

"नाही, नाही, . . . असे दचकू नका. मी तुम्हाला हात जोडून सांगते बघा. माझी फार फार इच्छा आहे. माझ्यासाठी म्हणून करा. ह्या घरात एखादं मूल खेळताना पाहिलं की मग मी सुखाने मरेन !"

रामण्णा यंत्रासारखी मान हलवीत होते. पण मन म्हणत होते . . . छे, हे शक्य नाही . . . मुळीच नाही . . . "

"एवढेच ! फक्त एवढंच करा माझ्यासाठी. मग मी सुखाने डोळे मिटीन." सरला जणू काही पदर पसरून भीक मागत होती.

"सरला आता जे सुख मला मिळत आहे ना त्यापेक्षा मला काही नको जास्ती. . ." रामण्णांच्या तोंडून कसेतरी शब्द बाहेर पडले.

आता दोघे खरं म्हणजे बोलण्याच्या मन:स्थितीतच नव्हते. सरलाच्या डोळ्यांतून अश्रू ओघळू लागले. रामण्णांचे हृदय दु:खानं होरपळून निघालं.

. . . गदगदलेल्या स्वरात ते म्हणाले, "सरला तुला कल्पना आहे का, मला किती दु:ख होतंय ?"

तेव्हा सरलानेच त्या वाहणाऱ्या दु:खाला बांध घातला आणि समजावणीच्या स्वरात म्हणाली– "आता तुम्हाला वाईट वाटत असेल ना तर हा विषयच राहू द्या."

इतका वेळ बोलल्यामुळे कदाचित् सरला थकून गेली. . .का मनातील व्यथा बोलून दाखवल्यामुळे तिला जरा हलके हलके वाटू लागले कुणास ठाऊक ! काही का असेना. दोन मिनिटांतच ती एखाद्या लहान मुलासारखी झोपी गेली. थोडा वेळ थांबून मग रामण्णांनी, तिचे डोके हळूच आपल्या मांडीवरून काढून शेजारच्या उशीवर ठेवले. . . .आणि ते बाहेर पडले.

सरलाच्या खोलीतून बाहेर आल्यावर रामण्णा एखाद्या दूरच्या प्रवासाहून, अपरिचित स्टेशनावर उतरलेल्या प्रवाशासारखे हरवलेले दिसू लागले. हे काय ? कोठे आलो मी ? कोठे चाललो मी ? . . .स्वत:शी पुटपुटत असतानाच, त्यांची नजर इकडे तिकडे गेली. त्यांना कुमुदच्या खोलीचा दरवाजा दिसला. काही दिवसापूर्वी. . .छे, काही मिनिटांपूर्वीच मी ह्या खोलीकडे चाललो होतो. . . .विचारांच्या ओघात त्यांची पावले कुमुदच्या खोलीकडे वळली. . .शी ! . . .हा कसला घाणेरडा विचार ! . . . असं मनाशी म्हणतच रामण्णा स्वत:च्या खोलीत शिरले. आणि त्यांनी दरवाजा बंद करून घेतला. पण त्यांचे मन अतिशय बेचैन झाले होते. त्यांना खोलीत बसवत नव्हते. शून्य नजरेने ते इकडे तिकडे पाहू लागले. मग विचार केला पुन्हा कधीतरी ! ... पावले जागची

उठेनात. सरलाची विनवणी...जणू तिच्या कानातून निघून त्यांच्या हृदयाला स्पर्श करून गेली होती. आज तिने इतकं विनवून विनवून का सांगितलं ? माझ्यासाठी सांगितलं ? "एवढं झालं म्हणजे मी सुखाने डोळे मिटीन." असं का ती म्हणाली ? . .की तिला सारे समजले ? आधीच आजारपणाने थकून भागून गेलेल्या तिच्या हृदयावर माझ्या ह्या वागण्याने केवढा आघात झाला असेल. . . किंवा कदाचित तिला माहीतही नसेल. . . आधीसुद्धा ती तेच सांगत होती आपल्याला. . .पण कधी इतकं आग्रहाने विनवून सांगितलं नव्हतं. म्हणत होती. "मी जिवंत असतानाच तुम्ही दुसरं लग्न करून टाका." छे ! आपल्या नात्याच्या मुलीशी—कुमुदशी—मी लग्न करून टाकावं, असं का तिला वाटलं ? . .कदाचित सरलाला भीती वाटली असेल. . .आपण गेल्यावर उगीच कुणाशी तरी लग्न करून बसतील. म्हणून आपण जिवंत आहोत तोच ह्यांचे लग्न होऊन जावे. बिचारी सरला. किती शुद्ध अंत:करण. किती सरळ स्वभावाची. अशी बायको मिळाल्यावर मी दुसरं लग्न करायला तयार होईन. असं कसं तिला वाटलं ? . . रामण्णांचे मन जरा हलके हलके झाले. मग त्यांना स्वत:च्या विचारांचेच हसू आले. म्हणे लग्न करा. खरेच सरला किती भोळी आहे. मी दुसरं लग्न करणार नाही. दुसऱ्या कुणाशी लग्न करण्याची गोष्ट एका बाजूलाच राहिली. . पण कुमुदशी ? रामण्णा पुन्हा गोंधळून गेले. कुमुदशी विवाह तर करणारच नाही असा विचार का आला ! आणि मग तिच्या खोलीकडे आपली पावले का वळतात ? . . .तिच्या खोलीत आपण कशाला शिरतो ? . . अशा हेतूने तिच्या खोलीत आपण शिरतो मग आपलं मन तिच्याशी लग्न करायला का तयार होत नाही ? . . छे ! छे ! विचारांच्या ह्या गोंधळातून स्वत:ला आपण आता वाचवले पाहिजे. जे व्हायचं ते होऊन गेले. आजपासून कुमुदच्या खोलीत पाऊस म्हणून टाकायचे नाही.

पण मग म्हणून काय झालं ! रामण्णांच्या मनात जे विचार आले. . .ते त्यांच्या बुद्धीला पटेनात ! आपण इथं नुसता विचार करीत बसलो तर तिला कळणार तरी कसे ? दोघांच्या सहमताने तर सारं पक्कं झालं. आता दोघांपैकी एकजण ते कसं तोडून टाकणार ? हा कुठला न्याय ? ह्याशिवाय कुमुदलाच आपल्याशी लग्न करण्याची इच्छा असेल तर मग आपल्या ह्या निश्चयाला काही अर्थ आहे ? पण जर तिच्या मनातसुद्धा लग्नाचा विचार नसेल तर ? मग हा विचारांचा गोंधळ कशाला ? असा वेडेपणा करू नकोस. . . रामण्णा स्वत:लाच समजावून सांगू लागले. "जा, ती बघ कुमुद तुझी वाट पाहात आहे."...रामण्णांचे मन उत्तेजित झाले. त्यांनी एक पाऊल पुढे टाकले.

"मग मुलांशिवाय घराला शोभा कशी ! माझ्यासाठी तरी तुम्ही लग्न करून

टाका. –घरात मुलं खेळताना बागडताना पाहून मी सुखाने मरेन !" सरलाचे हे शब्द दोरीसारखे त्यांना मागे मागे खेचून धरीत होते.

"तू वेडा आहेस. सरलाचा उपदेश ऐकायचा असेल तर जेव्हा तुला योग्य वाटेल तेव्हा लग्न करून टाक. पण उगीच कुणाची भीती बाळगून, समोरचं एवढं सुखाचं ताट का लाथाडून देतोस ?" ..रामण्णाचे मन त्यांना प्रश्न विचारू लागले... "चला ! जाऊ या..." दुसऱ्या मनाने त्यांना प्रोत्साहन दिले.

"खरंच माझं ऐकाल ना ? एवढं झालं ना म्हणजे मी सुखाने मरेन.. "सरलाचे शब्द...जणू त्यांचे हात पकडून त्यांना मागे मागे ओढीत होते.

छे ! सरलाचा विचार आपल्या डोक्यात कशाला आला ? आपण काय म्हातारे झालो आहोत ? तिने आपल्याला उपदेश केला...ती आपली गरज तिने ओळखली. तिचे हे सारं सागणं आपल्या सुखासाठीच नव्हेत का ? "जा ! लवकर, बिछान्यावर ते सुख तुझीच प्रतीक्षा करीत आहे. आता उशीर करू नकोस." रामण्णांचे मन त्यांना जणू चेतावणी देऊ लागले. रामण्णा दोनचार पावले पुढे सरकले. सरलाचे उपदेशाचे, सल्ल्याचे शब्द मागेच राहिले...उलट त्याना अस्पष्ट ...असं काहीतरी मागून ऐकू आलं..."वेड्या, अरे वेड्या...आता जे सुख तुझ्यापुढे वाढून ठेवलं आहे. ते उपभोगून घे...सरलाजवळ तू कबूल केलं आहेस ना ? आता हे समोर असलेले सुख तू लाथाडून दिलेस तर ते सुख तुला कुठे मिळेल रे ?"...रामण्णांचे मन त्यांना बजावून सांगू लागले...विचारांच्या ओघातच ते खोलीच्या बाहेर आले.

रामण्णांना प्रथम प्रथम फार दुःख झाले. मग त्यांना स्वतःचाच राग आला. इतका विचार करून कशाला आपलं डोकं तापवून घ्यायचं ? कशाला लग्नाचा विचार करायचा ? न्याय–अन्यायाच्या बाबतीत कशाला ? निसर्गनेच हा रस्ता दाखवून ठेवला आहे. अशा विचारानं, जरा अभिमानानेच त्यांनी कुमुदच्या खोलीत पाऊल टाकले. खोलीतील दिवा जळत होता. भिंतीवरील आरशात रामण्णांना स्वतःचेच प्रतिबिंब दिसले ..ते स्वतःचेच प्रतिबिंब...पाहण्याची त्यांना भीती वाटली. त्या प्रकाशात कुमुदशी सामना करण्याची त्यांना लाज वाटली असेल ? कुमुद भिंतीकडेच तोंड करून पडली होती...ते पाहून पुन्हा तसेच खोलीतून निसटण्याचा विचार त्यांच्या मनात डोकावला. पण त्यांत त्यांना आपल्या पौरुषाचाच जणू अपमान वाटला. "का म्हणून पळून जायचं ? मी ह्या एवढ्याशा मुलीला घाबरतो ? माझा हेतू मी तिला स्पष्ट सांगून टाकीन..." असा विचार करून, दिवा विझवून ते बिछान्यावर पडले...आणि पुरुषाचा अधिकार बजावून रामण्णा खोलीबाहेर पडले.

त्यांनी विचार केला. . . .खरंच, आपण कुमुदच्या खोलीतून बाहेर पडत आहोत. पण खरं म्हणजे आपण चोरासारखे तिच्या खोलीतून निसटलो आहोत...आता सारा उन्माद, नशा उतरल्यावर रामण्णा एक निराळाच मनुष्य झाला. छे ! हे काय केलं आपण ?... आता हा असा विचार मनात येऊनसुद्धा त्यांनी कुमुदची क्षमा मागितली नाही. कारण त्यामुळे त्यांच्या अभिमानाला केवढा धक्का लागला असता ! म्हणूनच ते तिथून चटकन् निसटले. खोलीत गेल्यावर त्यांना दिव्याचा प्रकाशसुद्धा सहन होईना. ते अंधारातच बसून राहिले. ". . .तू शुद्ध पशू आहेस." परतु पुन्हा त्यांना दुसऱ्या क्षणी विचार केला . . .की छे, हे तर पशूसाठीसुद्धा अपमानजनकच आहे. आपल्याला पशू म्हणवून घेणं ह्यात त्या पशूचाच अपमान आहे. कोणताही मनुष्य पशूइतका कामुक नसतो. तो तर निसर्गाने बांधून दिलेल्या नियमांचेच पालन करतो. . . .रामण्णा स्वतःलाच दोष देऊ लागले. पुन्हा त्यांच्या डोक्यात एक विचार आला— किती विचार करूनसुद्धा, कुमुदचा सहवास मिळाला नसता तरी, त्यांच्या जीवनात काहीच उणे राहिले नसते. तरी सुद्धा ते कुमुदकडे धावलेच. एका मिनिटापूर्वी तिथे एवढा अनपेक्षित व्यवहार घडूनसुद्धा त्यांना कुमुदचा राग आला नाही. जाऊन तिची क्षमा मागण्याची इच्छा झाली. त्या दिवसाच्या अनुभवाचा तर विसर पडलाच. मन पहिल्या अनुभवाची आठवण करू लागले. कुमुदची आसक्ती वाढू लागली. तेव्हा त्यांना रत्नावली नाटकातील तो श्लोक आठवला. माणसाचे मन कसे आहे ? मनुष्य पराभूत कसा होतो. मनुष्यापेक्षा त्याचे 'विधिलिखित' श्रेष्ठ आहे. हे वाक्य बदलून रामण्णांनी तेथे 'काम' शब्द जोडला आणि श्लोक पुरा केला. रामण्णांना त्यादिवशी त्या श्लोकाचा अर्थ अधिक चांगला कळला. 'काम' जर मनात आणील तर दुसऱ्या बेटांतूनच नाही, समुद्राच्या पलीकडूनसुद्धा नाही. तर पृथ्वीच्या एका टोकाहूनच एक मुलगी अचानक आणून ठेवील आणि तुमच्या हृदयाचे अपहरण होईल.

कुमुदने असेच केले असेल ? विचारात मग्न झालेले रामण्णा रात्रभर खुर्चीतच बसल्या बसल्या झोपी गेले होते.

ते सारं आठवून रामण्णा खुर्चीवरून उठले. त्या दिवसासारखी आज खुर्चीवर बसल्या बसल्या झोपण्याची जरूर नव्हती. तेव्हा सुखस्वप्ने पाहत होता. आता स्वप्नात सुद्धा सुखाचे दर्शन होत नाही. बोलता बोलताच त्यांनी हातातील पुस्तक टेबलावर टाकून दिले. दूर कुठून तरी बाराचे ठोके पडल्याचे त्यांनी ऐकले.

## १२

जांभई आली, आता झोप येणारच...हा कुमुदचा तर्क चुकीचा ठरला. एकसारख्या खूप जांभया देऊन, देऊनसुद्धा झोप येण्याचे चिन्ह दिसेना. झोप न आल्यामुळे आतली ऊब जांभईच्या रूपाने बाहेर पडत होती. दूरून कुठल्यातरी घड्याळाची टिक् टिक् कानांवर आदळत होती....एक, दोन, तीन... बारा ठोके आदळले. मध्यरात्र झाली होती. आता तरी जरा डोळा लागेल. पूर्वी तिला झोप आवरता आवरायची नाही....कधी कधी रात्रीच्या त्या शांततेतसुद्धा तिला घड्याळाचे ठोके ऐकू यायचे नाहीत. इतकी गाढ झोप ! तेव्हा तिला झोप नको असायची; आता सगळ्या आठवणी जणू मागच्या जन्मीच्या आठवणी वाटू लागल्या आहेत. पण ह्या गोष्टी फक्त दोन वर्षांपूर्वीच्या आहेत. तेव्हा रात्री सुखस्वप्ने आपल्या उघड्या डोळ्यांनी पाहण्यासाठी ती झोपेला आवरून धरायची. एक अनुभव तर अजून तिच्या डोळ्यासमोर जसाच्या तसा ताजा आहे. त्या दिवशी तिच्या जीवनात सूर्योदय झाला होता....सकाळपर्यंत ती तशी जागीच होती... तिच्या जीवनात रात्र जणू येणारच नव्हती. जागेपणीच स्वप्न पाहण्याची तिची इच्छा पूर्ण झाली. पण ते स्वप्नसुद्धा, इतर अनेक स्वप्नासारखे दूर दूर उडून गेले. जाऊ द्या. पण आजसुद्धा त्या आठवणी सुखं देणाऱ्या आहेत .. ह्या समाधानाने तिचा चेहेरा खुलला....झाल्या गोष्टी पाहण्याच्या हट्टाने तिचे डोळे आजू बाजूचे सारे विसरून...भूतकाळ पाहण्यातच रमून गेले. जाऊ दे....काळ वेळ कोणता ते महत्त्वाचे नाही....ती गोष्ट महत्त्वाची आहे....त्या दिवशी रात्री– – –

खरं म्हणजे त्या रात्री कुमुद खरोखरच विशेष खूश नव्हती....गेले कित्येक दिवस तिला जे सुख भरभरून मिळत होते त्यात कुठेतरी अडथळा आला, अडचण आली. पति–पत्नींचे ते एकांतातील बोलणे...मग रामण्णांचे लगेच आपल्या खोलीत येऊन आपल्या शरीराचा उपभोग घेणे...आपला जणू अपमान करून गुपचूप पटकन् निघून जाणे, ह्या साऱ्या प्रकारानंतर कुमुदची मानसिक अवस्था अतिशय निराश, उद्विग्न झाली होती. एकीकडे तिला रामण्णांचा अगदी तिरस्कार वाटू लागला. पण पुन्हा ते समोर आले की सारं काही गिळून,...लाज सोडून...तिचे मन अगदी तृप्त, तृप्त होऊन जाई, रामण्णा जेव्हा जेव्हा येत तेव्हा असेच घडे. प्रथम प्रथम तीन चार दिवस रामण्णा आलेच नाही. तेसुद्धा तिने कसे तरी सहन केले. कदाचित् आपण विचित्रासारखे, एखाद्या जनावरासारखे वागलो म्हणून त्यांना लाज वाटली असेल.. ती आपल्या मनाला धीर देत होती. परंतु रामण्णांचं सारं वागणं. अगदी मनाला लागेल असंच होतं. त्यांनी तीन चार दिवस कुमुदकडे डोळे वर करूनसुद्धा पाहिले नाही. तिच्या

खोलीतसुद्धा आले नाहीत ते...एकदा कुमुदला वाटले, ते लेखन–कार्यात अगदी दंग असतील....पण छे तसेही नव्हते. रामण्णा दिवसभर सरलाताईजवळ बसत आणि अगदी मनोभावे तिची सेवा करीत. रात्री सरलाताईला झोप येईपर्यंत तिच्याशी गप्पा मारीत बसत. कुमुदला संशय आला. रात्री आपल्या बायकोची शुश्रूषा करण्यासाठी तेथेच पडून राहणार काय ? कशासाठी हे सारे ? आता बहिणींची सारी सेवाशुश्रूषा करण्यासाठीच ती इथं आली होती मग रामण्णांना आपले सगळे उद्योग सोडून, बायकोची सेवा करायला कुणी सांगितले होते ? ही कसली सेवा ? हे तर खरं म्हणजे सेवेचे ढोंगच होते की ! आपल्याला दूर ठेवण्याची ही सारी युक्ती आहे, दुसरं काय ? आणि खरं म्हणजे ह्याचंच कुमुदला फार फार दुःख झालं. आपल्या ताईची, आजारपणात सेवा शुश्रूषा करायचीही आपली योग्यता नाही का ? . . . मग ह्या घरात तिची जरूरच कुणाला आहे ?

ती एकटी बसून खूप खूप रडली ! बिचारी दुःखाने करपून गेली. रात्री झोपायच्या वेळीच, सकाळी हे करायचं, ते करायचं हे मग्न ती ठरवून टाकी. पण आता, तिला काहीच करायला जमत नव्हते. सारंच मुळी पार पार बदलून गेलं होतं. एक दिवस, सकाळी–सकाळीच रामण्णा धावत धावत तिच्या खोलीत आले आणि 'कुमुद, कुमुद' म्हणून हाका मारू लागले. कुमुद अर्धवट झोपेतच होती. तिला वाटलं रामण्णा खरंच आपल्याला हाका मारीत आहेत का हे स्वप्न आहे ? पण छे, ते स्वप्न नव्हते. रामण्णाच समोर बसून तिला उठवीत होते....हलवून हलवून. ती एकदम दचकून उठली. आणि भुताने पछाडल्यासारखी भेदरून, डोळे विस्फारून इकडे तिकडे पाहू लागली.

"अग, लवकर. सरलाच्या खोलीत जा बघ !"...बोलता बोलताच रामण्णा स्वप्नात आल्यासारखे पुन्हा तसेच ताडकन् निघून गेले. कुमुद तशीच झटकन सरलाच्या खोलीत गेली....पाहते तो रामण्णा आपल्या अंगावर कोट चढवीत होते. त्याच खोलीत एका कोपऱ्यात रामण्णांचा बिछाना पसरलेला दिसला. तेही तिने पाहिले.

"हे बघ कुमुद तू इथेच बैस मी डॉक्टरांना घेऊन येतो." . . . बोलता बोलताच रामण्णा घराच्या बाहेर पडलेसुद्धा.

त्या दिवशी कुमुदच्या मनात आले— आता, खरोखर विहिरीत उडी मारून जीव दिला पाहिजे. तिने स्वतःलाच दोष दिला. "छे ! आपण अगदी बेशरम, स्वार्थी, कसाई आहोत." तीन चार दिवस झाले सरलाताईचे हृदय कमकुवत झाले आहे– ही गोष्ट तिला घरात असूनसुद्धा कळली नाही. रामण्णाच स्वतः सरलाताईच्या खोलीत बसले असल्यामुळे तिला ही तिथे जाता येईना....पण तिला पाहिल्यावर सरलाताई नेहेमीसारखीच प्रसन्नपणे हसत होती. पण म्हणून काय झालं ? आपल्याच डोक्यात

भलतेसलते भाभरडे विचार आले होते. म्हणून आपण सरलाताईचा विचारच केला नाही. किती आजारी आहे ती. बिचारे रामण्णा. तीन चार दिवस त्यांनी एकट्यांनीच सारे सहन केले. आज अगदी आपल्याला उठविणं भागच पडलं म्हणून ते सकाळी आपल्या खोलीत आले. त्या दिवशी सकाळी, सरलाताई थोडा वेळ बेशुद्ध झाली होती...जरा वेळाने उपचार केल्यावर...सरलाताई शुद्धीवर आली....मग तिला जरा धीर देऊन, कुमुदला तिथेच बसवून रामण्णा डॉक्टरांना आणायला निघून गेले.

त्या दिवशी, '' रात्रीपर्यंत सरलताईची प्रकृती जरा सुधारली. कुमुदला वाटलं, .. बरं झालं, आपल्या सगळयांचं नशीब चांगलं, म्हणूनच सरलाताईला बरं वाटलं. .. सगळयांच्या नशिबात, तिने स्वत:ला कशाला घुसडवायचे ? .. दिवसभर धावाधाव करून, आणि पुन्हा काळजीने रामण्णा अगदी पार थकून गेले होते. कुमुदच्या मनात आलं .. आपल्या सुदैवानंच ह्या साऱ्या घटना घडत आहेत. त्या रात्री नऊ वाजता उगीच जेवायचंच म्हणून तिने दोन घास कसेबसे खाऊन टाकले. तोपर्यंत सरलाताईची प्रकृती खूप सुधारली होती. रात्री डॉक्टरांनी तिला झोपेची गोळी दिली होती. .. आता काही काळजी नको .. सांगून डॉक्टर निघून गेले होते. रात्री जेवण झाल्यावर तिने सरलाताईची विचारपूस केली. तिची प्रकृती बरी आहे, असं पाहून ती आपल्या खोलीत निघून गेली. खरं म्हणजे, मुद्दामच ती जरा लवकरच आपल्या खोलीत सटकली होती, दिवसभर ती अगदी बारकाईने रामण्णांच्या चेहेऱ्याचे निरीक्षण करीत होती. त्यांच्या चेहऱ्यावरचे भाव तिला समजले होते. आपल्या बायकोशी रामण्णांना जरा निवांतपणे बोलता यावे म्हणूनच ती लवकर तिथून निघून गेली होती. रामण्णांना श्रमपरिहार हवा असेल, त्या रात्री आपल्या खोलीत शिरताना कुमुद तशी, खुशीतच होती. रामण्णा आणि सरलाताईला मजेत गप्पा मारताना पाहून तिलाही बरे वाटले. शरीर थकल तरी मनाला आनंद मिळेल, अशा स्थितीत ती डोळे बंद करून, नुसती पडली होती. ती जागीच होती पण तरीसुद्धा एक विचित्र प्रकारची शांती तिच्या मनात होती. कितीतरी वेळ ती तशीच पडली होती. .. रामण्णा आपल्या बिछान्याजवळ उभे पाहून तिने एकदम डोळे उघडले. त्यांचा थकलेला पण प्रसन्न चेहेरा, ते हास्य पाहून कुमुदच्या मनात शंका आली. तिचं मन हलकं हलकं झालं !

कुमुदला वाटलं, आपल्याला रामण्णा, जणू जन्मजन्मांतरीचे फळ म्हणूनच मिळालेत! खरोखर ते किती शांत दिसत होते. त्यांनी किती प्रेमळपणे गप्पा मारल्या. रामण्णांच्या शरीरावरून हात फिरवून कुमुदने त्यांना आपल्याकडे आकर्षित करून घेतले. दु:खाने, काळजीने खचून जाऊन एखाद्या, अजाण बालकासारखे रामण्णा तिच्याकडे धावत आले होते. कुमुदच्या हे सार चटकन् लक्षात आलं ! गप्पा मारता मारता

रामण्णा कुमुदच्या बाहुपाशात जे झोपी गेले ते थेट सकाळपर्यंत ! कुमुदला बराच वेळ झोप लागली नव्हती. सकाळी उठताच, प्रथम रामण्णांनी तिच्या कपाळाचे चुंबन घेतले. तेव्हा कुठे कुमुदला जाग आली. काहीसं घाबरूनच तिने डोळे उघडले. भ्यायलेल्या मुलासारखे त्यांनी एकमेकांकडे पाहिले; तेव्हा रामण्णांनी ओठांवर बोट ठेवून, गप्प राहण्याची तिला सूचना दिली. पण कुमुदच्या चेहेऱ्यावर प्रसन्न स्मित विलसत होते. .. त्या प्रात:काळी कुमुदला वाटले खरोखरच स्त्रीचा जन्म घेऊन आपले जीवन सार्थक झाले !

थोडा वेळ रामण्णांचा प्रसन्न चेहेरा पाहून कुमुदला वाटले . . . आपण एका चिंतामग्न हृदयाला शांती दिली. त्या दिवशी तर तिला आणखीच आनंद झाला. खरं म्हणजे, एवढ्या आनंदानेच तिच्या जीवनाचे सार्थक झाले असते. परंतु सुखाचे किंवा दु:खाचे अनुभव काही वेळपर्यंत तसे मर्यादितच असतात. पण त्या अनुभवांच्या स्मृती मात्र खूप वेळपर्यंत मनात रेंगाळत राहतात. शिवाय सु:खाची अनुभूती चांगली वाटते. दु:खाचा अनुभव तसाच दु:खमय असतो परंतु सुख आणि दु:ख दोन्हींच्या आठवणी मात्र अगदी तशाच प्रभावी असतात दु:खाची आठवण आली की डोळे अश्रूंनी भरून येतात आणि हृदय अगदी हलके हलके वाटते. आणि बरे वाटते. ह्या साऱ्या गोष्टी कुमुदला स्पष्टपणे समजल्या नाहीत. (जर तिला ह्या गोष्टी समजल्या असत्या तर कदाचित् ती सुखदु:खापलिकडेच गेली असती.) परंतु त्या गोष्टी तिला संध्याकाळी आठवल्या. रामण्णांचा प्रेमळ चेहरा तिला पुन्हा पुन्हा आठवला. कुमुदने विचार केला, रामण्णांच्या बद्दल आपण काय अपेक्षा केल्या होत्या, दिवसभर थकूनभागून ते तिच्याकडे आले होते. तिच्याशी सुखदु:खाच्या गोष्टी केल्या होत्या. तिच्याजवळ ते एखाद्या लहान मुलासारखे गाढ झोपी गेले. त्यांच्या जीवनात आपल्याला निश्चित काही स्थान आहे. नाहीतर दु:खाच्या वेळी ते इतक्या जवळ कसे आले ? त्यांचे हृदय आणि आपले हृदय दोघांचे खरेखुरे मीलन झाले आहे. काही दिवसांपूर्वी दोन शरीरे मिळाली होती, आता दोन हृदये मिळाली. .. हृदयमीलनातच कुमुदला अधिक सुख मिळाले. तीन चार दिवस रामण्णांना केवढी काळजी होती. मग ते आपल्याकडे आले ह्या आठवणीनेच कुमुदला आनंदाचे भरते आले होते. .. बारा तासांच्या त्या अवधीत कुमुदच्या चेहेऱ्यावर केवढे तेज आले. ती किती सुंदर दिसू लालली. तिचे अंग अंग प्रेमरसाने भरून गेले होते. तिच्या चालीत सूर्योदयाचे नवचेतन्य दिसत होते. तिच्या बोलण्यातून पावसाळ्याच्या सुरवातीची प्रसन्न शीतलता प्रकट होत होती. तिला वाटलं, आपलं हृदय म्हणजे जवळपासच्या नदीनाल्यांना आपल्याबरोबर घेऊन सरळ मार्ग शोधत समुद्राला मिळणारी नदीच आहे.

त्या नवीनच अनुभवाची, कुमुदला पुन्हा पुन्हा आठवण झाली आणि तिची सारी कांतीच पार बदलून गेली. . . तिच्या चटकन् लक्षात आलं, सरलाताई आपल्याकडे हल्ली अगदी प्रेमळ नजरेने पहात आहे. आपल्याला पुन्हा पुन्हा जवळ बोलवत आहे. आपला हात हातात घेऊन खूप वेळपर्यंत तक्क्याला टेकून बसत आहे. त्या दिवसाची ती आठवण तर कुमुद कधीच विसरणार नाही. . . थोडा वेळ सरलाताई काहीच बोलली नाही. मग तिने प्रेमाने हाक मारली . . "कुमुद . . !" कुमुदला ती हाक इतकी प्रेमळ वाटली की लपलेल्या बालकाला शोधून आई त्याला आपल्या मांडीवर घेऊन गोंजारत आहे तसे तिला वाटले.

"ताई, तुला काही हवंय का ?"

"माझ्यामुळे तुम्हा सर्वांना खरंच फारच त्रास होतो बाई !"

"तुला कुणी हे सांगितलं, ताई ?"

"अग कुणी हे सांगायला का हवं ? मला सारं काही कळतं बघ !"

"तू उगीच त्रास करून नको घेऊस. दुसऱ्याची काळजी तुला कशाला ?"

"कुमुद, मला खूप वाईट वाटतं बघ. आता मला कसलीच आशा राहिली नाही. हे रोगी शरीर घेऊन असंच ह्या अंथरुणावर खितपत पडायचं !"

"ताई, तू आम्हा सर्वांना हवी आहेस हं, . . . विसरू नकोस हे !"

"कुमुद, तू अगदी वेडी आहेस बघ. कुणाला कोण पाहिजे ? जोपर्यंत तुम्ही धड आहात तोपर्यंत सर्वांना हवेसे वाटता. . मेल्यानंतर तर सारी जण विसरून जातात. . अग, जग चालणार कसं त्याशिवाय ?"

"ताई, तुला सांगितलंय ना, असले भलते सलते विचार डोक्यात आणू नकोस."

"मग काय करू कुमुद? तूच सांग बघू आता, काल माझी प्रकृती खूपच बिघडली. मला भीती वाटली. चला सगळं आटोपलं आता !"

"बरोबर, ताई असंच बोल. ना, . . की तुला मरणाची भीती वाटते. . . मग तर आपल्याला आनंदच होईल बघ."

"कुमुद, मला स्वत:ची मुळीच भीती वाटली नाही बघ. अग, मी कुणाचं काही भलं केलंय ? . . . पण देवाची एवढीच प्रार्थना करतेय, माझ्या हातून कुणाचं वाईट तरी नको व्हायला !"

"आता, तू कुणाचं वाईट करणार, ताई !"

"अग, पण मला मरायच्या आधी काही तरी चांगलं करायला हवं ना ?"

"ते काय बाई ?"

"तुझं लग्न. . !"

"पुरे झालं बाई, आधी तू चांगली बरी हो मग आपण ह्या बाबतीत विचार करू या."

एवढ्यावरच कुमुद थांबली. तिच्या लग्नाची गोष्ट निघताच सहजच ती लाजली. परंतु लगेच तिच्या डोक्यात दुसराच एक विचार आला. आपलं लग्न ! सरलाताईच्या मनात आपल्या लग्नाचा विचार का आला ? आपल्याबद्दल तिच्या मनात वात्सल्य-भावना आहे म्हणून ? की तिला आपल्याबद्दल काही संशय आला ? सरलाताईला असं का वाटलं ?. . आपण मरायच्या आत कुमुदचं लग्न होऊन जावं ? म्हणजे आपलं लग्न कुणा दुसऱ्याबरोबर ?

तेव्हा कुमुद म्हणाली. "ताई, जोपर्यंत तुला बरं वाटत नाही तोपर्यंत ह्या गोष्टीची व्यर्थ चर्चा कशाला ? मी मुळीच ऐकणार नाही !"

"त्यांना पण मी सांगून ठेवलेय. आता तुला एकदा सांगून टाकते. माझ्या डोळ्या-देखत एकदा तुझे लग्न झाले म्हणजे बरे. . ." बोलता बोलतांच सरलाताईने दीर्घ सुस्कारा टाकला.

'त्यांना पण सांगून ठेवलेय,'. . .हे वाक्य ऐकून कुमुदची हृदयक्रियाच बंद पडली. सरलाताईने आपल्या यजमानांना काय सांगितले असेल ? सरलाताईने त्यांना सांगितले असेल...कुमुदचं लग्न करून टाका. म्हणून का रामण्णा काल रात्री आपल्याशी इतक्या प्रेमाने वागले. त्यांना काही निराळेच वाटले का ? छे हा कुठला पेचप्रसंग निर्माण झाला बाई ?

"ताई, मी तुला हात जोडून प्रार्थना करते बघ. तू आधी चांगली बरी हो. . . मग. . ."

"कुमुद, तू वेडी आहेस का ? मी आता ह्या दुखण्यातून उठत नाही. . .माझी तुझ्यावर फार फार माया आहे. . .म्हणून ऐक माझं—"

"ताई, माझी शपथ तुला. .आता उगीच ह्या विषयाची चर्चाच नको बघू !" कुमुद अगदी जीव तोडून म्हणाली.

"का ग ?. .बरं जाऊ दे. मी आता पुन्हा त्यांनाच सांगते. तेच तुझ्याशी ह्या बाबतीत बोलतील."

सरलाताईच्या ह्या बोलण्याने तर जणू काही कुमुदचे प्राणच निघून गेले. छे ! हे काय उलटं पालटं झालं, कुमुद विचार करू लागली. कसा तरी तिने विषय

बदलण्याचा प्रयत्न केला. तीनचार दिवस झाले. रामण्णा सरलाताईची किती सेवा करीत आहेत. जेव्हा ती बेशुद्ध झाली त्या दिवशी त्यांनी किती धावपळ केली. रात्री-पर्यंत त्यांना खाण्यापिण्याचं काही सुचलं नाही. इत्यादी गोष्टी कुमुदने अगदी वर्णन करकरून सांगितल्या. सरला ह्या साऱ्या गोष्टी आनंदाने, अभिमानाने, आणि प्रसन्न चेहेऱ्याने ऐकण्यात अगदी तल्लीन होऊन गेली होती. इकडच्या तिकडच्या खूप गप्पा झाल्यावर कुमुदला वाटलं, आता आपल्या लग्नाची गोष्ट काही निघणार नाही तेव्हा तिने गप्पा थांबविल्या. शेवटी सरलाताईने म्हटले होते—"असं आहे होय. म्हणजे तू अगदी बारकाईने सारं पाहिलेलं दिसतंय." पाठीवरून हात फिरवीत ती कुमुदला म्हणाली..."कुमुद, तसं माझं नशीब चांगलं आहे बघ ! . "

हे शेवटचं वाक्य ऐकून कुमुदला आश्चर्यंच वाटलं. कोणत्या संदर्भात सरलाताईने हे वाक्य नशीबवानच आहे उच्चारले ? कुमुदने रामण्णांनी खूप स्तुती केली होती. "बरोबरच आहे. माझे यजमान तसे चांगलेच आहेत. ग." सरलाताई मनातल्या मनात म्हणाली असेल. कुमुदच्या डोक्यात आणखी एक विचार आला.. 'मी नशीबवान आहे' ह्याचा अर्थ 'माझ्या सांगण्याप्रमाणेच कुमुदचे लग्न होईल,' असे तर सरलाताईला म्हणायचे नव्हते ? ह्या विषयावर अधिक विचार करण्याची मानसिक शक्तीच कुमुदमध्ये आता राहिली नव्हती. सरलाताईच्या तोंडातून लग्नाचा विषय निघताच कुमुदच्या मनात दडलेले सारे विचार उसळून उफाळून आले.

लग्न? मोठे आश्चर्यच ? आतापर्यंत तिच्या मनात लग्नाचा विचारच आला नव्हता. रामण्णांच्या सहवासाचा तो अनुभव . . . त्याशिवाय लग्नाचा विचारच आला नव्हता. कुमुदला सरलाताईचे बोलणे आवडले. आपण मरायच्या आधी हिचे लग्न झाले पाहिजे. सरलाताईच्या ह्या हट्टामुळे कुमुदच्या मनात संशयाचे जाळे विणले गेले. कदाचित् सरलाताईचा विचार असेल का, कुमुदचे रामण्णांशी लग्न करून द्यावे. म्हणजे आमच्या दोघांच्या वागण्याचा तिला संशय आला तर ! छे ! सरलाताईचा स्वभाव असा संशयखोर मुळीच नाही. तिचं म्हणणं असं की, नवरा, मुलंबाळं हेच स्त्रीचे खरे वैभव. तिला मूलबाळ काहीच नव्हतं, ह्याचीच खरं म्हणजे तिला बोच होती. घरात एखादं मूल, खेळत बागडत असतं तर बिचारी किती सुखी झाली असती ! कुमुदचे विचार कुठल्याकुठे वाहात चालले होते. खूप वेळ विचार करकरूनसुद्धा तिला समाधान झाले नाही. डोळे मिटल्यावर तिच्यापुढे एक चित्र उभे राही. ती आणि रामण्णा सिनेमाला चालले आहेत. त्यांची मुलं घरात इकडे तिकडे बागडत खेळत आहेत. समोर अंथरुणावर पडल्या पडल्या सरलाताई प्रसन्न मुद्रेने, मुलांना खेळताना, बागडताना पाहत आहे. 'आता माझ्या जीवनाचे सार्थक झाले!' असं सरलाताई समाधानाने म्हणत आहे ! परंतु डोळे उघडल्यावर मात्र हे सारं दृश्य . . . एकदम निघून गेलं !

आठवणी दाटून आल्या होत्या. कुमुद अंथरुणावर उठून बसली. ती विचार करू लागली . . . त्या वेळी आपल्याला, झोप नको होती. जागं राहण्यात केवढी मजा वाटत होती. पण आता ? त्यावेळी निद्रादेवी जणू तिच्याशी लपंडाव खेळत होती. आज तीच निद्रादेवी दुष्यंत राजा जसा शकुंतलेला विसरून गेला तशी तिला विसरून गेली! दुष्यंत–शकुंतला. छे ! हे कशाला आपल्याला आठवले ? होय. एका रात्री ! पुन्हा पुन्हा . . . तेच! कुमुदला वाटले, आता आपण इथून दूर दूर कुठे पळून जावे . . . पाय लांब करून . . . तोंडावरून पांघरूण घेऊन ती गाढ झोपी गेली.

१३

रामण्णांनी फेकलेले पुस्तक, टेबलापाशी टक्कर खाऊन, उलटे-सुलटे होऊन गेले काही पाने उघडली गेली. . . व पुन्हा वेळी वाकडी मोडली गेली . . . आणि ते तोल गेलेल्या मनुष्याप्रमाणे खाली फरशीवर पडले. रामण्णांनी रागाने त्या पुस्तकाकडे पाहिले. . . आणि विचारले. ''ह्या जगात जेव्हा मनुष्याचा जन्म झाला. आणि जितके म्हणून लोक जन्मले त्या सर्वांसाठी एकएक पुस्तक निघाले. तरीसुद्धा माझी समस्या सोड-विण्यासाठी एखादे पुस्तक नाही का मिळणार ? साहित्य जीवनाच्या समस्या सोडविते. हा निव्वळ वेडेपणा आहे. जीवन काय आहे ? जीवनाचे प्रश्न असंख्य आहेत. ते प्रश्न सोडविण्याचा अर्थ काय ? हा विचार मनात येताच, स्वतः साहित्यकार असल्यामुळे त्यांना स्वतःचाच तिरस्कार वाटला. स्वतःचीच कीव वाटली.

त्यांची स्वतःची समस्या कोणती आहे ? तसं पाहिलं तर लोक म्हणतील . . . हा काय प्रश्न आहे ? आणि काही लोक तर टिंगलच करतील . . . . कसली मामुली समस्या. ह्यं . . . ह्यं . . . मूर्ख लोक. बिचारे अज्ञानी आहेत. पुन्हा त्यांचे दुर्भाग्य त्यांना माहीतच नाही . . . की आपण अज्ञानी आहोत. काही जण विचारतील कुठे आहेत प्रश्न आणि समस्या? तेच कुमुदबद्दलसुद्धा नाही का ? तिच्यापुढे कसला प्रश्न? आपली प्रिय पत्नी गेली. आता दांपत्यजीवनासाठी किंवा प्रेम करण्यासाठी मन तयारच होत नाही. आता कुणाचे बंधनच नाही. कुमुदला सोडून देणे सहज शक्य आहे. सोडायचे म्हणजे तिला घरातून हाकलून देणे नाही . . . पण मग आपले मन असे सैर-भैर का होत आहे ? आपल्या बायकोने तिचे पालनपोषण केले आहे. तेव्हा तिला

एखाद्या स्त्री शिक्षण-संस्थेत पाठवून स्वावलंबी करावे. तिच्या पायावर ती उभी राहील. आता ही कुठली गंभीर समस्या ?

. . खरं म्हणजे . . . लोक मूर्ख आहेत. हे असं म्हणणाऱ्यांना ह्या प्रश्नाचा पत्ताच लागलेला नाही. आपली प्रिय पत्नी मरण पावली हे सत्य आहे. पण कुमुदला तिच्याविषयी प्रेम वाटते की नाही कुणास ठाऊक ? कुणी तिला विचारलं का तरी ?

कुमुदचे जर आपल्यावर प्रेम असेल तर आपण तिच्याशी लग्न केले पाहिजे. त्या बाबतीत विचार कसला ?

छि: ! हे लोक मूर्खच आहेत. त्यांना प्रेमाचे रहस्यच कळले नाही. एखाद्यावर आपले प्रेम आहे की नाही हे कसे कळायचे ? पोट भरल्यावर आणखी झायला सांगावे . . . . हो म्हटल्यावर पुन्हा खायला द्यावे का ? हे सारे अशक्यच आहे. आणखी खाणे शक्यच नाही. समजा, त्या माणसाने नाही खाल्ले तर ह्याला जेवण आवडलेच नाही असा अर्थ घेतला जाईल. पण त्या माणसाने आधीच पोटभर खाल्ले आहे. जेवण छान झाले हे सांगायला साक्षीदार आहेच. कुमुदला आपल्या बद्दल प्रेम वाटतेच !

साधारपणे ह्या प्रश्नांबद्दल रामण्णा विचार करीतच नव्हते. कारण ह्या प्रश्नांची उत्तरे देण्यापूर्वी त्यांच्याशी संबंधित अनेक प्रश्न त्यांच्या डोळ्यांसमोर उभे राहात होते.

तो कोणता दिवस होता बरं ? त्या दिवशी काय झाले ? . . . हो बरोबर आठवले. एके दिवशी भल्या सकाळीच सरलाने सर्वांना घाबरवून टाकले. तोच दिवस होता. दिवसभर त्यांनी यंत्रासारखे काम केले. रात्रीपर्यंत सरला ठीक झाली. अगदी चांगली, पहिल्यासारखी बरी झाली. डॉक्टरांनी तीन चार वेळा बजावून सांगितल— आतां घाबरण्याचे काही कारण नाही. तेव्हाकुठे त्यांची पावले चालण्याचे काम करू लागली. डोळे पाहण्याचे काम करू लागले. कान ऐकण्याचे काम करू लागले . . . . पण ह्यांपैकी एकही अवयव तसा शुद्धीवर नव्हता. सारं काही ठीक झाल्यावर, उगीच नावाला त्यांनी थोडंसे खाऊन घेतले, पण त्यांना केवढे समाधान मिळाले होते ! झोप पण अगदी अनिवार झाली होती. रामण्णांना वाटलं, सरला-बरोबर आपल्याला सुद्धा जणू पुनर्जन्म मिळाला. त्यांना इतका आनंद झाला होता. की पोटभर रडावंसं वाटत होतं . . . कसा तरी मनातील आनंद त्यांना व्यक्त करावयाचा होता. तेव्हाच ते कुमुदच्या खोलीत गेले. आपण कुमुदशी अगदी प्रेमाने वागलो हे त्यांना अगदी चांगले आठवत होते. कुमुदकडे त्यांनी प्रेमाच्या नजरेने पाहिले. एक भोग्य वस्तू म्हणून पहिले नाही. त्या रात्रीची आठवण येताच रामण्णांना फार आश्चर्य

वाटले. . . . सकाळ केव्हा उजळली तेमुद्धा आपल्याला कळले नाही. आपण कुमुदच्या माथ्याचे चुंबन घेतले होते. त्यावेळी त्याच्या मनात हा विचारसुद्धा आला नव्हता की, कुमुदचा चेहरा हा एका स्त्रीचा चेहेरा आहे.

त्या दिवशी रामण्णांचा आपल्यावर खूप विश्वास होता. तर काय? माणसाचे मन म्हणजे एक विचित्र जग आहे . . . म्हणतातच ना कोणत्याही गोष्टीचा कधी विचार करू नये. दैवाच्या मनात काही निराळेच असते. हे सारे असेच आहे. कुमुदला आणखी काही पाहिजे होते, ह्या बाबतीत रामण्णांना 'कसलाच संशय वाटत नव्हता. आपल्या' बद्दल आणि कुमुदबद्दल जे विचार कधी उठलेच नव्हते ते आता मात्र डोक्यात घुसले आहेत. कुमुद आपल्यावर प्रेम करीत आहे हा विचार डोक्यात येताच रामण्णांचे मन हादरलेच, त्यांनी विचार केला—आता कुठले हे नवे संकट? आता कुमुद आपल्यावर प्रेम करते आहे. तर म्हणून आपण तिच्यासाठी काय करायचे? पण ह्या बाबतीत आपण परतंत्र आहोत. आपल्या स्वतःच्या हातात काहीच नाही. तेव्हा त्यांना प्रथम आपलाच राग आला. रामण्णांनी स्वतःलाच ह्या बाबतीत दोष दिला. आपल्या वागण्याने कुमुदला आपण उत्तेजनच दिले तर त्याचे प्रायश्चित आपल्याला मिळालेच पाहिजे. आपण मूर्ख आहोत. अगदी महामूर्ख आहोत. केवळ कामतृप्तीसाठी, वासना पूर्ण करण्यासाठी आपण तिच्या भोळेपणाचा फायदा घेतला. कुमुदला आपल्याकडे आकर्षित करून घेताना आपल्या मनात दुसरा कोणताच विचार नव्हता. तीसुद्धा अगदी सहजपणे आपल्याकडे ओढली गेली तेव्हाच आपल्याला कळायला हवे होते की, ती आपल्याला मोहित करीत आहे. . . आपण मात्र कपाळावर हात मारून घेतला. रामण्णांना साऱ्या स्त्रीजातीचाच राग आला. वासना उत्पन्न झाली की स्त्रीच्या मनात लग्नाची इच्छा उत्पन्न होते. स्त्रीला केवळ वासनातृप्ती नको असते. त्यासाठी एका नैतिक बंधनाची मोठी जरूरी असते. आणि कोणतीही नैसर्गिक वासना मनुष्याच्या मनावर इतका खोलवर परिणाम, पापपुण्याचा बोजा टाकीत नाही. कुमुद आपल्यावर प्रेम करते. मग आता पुढचा मार्ग कोणता?

संकटे आली म्हणजे ती एका मागून एक येतात. निसर्गाचा हा कोणता क्रूर नियम? आधीच चहूकडून संकटांनी घेरलेल्या रामण्णांवर आणखी एक संकट कोसळले. डॉक्टरांनी सांगितले होते. . .ह्या धोक्यातून वाचल्यावर सरलाच्या प्रकृतीची खूप काळजी घेतली पाहिजे. ह्यांच्यात आघात सहन करण्याची ताकतच राहिलेली नाही. त्यांना जे काय हवे असेल ते द्या. आणि अगदी लहान मुलासारखे त्यांना प्रेमाने जपा. रामण्णांना ही वेळ अनुकूलच वाटली. कुमुद आपल्यावर प्रेम करते ही खात्री झाल्यावर ते सरलाच्या जवळ अधिकाधिक वेळ घालवू लागले. आणि कुमुदच्या सहवासापासून

दूर राहण्याचे त्यांना एक कारणच मिळाले. "तुला एखाद्या लहान मुलासारखे जपले पाहिजे...असे डॉक्टरांचे म्हणणे आहे. म्हणून मी तुझ्या जवळच बसून राहीन... तुला चॉकलेट हवे तर तेसुद्धा आणून देईन बघ !" ...रामण्णांनी सरलाची चेष्टा केली.

तेव्हा सरलानेसुद्धा एकदा चेष्टेत म्हटले होते,

"...माझी इच्छा काय फक्त चॉकलेट देऊन पूर्ण करणार ?..."

रामण्णांनीही चेष्टेने हसत हसत नाटकातील पात्राप्रमाणे अगदी अभिनय करून म्हटले होते—"काय चॉकलेटचे नाव घेऊन मी तुझी चेष्टा करीत आहे ? तुला वेड तर लागलं नाही ना ? वाटल्यास माझी परीक्षा घेऊन बघ तुझी इच्छा असेल तर मी तुला त्रैलोक्य आणून देण्यास तयार आहे सरला !"

ह्यावर सरलाने एक दीर्घ सुस्कारा सोडला चेष्टामस्करीला थांबवून टाकणारा हा दीर्घ सुस्कारा. रामण्णा चकितच झाले.

"का, तुला खोटंच वाटलं का ?"

सरलाने काहीच उत्तर दिले नाही. तिने फक्त मान हलविली.

"मग काय नवऱ्यावरचा विश्वास उडाला का ?"

"ऊं हूं..." ...सरलाने मान डोलावली.

"मनात जे काही आहे ते सांगून तर टाक !"

सरला प्रसन्नपणे हसली.

"अग, असं काय मोठं मागणार आहेस सांग तर खरं...बघू या जमतं का ते !"

"मला माहीत आहे, तुम्ही काही करणार नाही !"

"बघ तर खरं," रामण्णानी सरलाकडे पाहून जणू आव्हानच दिले. ते हसले आणि म्हणाले,

तुझे आणि माझे हृदय अगदी एक होऊन गेले. बघ...आता काही न बोलताच आपले विचार एकमेकांना समजून येतात."

"पुरे झालं हो...तुम्ही काहीतरीच बोलत बसता."

"मग तोंड बंद करू का ? म्हटलंस तर डोळेसुद्धा बंद करतो बघ."

"छे, ही काही पाहण्याची वस्तू नाही !"

"बरं बाई. कान बंद करून घेतो मग..." बोलता बोलताच रामण्णांनी कानात बोटें घातली.

"तुम्ही खरं म्हणजे माझं कधीच ऐकत नाही. . .मी बोलायला लागले की कान बंद करून घेता !"

"जाऊ दे ! मी डॉक्टरांनाच सांगीन. त्यांनीच सांगितलं मला, त्यांना काय हवे ते द्या ! म्हणून डॉक्टरांना सांगतो—ह्यांना तोंड उघडून मागायला येईल असं एखादं औषध सांगा !"

"तोंड उघडून कशाला, हात जोडून मागते हो."

"भक्तश्रेष्ठ नाही हो ! आपले परमेश्वर प्रसन्न झाले आहेत. आपल्याला जे मागायचे असेल ते मागावे. डोळे बंद करून देईन !"

रामण्णांनी हे सारं किती चेष्टेत, थट्टेत आणि मिस्कीलपणे सांगितलं पण सरलाच्या उत्तराने मात्र ते अक्षरशः घामाने डबडबून निघाले. त्यांचे डोळे बंद होते. . . पण हे सारे क्षणभरच. दुसऱ्याच क्षणी सरलाच्या तोंडून निघाले,

"तुम्ही आता कुमुदच्या लग्नाचा विचार करा बघू." सरलाचे हे शब्द ऐकताच रामण्णांना आपले मिटून घेतलेले डोळे उघडायचीसुद्धा भीती वाटली.

"हे काय ? सरला, काय म्हणतेस ?

"मी आधी सांगत नव्हते. पण आपणच मला आग्रह केला ?"

"तू असं विचारशील तर मी काय करू ?"

"आता. डॉक्टरांना जाऊन विचारून या."

खरं म्हणजे, ही गोष्ट सरलाने अगदी चांगल्या हेतूने सांगितली होती हे रामण्णांना किती तरी दिवसांनी समजले. डॉक्टरांचा विषय त्यांनीच प्रथम काढला होता. त्या उद्वेगपूर्ण वातावरणात प्रसन्नता आणण्यासाठी सरलाने मुद्दामच ही गोष्ट चेष्टेच्या सुरात सांगितली. तेव्हा रामण्णांना खरं म्हणजे काहीच उमगले नव्हते.

जेव्हा सरलाने सांगितले होते—डॉक्टरांना विचारा. तेव्हा रामण्णांच्या मनात एकच विचार आला होता. त्यांचा आणि कुमुदचा संबंध सरलाच्या ध्यानात आला होता, की कुमुदनेच सरलाला सारे काही सांगून टाकले ? त्या दोन चार दिवसांत दोघांनी हळू आवाजात खूप गोष्टी केल्या. आता डॉक्टरांचे नाव घेतले तर त्यात एवढा कोणता अनर्थ झाला ? . . .अनर्थ कसला ? शेवटी जे व्हायचं तेच झालं ! सारंच चुकलं. रस्त्यातून जाणाऱ्या भुताला जणू घरात बोलावून घेतलं ! ह्या सत्यानाशी कुमुदला कुठल्या मुहूर्तावर घरात घेतलं कुणास ठाऊक. ही मुलगीसुद्धा कशी महा वस्ताद आहे बघा ! तोंडावर का नाही काही सांगितलं ? बरोबर, आपल्या मोहजालात फसविण्या-साठीच तिने पहिल्यापासून हा डाव रचला. छे. ह्यात आता काहीच संशय राहिला

नाही. त्या दिवशी आपल्या खोलीत कुमुद पुस्तक शोधायला आली. त्याआधी तिच्या हाताचा तो स्पर्श, तिला सिनेमाला घेऊन जाण्यासाठी बिचारी भोळी सरला आपल्या मागे लागली. हे सारे पूर्वनियोजितच होते. आता म्हणूनच हिने सरलाला सारे सांगून टाकलेले दिसतेय...म्हणजे आपण ह्या जाळ्यात पूर्णपणे फसून जाऊ—देवा ! देवा !"

"तुला कुमुदने हे सांगितले का ?" रामण्णांनी सरलाला शेवटी विचारलेच.

"छे ! अशा गोष्टी ती एवढीशी मुलगी आपणहून सांगेल का ? मी तुमच्याशी ह्या बाबतीत बोलत आहे हेसुद्धा तिला माहीत नाही."

सरलाचे हे उत्तर ऐकून रामण्णांचा संशय आणखीच पक्का झाला. सरलाला ही असं उत्तर द्यायला हवं होतं की, तिच्या मनावर काही वाईट परिणाम होणार नाही. तिचं मन कसं दुखवायचं ? आपल्या मनातील विचारांचा तिला थांगपत्ता लागला कामा नये... म्हणून स्वत:ला सावरून घेऊन हसत हसत त्यांनी उत्तर दिले, "बरं मी डॉक्टरांना विचारतो."

त्या दिवशी रामण्णा किती तरी वेळ एकटेच विचार करीत बसले होते. त्यांच्यासमोर दोन गोष्टी स्पष्ट दिसत होत्या. कुमुदच्या आणि आपल्या संबंधांचा परिणाम काय होणार आहे ? जाणून बुजून कुमुदने हे जाळे पसरले आहे ? तेव्हा ह्यातून पार पडण्याकरिता आपल्याला बुद्धीचाच उपयोग केला पाहिजे. त्यांच्या मनात कुमुदविषयी कठोर तिरस्काराची भावना निर्माण झाली. तिलाच जाळ्यात पकडले पाहिजे. ती घरात आली आणि आपली बायको असहाय होऊन अंथरुणावर पडून आहे हे कुमुदला माहीत आहे, तरीसुद्धा ह्या परिस्थितीचा फायदा घेण्याचे हे सारे कारस्थान अपमान, क्रोध, तिरस्कार, द्वेष, असहनशीलता... ह्यांच्या वादळात फसून रामण्णा दिशा विसरून गेले होते.

दुसऱ्या दिवशी सारा आवेग शांत झाला होता. रात्री झोपतेवेळी... रामण्णांनी मनाशी विचार केला—ह्या प्रकरणात माझा काहीच दोष नाही...काही झालं तरी ही भानगड आपल्यामागे नको...असाच त्यांनी निश्चय केला. त्या दिवसापासून त्यांनी कुमुदकडे डोळे वर करूनसुद्धा पाहिले नाही...त्यांना तशी इच्छाच झाली नाही. सरलानेही हा विषय काढला नाही. पण जेव्हा रामण्णांचं लक्ष नसायचं तेव्हा ती त्यांच्याकडून उत्तराची अपेक्षा करीत, त्यांचे निरीक्षण करीत होती. दिवसभर सरलाशी गप्पागोष्टी, संध्याकाळी मैदानात हवा खाणे, रात्री लेखन. सर्व व्यवस्थित चालले होते. पण आतल्याआत त्यांना एक प्रकारची भीती वाटत होती. "डॉक्टरांचा प्रश्न"... केव्हा पूर्ण करावा लागेल कुणास ठाऊक ... एक दिवस सरलाने म्हटलेच—

"डॉक्टरांना विचारून पाहा ना." रामण्णा दचकलेच. ते सरलाच्या जवळ गेले आणि त्यांनी विचारले,. . .

"का, काय झालं ?"

सरला म्हणाली होती, "अहो, व्हायचंय काय ? जरा आरशात तुमचा चेहेरा तर पाहून घ्या." . . .तेव्हा कुठे रामण्णांच्या लक्षात सारं आलं. . .त्यांनी विषयाला कलाटणी देण्याच्या हेतूने म्हटले —"अरेच्या. माझ्याबद्दल म्हणतेस होय ? अग, मला काय धाड झालीय ?"

"असं तुम्ही म्हणताय, पण तुमचा चेहेरा किती निस्तेज, मलूल दिसत आहे हो". .

"छे छे काहीतरी काय. तुला तर मी आवडतो ना; मग झालं तर !"

"अहो, ते मला आवडण्याचे दिवस गेले आता !"

आता हे बोलणं आपल्यावरच परत उलटत आहे ह्या भीतीने रामण्णांनी विषय बदलण्याचा प्रयत्न करीत म्हटले—

"काय औषध घेतलं का ? का आणखी काही हवे ? . . . मी लिहायला बसू का ?"

"तुम्ही जा, कुमुदचं जेवण झालंय. ती माझ्याजवळ येऊन बसेल."

रामण्णा झटकन् तिथून निसटले. इतक्यात त्यांच्या डोक्यात एक विचार आला. आपण आपल्याच खालीत जास्त वेळ काढतो हल्ली. तेव्हा कुमुद मात्र सरलाच्या जवळ जास्त वेळ बसते. आता तिने आणखी कोणतं नवीन जाळं टाकलंय ?"

डोकं खाजवीत रामण्णा ताडकन् उभे राहिले. समोर पाहिले तर त्यांना हसूच आले. बिचारं पुस्तक ! इतक्या वेळ स्मृतींच्या सिंहासनावर विराजमान होते. आणि आता एखाद्या पराभूत शत्रूप्रमाणे खाली मान घालून पडले आहे. छे, हा सारा आपलाच वेडेपणा आहे. पुस्तकात लिहिलेल्या त्या एका श्लोकामुळेच खरं म्हणजे त्यांना राग आला होता. का ? त्या श्लोकात केवळ सत्यच होते. म्हणूनच आपल्याला राग आला. त्या श्लोकात सांगितलेला विचार अक्षरशः सत्य आहे. त्या दिवशी त्यांनी विचार केला होता. "आता पुन्हा कुमुदने कोणतं जाळं पसरले ?" . . .खरं म्हणजे ते जाळं नव्हतंच. आणि कुमुदनेही ते पसरविले नव्हते. "आनीय झटति घटयति विधि" त्या श्लोकात सांगितलेले ते जाळे. . .ते प्रारब्धाने पसरविलेले जाळे. . .आहे. सृष्टीरूपी मायेच्या द्वारे पसरविलेले. ह्या जगात अनादि काळापासून पसरलेले हे जाळे आहे. म्हणूनच आपण ह्या मोहजालात फसलो. आपला पराजय स्वीकारून, गुडघे टेकून शरणागता-प्रमाणे रामण्णा पुन्हा खुर्चीवर बसून राहिले.

## १४

तोंडावर पांघरूण घेऊन पडल्यावर बाहेरचे जग दिसणार नाही, पण आतले जग तर अदृश्य होत नाही ना ? हे कुमुदच्या चटकन् लक्षात आले. एवढंच नाही तर, बाह्य जगत संपूर्ण विसरून गेल्यावर, आतल्या जगाचे चित्र आणखीच विराट रूप धारण करते हेही तिला कळून चुकले. हळूच तोंडावरचे पांघरूण काढून तिने इकडे तिकडे पाहिले. तिला वाटलं, हे सारं आपण पहिल्यांदाच का पाहतोय ? खोलीतील ते दृश्य नेहेमीचेच होते. तरी सुद्धा तिला आपल्या खोलीचे ते वातावरण मोठे अजीब वाटले. . . .अरेच्या, हे सारे ठीक आहे. . . .पुन्हा ते सारे आपल्या ओळखीचे वाटू लागले. का ? ही खोली अशीच होती ना ? आता कुमुदला झोपणं फार कठिण झालं होतं . . . चेहेऱ्यावरचे पांघरून दूर करून तिने पाहिले खरंच. . . .त्यावेळी असेच वाटले होते.

रात्रीचा अंधार वाढतच होता. झोप येतच नव्हती. थकून शिणून गेलेल्या कुमुदला कोणता दिवस, कोणती वेळ तेच प्रथम आठवेना. पण संदर्भ कशाला ? जे काही घडलं त्याची एक एक गोष्ट कुमुदला अगदी नीट आठवली.

कुमुदला वाटलं, खरंच रामण्णांचे मन अगदी बावरलेले आहे. एका सकाळीच, सरलाताई बेशुद्ध झाली त्या दिवशी रामण्णांच्या चेहेऱ्यावर केवढी काळजी दिसत होती. त्या वेळी दिवसभर केवढी काळजी होती. रात्री सरलाताईला जरा आराम वाटला. तिच्या प्रकृतीचा धोका टळला. त्याच रात्री रामण्णा तिच्या खोलीत आले होते. ह्याच्या आधी कित्येक दिवस ते आलेच नव्हते. कुमुदला वाटलं की त्यांना बायकोच्या आजारपणाची काळजी असेल. म्हणून आले नसतील पण कित्येक आठवडे, आणि महिने रामण्णा तिच्या खोलीत आले नव्हते. त्याला जर सरलाताईच्या आजाराचे कारण असते तर कुमुदला काही त्याचे विशेष वाटले नसते. पण एरवीसुद्धा कुमुद कधी जवळ दिसली तरी रामण्णा तिच्याकडे ढुंकूनसुद्धा पाहात नसत. कुमुदच्या मनात संशय निर्माण झाला. तिला भीतीही वाटली. नाहीतर ती स्वतः त्यांच्या खोलीत जाऊन विचारू शकली असती. आतील आवेग ती किती वेळ थांबवून धरू शकणार ? स्वतःच्या भावना सावरून धरण्यासाठी ती सरलाताईच्या जवळ रात्री खूप वेळ बसत होती. रामण्णांना त्यावेळी तरी आपण डोळे भरून पाहू शकू असे तिला वाटत होते. पण ती ज्यावेळी सरलाताईच्या खोलीत बसत असे त्यावेळी रामण्णा चुकूनसुद्धा त्या खोलीत डोकावत नसत. कित्येक वेळा ती सरलाताईच्या खोलीत जायची, तेव्हा रामण्णा तिथेच बसलेले असायचे, पण कुमुदला पाहिल्यावर लगेच ते म्हणायचे, "चला, आता, तुमची दोघांची जोडी जमली. मी जातो". आणि हसत हसत निघून जायचे.

कुमुदला किती वाईट वाटायचे...मनाच्या अशा स्थितीतसुद्धा तिने सरलाताईला विचारले होते.... "का, ग, ताई, रामण्णांची तब्येत हल्ली बरी नाही का !"

सरलाने एक दीर्घ सुस्कारा सोडीत सांगितले होते— "अग मीसुद्धा त्यांना तेच म्हटलं तर म्हणतात, मला काय धाड झालीय !"

"नाही ग. हल्ली त्यांचा चेहेरा अगदी निस्तेज, मलूल दिसतोय म्हणून विचारलं बघ !"

"मीसुद्धा त्यांना तेच म्हटलं होतं."

"पुन्हा विचारून बघ, सरलाताई कारण..." "अग, मी विचारल्यावर ते काऽही सांगणार नाहीत बघ....तेव्हा सरलाताईने एक दीर्घ सुस्कारा सोडला.

कुमुदच्या मनात पुन्हा संशय निर्माण झाला. हे काय ? नवरा-बायको मध्ये भांडण तर नाही झाले ? आपला तर ह्याच्यात काही संबंध नाही ना ?...त्यांचे हल्ली जवळ येणे तर दूरच, पण आपल्याकडे ते नुमते ढुंकूनही पाहात नाहीत. सरलाताईला ह्यातलं कळलं तर नाही ना !

"अग, ताई, तुला नाही सांगितलं तर आणखी कुणाला सांगतील ते !"...हसत हसत आपल्या मनातील भावना लपविण्याचा प्रयत्न करीत कुमुदने विचारले होते.

सरलाने सुस्कारा टाकीत म्हटले.. होते..."रागात असतील दुसरं काय !"

कुमुद गप्प बसली ! नवरा बायकोच्या भांडणात उगीच तिसऱ्याने पडणे कठिणच !

सरला निराश होऊन म्हणाली— "त्यांची तरी म्हणा काय चूक आहे."

तेव्हा कुमुदने खाली मान घालून सरलाताईच्या अंगावरील चादर नीट केली. तरीमुद्धा सरलाताई आपल्या मनातील व्यथा लपवू शकली नाही. कुमुदला वाटले. सरलाताई आपल्याला सारं सांगेल. विचाराचे सारे बांध तोडून...तिच्या वेदना, व्यथा आपल्यापुढे वहात येतील..."

"कुमुद, तूच सांग, त्यांची तरी काय चूक आहे ग. घर सगळं बाईनं सांभाळावं, बाहेरची सारी कामं नीट, व्यवस्थित करता यावीत म्हणून पुरुष लग्न करतात. इथं मीच अंथरुणाला खिळून पडलेय. त्यांनाच माझी सेवा करावी लागतेय...का, खरं आहे की नाही ? .." सरला विषण्ण हसली.

"म्हणून, मी पुन्हा पुन्हा म्हणतेय, अग त्यांची काय चूक आहे !"

तरीसुद्धा कुमुद काहीच बोलली नाही ...ती काही बोलेल, ह्याचा विचारही सरलाच्या मनात आला नाही. ती आपली पुढे पुढे बोलतच होती—

"घरी परत यायच्या वेळी, त्यांची वाट पाहायची. त्यांच्याबरोबर हास्यविनोद, गप्पागोष्टी . . . तुम्ही दमलात तर नाही ? . . . वगैरे विचारणं, छे, काही नाही. घरात पाऊल टाकलं तर त्याना दिसते अंथरुणावर खितपत पडलेली आजारी बायको."

तेव्हा कमुदला बोलावेच लागले.

"हे काय ताई ! . . . उगीच उलटे पालटे विचार डोक्यात आणून त्रास करून घेऊ नकोस बघ ! एक दिवससुद्धा तू दिसली नाहीस तर ते अगदी वेडेपिसे होऊन जातात. . . . हे असले घाणरडे विचार उगीच डोक्यात आणू नकोस."

"वेडी आहेस तू कुमुद. हे सांगण्याची काय जरूर आहे ? त्यांच्या चेहेऱ्यावरूनच दिसते. सुरवाती सुरवातीला आल्यावर माझी तब्येत बघत. काही सुधारणा आहे की नाही ते बघत. आता, कळून चुकलेय मी काही बरी होत नाही. मग आले की दुसराच कुठलातरी विषय काढतात. . .! त्यांच्याकडे पाहिलं की मी अगदी निराश होऊन जाते. मी तरी काय करू ? तूच सांग कुमुद. घरात जर तीन चार मुलं असती तर बाहेरून आल्यावर घरात येताच मुलांशी खेळण्यात, त्यांच्या दंगामस्तीत दंग झाले असते. माझ्या नशिबात मुले नाहीत. त्यांना मी काय सुख दिले ? . . आता जाता जाता . . ." सरलाताई इतका वेळ बडबड केल्यामुळे थकून गेली होती. आणि ही दमणूक, शीण सहन करण्याचीही ताकत तिच्यामध्ये राहिली नव्हती. . . .बिचारी असहाय झाली होती. तिचे डोळे भरून आले. कुमुदचे मनही गलबलून गेले. . . .

"ताई. पडल्या पडल्या तू उगीचच नसत्या गोष्टींचा विचार करतेस. ह्या घरात तू सर्वांना इतकी हवी हवीशी वाटतेस. आम्हा कुणाच्याच डोक्यात असले विचार येत नाहीत."

दुःखाचा आवेग थोपवून धरून सरलाताई म्हणाली— "तरीसुद्धा मला बरं नाही वाटत कुमुद. जिवंतपणी मी आपलं कर्तव्य बजावलं नाही, आता निदान मरताना तरी माझे कर्तव्य पुरं करू दे. म्हणून त्यांच्याजवळ मी एका गोष्टीबद्दल बोलले होते. . . पण वाटतं ते माझ्यावरच रागावले आहेत !"

"कोणती गोष्ट ताई ? . . .मला नाही खरं वाटतं. तू असं काय बोललीस की त्यांना त्याचं एवढं दुःख झालं ?"

"काही असू दे ग . पण ते रागावलेत एवढं मात्र खरं !"

"असं, तू काय बोललीस एवढं. ताई ?" कुमुदने हा प्रश्न हसत हसतच विचारला होता. प्रश्न विचारताना तिला वाटलं होतं . . .नवरा बायकोची एखादी साधीसुधी गोष्ट बाहेर पडेल. जेव्हा ती ह्या घरात आली तेव्हापासून सरलाताईच्या तोंडातून तिने कधी

कठोर शब्द, कधी टोचणारी, खोचणारी गोष्ट ऐकली नाही. कधी रामण्णांना रागावताना पाहिले नाही आता तर सरलाताई असहाय स्थितीत अंथरुणावर पडून आहे. मग तर रामण्णा तिच्यावर कशाला रागावतील ? एखादे वेळी घरात सारखे आजारपण पाहून पुरुष चिरचिरे होतात. . .ते जास्त हळवेसुद्धा बनतात. . . बिचाऱ्या सरलाताईला किती दुःख होत असेल ? हा विचार करूनच कुमुदने तिला तो प्रश्न विचारला होता.

"अग, कुमुद, मी त्यांना दुसरं लग्न करण्याबद्दल सांगत होते बघ."

सरलाचं हे उत्तर ऐकून कुमुदला वाटलं, आपण धाडकन् वरून खाली कोसळलो, बेशुद्ध झालो आणि शुद्धीवर आलो. आपण कोठे आहोत ? कुणाशी गप्पा मारीत आहोत ? वेळ कोणती आहे ? . . .क्षणभर तिला काहीच समजेना. लग्न ? रामण्णांचे लग्न ?आणखी एक लग्न ? का ? कशासाठी ? त्यांची बायकोच हे सांगत आहे ? का ?" अशा अनेक प्रकारच्या विचारांचा एक संघर्षच तिच्या डोक्यात सुरू झाला. विचार करून करून तिचे डोके अगदी शिणून गेले. पण तिने आपल्या चेहेऱ्यावर मात्र कोणताच भाव दाखविला नाही. रामण्णांच्या लग्नाची तिला कशाला एवढी काळजी ? सरलाताईच्या मनात कसला संशय तर आला नाही ? म्हणूनच आपल्या विचारांच्या संघर्षाचा आवाज, आपल्याला सुद्धा ऐकू येऊ नये ह्या प्रयत्नात कुमुद जोरात हसू लागली. अतिशय दुःखानेसुद्धा माणूस हसू शकतो. . . किती विचित्र आहे ही गोष्ट कुमुदला आज त्याचा अनुभव आला.

तिने हसतच विचारले...."ताई, अग, तू असं विचारलंत तर मग ते रागावणार नाहीत का ?"

"त्यांना राग आला. आणि तू हसतेसहो ?" सरलाताईची ती व्यथा पाहून फार वाईट वाटलं. तेव्हा ती म्हणाली— "ताई, मी हसले म्हणून तू उगीच गैरसमज करून घेऊ नकोस. जरा तूच विचार कर. आपल्या बायकोला आजारातून बरी करण्यासाठी रात्रंदिवस तिची सेवासुश्रूषा करणाऱ्या नवऱ्याला त्यांची बायको दुसरं लग्न करा म्हणून सांगायला लागली तर . . ."

"कुमुद, अग, हे मला कळत का नाही की ते मला आजारातून बरं करण्याची इतकी खटपट करताहेत. तेव्हा मी काय मरायची गोष्ट बोलू का ? पण इतके कष्ट सोसणाऱ्याला थोडं तरी सुख नको का मिळायला ? आणि तेसुद्धा माझ्या जिवंतपणी, माझ्या डोळयांसमोर."

"दुसरी बायको करा असं तू म्हणालीस. पण त्यांना वाटलं असेल, आपल्याला तिच्यापासून काही सुख मिळणार नाही." हे बोलल्यावर कुमुदला वाटलं. की आपली जीभ काढून फेकून द्यावी. तिच्या तोंडातून कसले अभद्र शब्द बाहेर पडले होते.

अंगावरील चादर फेकून कुमुद अंथरुणावरून उठली. ती मनाशी पुटपुटली... त्या दिवशी मात्र तसं वाटलं नाही. सरलाताईशी झालेल्या गप्पांमुळे तिचे मन फार फार व्यथित झाले होते. गप्पा झाल्यावर सरलाताईचा डोळा लागला. मग कुमुद आपल्या खोलीत गेली. पण एका जागी तिला घड उभं सुद्धा राहवेना. तिला भीती वाटली, .. आपण इथे उभे राहिलो तर मनातील हे विचार आपल्याला लाथाडून देतील. ह्या विचारांना मनातून हाकलून देण्यासाठी ती खोलीतच इकडे तिकडे फिरू लागली. तरीसुद्धा त्या विचारांनी तिची पाठ सोडली नाही

रामण्णांचे लग्न ? मग ते आपल्याशी झालं तर ? का नको ? मोठ्या बहिणीचं लग्न ठरलं म्हणजे घरात लहान भाऊ तिची चेष्टा करतो. तसंच हे विचारच चिडवू, खिजवू लागले. डोक्यात एकसारखा ह्याच विचाराचा धुमाकूळ चालला होता. एकसारखा विचार केल्यावर शेवटी तिला वाटले. . "हे शक्य ही आहे". पण तिच्या ह्या गोष्टीवर फार वेळपर्यंत विश्वास बसला नाही...हेच जर शक्य असतं तर रामण्णांनी तिच्यावर एवढा राग का धरावा ? ह्या विचाराने तिच्या मनावर मोठा आघात झाला. आपल्याशी लग्न करायचे ह्या बाबतीत रामण्णांना वाईट का वाटले ? इतके असह्य वाटते त्यांना ? तिने समोरच्या आरशात आपले प्रतिबिंब पाहिले. तिच्या डोळ्यांपुढे ते दृश्य उभे राहिले ... रामण्णांचा आपल्यावर तसा अधिकार आहे. आणि तरीसुद्धा रामण्णांना आपला राग यावा. छे, ह्या लग्नाशी आपला काहीच संबंध नाही. रामण्णा आपल्याकडे येऊन कित्ती दिवस झाले ? त्यांनी आपल्याकडे चुकूनसुद्धा नजर टाकली नाही... तशीच. आता सगळं लक्षात आलं. दुसऱ्या कुणाशी लग्न करण्याचा त्यांचा विचार असेल. म्हणून तर ते आपल्याला टाळण्याचा प्रयत्न करीत आहेत !

हा विचार डोक्यात येताच कुमुदला वाटले, जणू आपले सारे शरीर निष्प्राण होऊन पडलेय. रामण्णांचं दुसऱ्या कुणाशी लग्न–हा विचारच मुळी तिच्या सहन-शक्तीच्या पलीकडचा होता. म्हणूनच डोळे मिटून...भुताने झपाटल्यासारखी, मान हलवीत हलवीत ती जोराने म्हणाली, 'छे, छे, हे सारं खोटं आहे. असं होणारच नाही!' कुमुदने आपल्या आरशातील प्रतिबिंबाला हे सांगितले. आरशाजवळ गेल्यावर ती जणू काही भानावर आली. अरेच्या ! हा काय वेडेपणा ... उगीच वेड्यावाकड्या कल्पना डोक्यात आणून मन कशाला बहकावून टाकायचं ? ... पण तरीसुद्धा असं काही होईल ह्याची आपल्याला कल्पनाही नव्हती. सरलाताईचे शब्द आपण अगदी स्वतःच्या कानानेच ऐकले आहेत ... 'रामण्णांचे दुसरे लग्न."

"छे ! हे काही शक्य नाही." स्वतःशीच पुटपुटत तिने आपल्या मनाला धीर

दिला. पण लग्नाची ही गोष्ट निघाल्यावर रामण्णा खूप भडकले होते हे सरलाताईनेच आपल्याला सांगितले नव्हते का ! हा विचार मनात येताच तिला खूप बरे वाटले. क्षणभर तरी का होईना तिला समाधान वाटले. पण दुसऱ्याच क्षणी ती अगदी विषण्ण झाली. रामण्णांचे दुसरे लग्न होणे शक्यच नाही . . . पण ह्याचा अर्थ असाच की रामण्णा तिच्याशी लग्न करायला तयार नाहीत. ! आरशातील कुमुद आपले सांत्वन करील, असा विचार करून तिने आपल्या प्रतिबिंबाकडे एक नजर टाकली.

माणसाचे मन किती चंचल असते. आपल्याच प्रतिबिबाकडे टक लावून पाहता पाहता तिचे विचार कुठेतरी हरवूनच गेले. तिचे सारे लक्ष स्वतःच्या प्रतिबिंबाकडेच आकर्षित झाले. तिच्या चेहेऱ्यावर आनंद, आणि अभिमान झळकू लागला. ती मनाशी म्हणाली . . . मी सर्वस्वी रामण्णांचीच आहे. लग्न होऊ दे अथवा न होऊ दे. मी त्यांचीच झाले आहे. रामण्णाना जिच्याशी वाटेल तिच्याशी लग्न करू दे . . . मग झाले तर." हे सर्व ती आपल्या प्रतिबिंबाला समजावून सांगत होती. यज्ञात आहुती देणाऱ्या पशूला स्वर्ग मिळतो. असं म्हणणाऱ्याला तरी स्वर्गाची कल्पना असते का ? . . . कुमुद आपल्या तर्काने सिद्ध करीत होती . . खरंच एक प्रकारच्या यज्ञातच तिच्या देहाची आहुती गेली होती . . त्यामुळे तच्या देहाला केवढा आनंद, केवढे समाधान झाले होते. जशी जशी ती आरशातील आपले प्रतिबिंब पाहत होती. तशी, तिला आपल्या शरीराबद्दल प्रथम अभिमान, आनंद आणि शेवटी दया वात्सल्य वाटू लागले. काही विचार न करता ती स्वतःचा साजशृंगार करू लागली. बलिदानानंतर आनंद मिळतो. . .जितके लवकर बलीदान, तितकाच आनंदही मोठा ? . . .म्हणून ह्याच वेळी बलिदानासाठी सज्ज झाले पाहिजे. असा निश्चय करून आपल्या खोलीतून बाहेर पडली. रामण्णाच्या खोलीच्या खालच्या फटीतून प्रकाश दिसत होता . . . त्या प्रकाशाकडे कुमुद जणू खेचलीच गेली . . लगबगीने ती त्यांच्या दरवाज्याजवळ गेली.

जेव्हा ती त्या दरवाज्याजवळ आली तेव्हा तिला वाटले जणू काही तो प्रकाशच आपल्याला अडवीत आहे. ती का थांबली ? . . .न कळत तिने दरवाजा ठोठावला ? नाही. ती तर तिच्या हृदयाची धडधड होती. टक् टक्. . .छे. हा तर त्या खोलीतील घड्याळाचा आवाज. . टप् टप् ..छे, हे काय, रामण्णा आतमध्ये शतपावली करताहेत ?...हे लक्षात येताच कुमुदच्या चेहऱ्यावर मंद स्मित पसरले. मनासारखी वेगवान शक्ती जगात दुसरी नाही. एका क्षणात कुमुदच्या मनात जे प्रचंड रग–तरंग उठले त्या विचारप्रवाहाचा केवढा प्रचंड वेग ! जणू ती,चौदा लोकींचा प्रवास करून आली. रामण्णा खोलीच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत चालत आहेत. का ? कशासाठी ? आपल्यासाठी ? केवळ आपल्यासाठीच ? रामण्णांच्या दर्शनासाठी आसुसलेल्या कुमुदच्या

हे लक्षात यायला वेळ लागला नाही. कुमुदशिवाय रामण्णा जगूच शकणार नाहीत. बिच्चारे, त्यांना आपल्याकडे येताही येत नाही. सरलाताईच्या बोलण्याने ते घाबरूनच गेले आहेत. म्हणूनच खोलीत फेऱ्या मारीत आहेत. आपल्याला पाहून त्यांना किती आश्चर्य वाटेल. देवाची कृपा इच्छिणाऱ्या भक्ताच्या समोरच साक्षात् देव उभा राहिला तर त्या भक्ताची काय स्थिती होईल ? कुमुदने हळूच दरवाज्यावर हात ठेवला. दरवाजा उघडाच होता. आता तिला आत जायलाच हवं होतं. आत जाताच, रामण्णांचे डोळे मागून बंद करायचे ! छे, नुसते डोळे बंद करून नाही भागणार हं ! गेल्याबरोबर रामण्णांना घट्ट मिठी मारायची. छे, तसं नाही. . .अय्या. ते इकडेच येत आहेत. मनातल्या बेचैनीमुळे कुमुदचा चेहेरा किती सुंदर दिसत होता. डोक्यात विचारांचे थैमान चालू होते. म्हणून तिचे ओठ अगदी थरथरत होते. थरथरणाऱ्या ओठांमुळे तिचे तोंड अर्धवट उघडेच राहिले होते. तिला वाटलं, ह्या आपल्या ओठांना त्या ओठांनी जोराने दाबले पाहिजे. म्हणजे ते थरथरणार नाहीत. ते ओठच आपल्याला समाधान देतील. दोन्ही हातांनी त्यांचा चेहेरा पकडायचा ? आई ग,. . त्यांचा चेहेरा समोर येताच, मी अगदी वेडीखुळी होऊन जाईन. मग आपण . . .त्यांच्या चेहेऱ्याचे लपून छपूनच चुंबन घेऊ या.

त्या रात्री ती खरं म्हणजे वेडीपिशीच झाली होती. ह्यात काहीच संशय नव्हता. एका विचारानंतर दुसरा विचार डोक्यात कल्लोळ उडवीत होता. त्यामुळे ती बेहोष होऊन गेली होती. रामण्णा पलंगावर बसले होते. ती त्यांच्याजवळ बसली. रामण्णा पलंगावर हात टेकून उठू लागले. हे पाहून कुमुद शुद्धीवर आली !

"हे काय ? हे काय ? इथे कशाला आलीस ? . . . " बोलता बोलताच रामण्णा तिच्यापासून दूर सरकले.

कुमुदचे सारे शरीर घामाने डबडबून निघाले. जणू काही पावसाने भिजलेली पृथ्वीच श्वास घेत आहे. तेव्हा तिला वाटलं, ह्या वेळी श्वास बंद पडला तर काय छान होईल ! रामण्णांच्या चेहेऱ्यावरील तेज पाहून तिचे वेडेपण जरा कमी झाले होते. शेवटी काही न बोलता खाली मान घालून ती आपल्या खोलीत आली होती. आनंदाच्या वेळी मनाचा वेग किती प्रचंड असतो. पण निराशेच्या वेळी सारं शरीर आजारीच होऊन जाते. . . रामण्णांच्या खोलीतून आपल्या खोलीत येईपर्यंत किती युगे लागली कुणास ठाऊक. खोलीत आल्यावर तिने आपले शरीर धाडकन् बिछान्यावर लोटून दिले. आणि दोन्ही हातांना तिने आपले तोंड झाकून घेतले. . . "छे, त्यांचं माझ्यावर मुळीच प्रेम नाही !" "तोंड बंद ठेवण्याचा प्रयत्न करूनही तिच्या तोंडून शब्द बाहेर पडलेच . . . दुसऱ्याच क्षणी तिला वाटले . . . छे, मी मुळी कुणालाच नको आहे. . . ह्या विचारांनी तिचे सारे शरीर थरथरून निघाले.

ही केव्हाची आठवण ? बरोबर. त्या रात्रीची ही आठवण. त्या दिवशी तिने विचार केला होता— "आजपासून मी मनाने विधवाच झाले आहे"...बरं पण आता सरलाताई शरीराने ह्या घरात वावरत नाही, पण साऱ्या घरात तिचीच मूर्ती व्याप्त आहे. म्हणून मी मरेपर्यंत मनाने विधवाच राहणार...पण आपण शरीराने विधवा नाही. हे कुमुद विसरली नाही. तिने विचार केला. की जसा मनाला अभिमान असतो. तसाच शरीराला अभिमान वगैरे काही नसतो. शरीराचा विचार येताच कुमुदच्या लक्षात आले. .. आपलं शरीर आता थकले आहे. शरीर ? कुमुद एकदम घाबरून गेली. छे, ग बाई. हा देह अगदी निर्लज्ज आहे. पळून जायला रस्ताच न मिळाल्यावर, शिकारी लोकांनी घेरून टाकलेल्या हरिणासारखी कुमुद अंथरुणावर बसली. आणि दोन्ही हातांनी तिने आपले डोके गच्च पकडून धरले.

## १५

शिंक पुरती आली नाही की जशी अवस्था होते अगदी तशीच अवस्था रामण्णांची झाली... किती त्रास झाला तरी चालेल....पण एकदा शिंका बाहेर पडल्या म्हणजे पडसे जरा कमी होईल ! रामण्णा खुर्चीवर बसल्या बसल्या सरलाच्या फोटोकडे पाहात होते "वेडी कुठली. बघितलंस काय झालं ते ? तुझा हेतू किती चांगला होता पण तितकाच त्याचा परिणाम वाईट झाला बघ. शेवटी तूच माझ्याहून श्रेष्ठ साहित्यिक ठरलीस ! कशी उद्वेगपूर्ण ट्रॅजिडी निर्माण केलीस तू ! सरला, आणि तू मलाच वेड्यात काढलं होतंस बघ. चूक कोणाचीच नाही पण तरीसुद्धा केवढी मोठी ट्रॅजिडी झाली... मनाशी असं पुटपुटतच रामण्णा झटकन् उठले....त्यांना वाटलं, आपण आता म्हातारे झालो आहोत. मनुष्य वर्तमानकाळाला विसरून जेव्हा भूतकाळाची आठवण करू लागतो. तेव्हा तो म्हातारा झाला असे समजावे....असं त्यांनी कुठेतली वाचले होते.... गोष्टीची आठवण येताच..."अरेच्चा, परत त्याच आठवणी ! ठीक आहे. त्या एक एक आठवणींना पूर्णपणे बाहेर काढून मन अगदी हलके केले पाहिजे होय बरोबर. त्या दिवशी आपण असेच खोलीत फेऱ्या मारीत होतो का ? त्या दिवशी काय झाले होते बरे ? बरोबर आठवले. त्या दिवशी सरलाने पुन्हा लग्नाची गोष्ट काढली होती. त्याबरोबर ताबडतोब, शरम वाटून तेथून निसटण्याच्या विचारात ते होते. का कुणास ठाऊक. सरलाने लग्नाची गोष्ट काढली तेव्हाच त्यांच्या डोळ्यां-

समोर कुमुदची मूर्ती उभी राहिली. शेजारी कुमुदची मूर्ती आणि समोर सरला. तेव्हा आपल्याला वाटलं, की आपणच सरलाला धोका दिला. म्हणून अपराध्यासारखी पळून जायची आपल्याला इच्छा झाली. आपल्या आणि कुमुदच्या अनैतिक संबंधाचा संशय सरलाला आला होता. तो आपण कसा थोपवून धरणार ? सरलाला सारं कळलं आहे म्हणून तर तिने लग्नाची गोष्ट काढलीय. . . हा विचार मनात येताच रामण्णांना वाटले की आपल्या छातीवर कुणी सुरीच चालवीत आहे. एकदा रामण्णांना वाटलं, की सरलाचं अंतःकरण शुद्ध आहे. ती निर्मळ मनानेच आपल्याला सांगत आहे. आता आपल्याला ही कुमुदच्या सहवासाची सवय लागली आहे. तेव्हा सरळ 'हो' म्हणून टाकावं. इतक्यात रामण्णांनी एकदम जीभ चावली. छे ! काय हा मूर्खपणा ? . . . सरलाचा विचार काय आहे काही कल्पना नाही बुवा. आपण निराळाच विचार करतोय. सरलाने दुसरं लग्न करा म्हणून म्हटलं, कुमुदशी लग्न करा असं कुठे सांगितलंय ? जर तिच्याच डोक्यात हा विचार आला असेल तर तिने तसं स्पष्टपणे का नाही सांगितलं ? तिनं असं कधीच म्हटलं नाही. जर अशी परिस्थिती आहे. तर आपणच म्हणावं.— "ठीक आहे. मी कुमुदशी लग्न करीन." पण मग आपणच आपली चूक स्पष्टपणे कबूल केल्यासारखं नाही का होणार ?

पण आपण चूक केली हे मानायला रामण्णा मुळी तयारच नव्हते. समजा त्यांनी कुमुदवर प्रेम केलं असतं तर ती चूक झाली असती. पण त्यांचे कुमुदवर मुळीच प्रेम नाही ! तर मग ह्याचा अर्थ काय ? प्रेमाशिवाय शरीरसंबंध म्हणजे व्यभिचार नाही ? का आपण इतके कामुक आहोत ? . . . छे ! हे मानायलाही रामण्णा तयार नव्हते. का नकळत ते कुमुदवर प्रेम करीत आहेत ? ज्या वेळी ते कोणत्याही निश्चित मानसिक अवस्थेत नव्हते तेव्हाच सरलाने पुन्हा एकदा लग्नाची गोष्ट काढली होती. तेव्हा ते स्वतःला सावरू शकले नाहीत. आपल्या मानसिक अवस्थेबाबत ते कोणत्याच निर्णया-पर्यंत आले नव्हते. पण कुमुदबाबत मात्र त्यांना कोणताच संशय वाटला नाही. त्या रात्रीच्या प्रसंगाने रामण्णांना चांगलाच विश्वास झाला होता. रात्रीच्या वेळी मनात कोणताच निश्चित विचार नव्हता म्हणून ते खोलीत फेऱ्या मारीत होते. शेवटी पाय, आणि मन दोन्ही थकून गेल्यामुळे ते पलंगावर बसले. तेव्हा एकदम त्यांच्या मनातील संदेह, भीती, आणि अपराध भावना ह्या तिन्हींचे मूर्तरूप कुमुदच त्यांच्या खोलीसमोर येऊन उभी राहिली. तिच्या चेहेऱ्याकडे पाहून त्यांची पूर्ण खात्री पटली की ही आपल्या-वर प्रेम करीत आहे. परंतु प्रेम जितके कोमल तितकेच क्रूर पण असते. जितके आकर्षक तितकेच भयंकरपण असते. . . . प्रेम अपार आनंद देते ह्याचा रामण्णांना अनुभव नव्हता ? त्या क्षणी कुमुद कशी दिसली ? रामण्णांना वाटले. . . ती एक आकर्षक ज्वालाच आहे. आणि आपण . . ? तिच्याकडे वर नजर करून पाहण्याचेही साहस

त्यांना झाले नाही. हिचे सौंदर्य आपल्याला खेचून घेईल ह्या भीतीने रामण्णा तिच्याकडे न बघताच, पलंगावरून उठू लागले होते. म्हणूनच आलिंगनासाठी पुढे केलेल्या तिच्या बाहूंना त्यांचा स्पर्शही झाला नाही. एखाद्या क्षणातच, निमिषार्धातच त्याचे बलिदान होईल. त्या सुंदर ज्वालेत. रामण्णा ह्याच विचारात होते. कुमुद आपले बाहू पसरून, त्यांच्याकडे पाहात होती. सृष्टीचा खेळ किती चमत्कारिक आहे. त्या एका क्षणी, त्यांना वाटले, जणू घामाच्या प्रत्येक थेंबातून तिचे सौंदर्य खुलून दिसत आहे. तेव्हा तिच्या चेहेऱ्यावर निराळेच भाव दिसले. हळू हळू रामण्णांनी तिच्याकडे पाहिले. . .तिचा बदललेला चेहरा पाहून रामण्णांनी साहस गोळा केले. तेव्हा काही जरूरी नसतानासुद्धा त्यांच्या तोंडून काही शब्द बाहेर पडले. . . .त्याबरोबरच कुमुद बाहेर पडली होती.

त्या दिवशी रामण्णांची भीती आणखी वाढलीच. तेव्हा त्यांच्या लक्षात आलं, हिचं आपल्यावर प्रेम ही एक अजीबच गोष्ट आहे. आणि दुसऱ्यांनी हिच्यावर प्रेम करणं. . .! . . .आपण कुणावर प्रेम केलं की एक प्रकारचा केवढा आनंद होतो आपल्याला. ज्याच्यावर आपण प्रेम करतो, त्या बदल्यात आपल्याला प्रेम मिळाले नाही तरीसुद्धा आपल्याला दुःख कुठे होते ? पण आपल्या प्रिय वस्तूवर दुसरा कोणी अधिकार सांगू लागला तर वाटते शिकारीला बळी पडली. विशेषेकरून आपणच त्या प्रेमाला उत्तेजन दिले नाही तर ! रामण्णांच्या ही गोष्ट मुळीच लक्षात आली नव्हती. शिकारी कुत्र्यांच्या पंज्यातून स्वतःला वाचविणाऱ्या सशाप्रमाणे त्या दिवसापासून रामण्णा कुमुदला चुकवून, टाळून, तिच्यापासून दूर आपल्या खोलीतच अधिक वेळ काढू लागले. हळू हळू त्यांना सरलाच्या जवळ बसायचीही भीती वाटू लागली. . "आणखी एक लग्न" हे शब्द केव्हा कानावर पडतील आणि आपली दशा काय होईल. हीच भीती त्यांना वारंवार सतावत होती. म्हणून जास्तीत जास्त वेळ दूर राहण्यातच आपलं कल्याण आहे. खरं म्हणजे कुमुदसुद्धा वेडीच आहे. दूर. .? . . .ह्याचा अर्थ काय ? ह्या शब्दांचा काही अर्थच निघत नाही. हे हळू हळू रामण्णांना कळून चूकले होते. कुमुदपासून ते शरीराने जितके दूर जात होते. मन तितकेच त्यांना कुमुदच्या जवळ ओढून नेत होते. कुमुद आपल्याजवळ नसतानाही मनाच्या एका कोपऱ्यात का होईना तिचे एक स्थान आहेच. हे पटल्यावर रामण्णा जास्तच हताश झाले. कधी कधी त्यांना वाटे, असं जर आहे तर केवळ दोन शरीरे दूर राहून कोणती गोष्ट मिळणार ? काही का असेना, कुमुद आपल्यावर प्रेम करतेय. ती कधीच आपला तिरस्कार करीत नाही. कधी तरी तिने आपला देह अर्पण केला तर त्यात दोष कसला ? लग्नाची गोष्ट तर कुमुदच्या तोंडातून कधी निघालीच नाही. आता कशाची भीती राहिली मग ? . . .असा विचार करून रामण्णांनी आपल्या मनाला दिलासा दिला. . .आणि समजा हेही जमलं नाही तर सरलानंतर. . .रामण्णांना स्वतःचे हे विचारच किती असह्य झाले. 'सरलाच्या

नंतर' हा विचार कधी आपल्या मनात डोकावलासुद्धा नाही तो विचार आज का डोक्यात आला ? का ते इतके कठोर, कृतघ्न, आणि असंस्कृत आहेत ? आतल्या आत रामण्णांचे मन सरलाच्या मृत्यूबद्दल विचार करीत आहे का ? शी ! त्या देवीच्या पुढे मी एक राक्षस आहे ..आपले सारे सुख दु:ख गिळून ती केवळ माझ्या सुखासाठी मला दुसरं लग्न करा म्हणून पुन्हा पुन्हा सांगत आहे ...आणि तिच्याबद्दल आपल्या मनात हा घाणेरडा विचार ! तिच्या बिचारीपासून मला अशी कोणती भीती आहे की मी तिच्या मृत्यूची इच्छा करावी. रामण्णांनी स्वत:लाच पुन्हा पुन्हा दोष लावला. त्यांनी मनाशी निश्चय केला. काही महिन्यानंतर आपण स्वत: सरलाच्या जवळ जाऊ, तिचे पाय धरू. आणि तिच्या सर्व अटी मान्य करून आपण दुसऱ्या लग्नाला तयार होऊ... पण शेवटपर्यंत त्यांना हे साहस झाले नाही. तिकडे सरलाची प्रकृतीही दिवसेंदिवस खालावत चालली होती. अशावेळी तिच्यासमोर ही उगीच काही तरी चिडून रागावून बोलणंही बरे नव्हे. असा विचार करून रामण्णा ही गोष्ट टाळू लागले. समजा दुसरं लग्न करायचं, आणि त्यासाठी ठरविलेली मुलगी कुमुद नसेल तर ? हीसुद्धा भीती त्यांच्या मनात होतीच.

शेवटी त्यांच्या मनात घडोघडी कुमुदचेच विचार येऊ लागले. सरलाची तब्येत तर आणखीच बिघडली. तेव्हा कुमुदला टाळणंही अशक्यच होतं. आजारी बायकोची सेवा शुश्रूषा, आणि नंतर डोकावणाऱ्या दु:खदायक घटनेची छाया, ह्यामुळे रामण्णांना कुमुदच्या सान्निध्यात आणखीच राहावे लागले. सरलाचा अंत आता फार दूर राहिला नाही ह्या विचाराने रामण्णा पार खचून गेले होते. आत्मनिग्रहही त्यांच्यात फारसा राहिला नाही. शेवटी एक रात्री, फाशीची शिक्षा झालेला अपराधी जसा फासाच्या खाली जाऊन उभा राहतो त्याचप्रमाणे अत्यंत निराश, असहाय मानसिक स्थितीत रामण्णा कुमुदच्या खोलीत गेले.

कुमुदचे त्यांच्यावर प्रेम आहे. आज नाही उद्या मनात आणलं, तर त्यांचे कुमुदशी लग्न होऊ शकते. हेच दोन विचार रामण्णांच्या हातात, आंधळ्याच्या दोन काठ्या-प्रमाणे मदतगार होते. कुमुद त्यांच्यावर प्रेम करीत आहे...ह्यात खरं म्हणजे काहीच संशय नव्हता. पण तरीसुद्धा आपल्या स्पर्शाने कोमल होणारे कुमुदचे अंगांग कधी कधी आपला नुसता हात लागला तर इतके कठोर का बनते ? असे का ? पण कुमुदनेसुद्धा कधी आपली अनिच्छा दाखविली नव्हती...आणि म्हणूनचं रामण्णांना जरा धीर आला होता. कधी कधी...विशेषेकरून सुरुवातीसुरुवातीला आपण कुमुदशी किती क्रूरपणे वागलो...ते क्रूरतेचे चित्र डोळ्यासमोर आल्यावरसुद्धा आपण तिच्याशी कठोरपणेच वागत होतो. जेव्हा रामण्णांना आपली चूक समजली तेव्हा एखाद्या

अपराध्यासारखे ते खाली मान घालून निघून जात. कित्येक वेळा आपल्या विचारांमुळे, आपल्या वागणुकीने त्यांना अगदी लाज वाटे. तेव्हा त्यांना कुमुदची कीवच येई- मग ते तिच्याशी काही गोष्टी करून तिला आपल्याकडे आकर्षित करण्याचा प्रयत्न करीत. साधारणपणे नेहमी फारशी न बोलणारी कुमुद पण एकदा तिने असं उत्तर दिले की आपली सारी हिम्मतच निघून गेली.

एकदा त्यांनी मोठ्या पश्चातापपूर्ण, आणि दयनीय स्वरात विचारलं होतं— " कुमुद, तू माझ्यावर रागावली तर नाहीस ना ?"

कुमुदने काहीच उत्तर दिले नाही. पण आपला दीर्घ सुस्कारा दाबून ठेवण्याच्या प्रयत्नात तिचे सारे शरीर थरथरून निघाले. . . . रामण्णांच्या लक्षात ही गोष्ट आली.

क्षमायाचना करीत रामण्णा म्हणाले . . . "खरं म्हणजे तुला राग आला तर त्यात तुझा काही दोष नाही त्यात !"

" चूक करणाऱ्यांना दुसऱ्यांच्या चुका काढण्याचा काहीच अधिकार नाही."

बापरे, काय उत्तर दिले होते !

" तेच तर मी म्हणतोय. आणि म्हणूनच पुन्हा पुन्हा सांगतोय कुमुद, तुझी काऽ ही चूक नाही."

जरा दूर सरकण्याचा प्रयत्न करीत कुमुद म्हणाली, — " मी तर माझ्या स्वत:बद्दल म्हटलं. दुसऱ्या कुणाच्या चुका काढण्याचा मला काय अधिकार ?"

तिला आपल्या जवळ ओढीत रामण्णा म्हणाले — " वेडाबाई, अग तू कुठली चूक केलीस ? इतके दिवस मी तुला विसरून गेलो, खरं म्हणजे मीच चुकलो. तेव्हा तुला माझा राग येणं अगदी साहजिकच आहे."

अंधारात रामण्णांना तिचा हसरा चेहेरा दिसला नाही, पण तिच्या हसण्यात किती तिरस्कार, निराशा आहे हे रामण्णांनी ताडलेच. तेव्हाच त्यांचा धीर खचून गेला, पण तरी तसे न दाखवता जरा कडक स्वरातच त्यांनी विचारलं, " का, माझ्यावर तुझा विश्वास नाही वाटतं ?"

" विश्वास ठेवला पाहिजे असा काही करार तर झाला नाही ना आपला ?"

"असं का म्हणतेस कुमुद ? मी तुला फसवतोय, धोका देतोय, असं का तुला वाटतंय ?"

"डोळे उघडे ठेवून, अंधारातून चालणारी मी एक वेडी आहे."

"तुझा माझ्यावर विश्वास नाही. आता तुझी खात्री पटवून देण्यासाठी मी काय करू ? सांग. मी ते करायला तयार आहे बघ."

ह्यावर हसत हसत कुमुद म्हणाली– "चुका करणाऱ्यांना त्या चुका लपविण्या-शिवाय आणखी दुसरं येतचं काय मुळी!"

"पाहिजे तर आता चल, मी सरलाच्या समोर सारं काही स्वतःच्या तोंडाने कबूल करतो बघ."

"का, हे सारं सरलाताईला सांगून तुम्ही काय तिला मारून टाकणार आहात का?"

"काय ? काय म्हणालीस ?"

"काय सांगायचं ? तू अंथरुणावर पडलीस आणि आम्ही दोघे असे वागू लागलो. हे सांगणार तिला ? तिच्या मनावर केवढा आघात होईल ! कृपाकरून माझ्यावर हा उपकार मात्र करू नका ."

"अग, म्हणूनच तर मी गप्प बसलो आहे. पण करू तरी काय ? तू सांगशील ते करावयास मी तयार आहे."

"सरलाताई जोपर्यंत जिवंत आहे. तोपर्यंत तुम्ही माझ्याकडे मुळीच येऊ नका. कराल एवढे ?"

ह्या गोष्टीची पार्श्वभूमी रामण्णांना माहीत नव्हती. त्यांना सारी चेष्टाच वाटली . . ." वाईट कामं चोरून चोरून करतात पण ती सुद्धा, तू चोरून चोरून सोडायला सांगत आहेस हे मोठं मजेशीर आहे बघ. . . हँ . . हँ . . हँ . . "

"तर मग तुम्हाला हे वाईट कृत्य वाटते ?"

हो, . . . काय म्हटलंस ? छे, छे, मला काही उमगलंच नाही बघ. लोकांना तसं वाटतं म्हणून म्हणालो.

"तुमच्या दृष्टीनं हे चांगलं काम आहे का ?"

"हे काय कुमुद ? तू मला उगीच शब्दात पकडू नकोस बघ. चांगलं काय आणि वाईट काय ? तुझ्या व माझ्यामध्ये ही गोष्ट येतच नाही बघ . . .दोघांच्या सहमतानेच तर आपण सारं करतोय."

"तुम्ही मला मनाने स्वीकारले आहे ?"

"ह्याचा अर्थ काय ? मन तुझ्याकडे सारखं ओढ घेतं बघ. किती प्रयत्न केला तरीसुद्धा तुझ्याशिवाय राहवतंच नाही. बघ . . . तू बघतेसच ना . . . !"

"मला काय माहीत की तुमचं मन माझ्यावर जडलंय. मला तर वाटलं, तुमच्या शरीराला ती सवयच लागलीय." मध्येच असं म्हणून कुमुदने रामण्णांना निरुत्तर केले होते.

रामण्णा विचार करू लागले. कशी बोलते ! हिला एवढं बोलायची अक्कल कुठून आली ? हे विचार ? आलेल्या संकटांचा सामना करण्यासाठी निसर्गच माणसाला योग्य ती ताकत देतो. कधी तोंडातून शब्दसुद्धा न काढणारी कुमुद आज अशी काय अगदी फडफडा बोलतीय !

तेव्हा कुमुदच म्हणाली, "का ? आपण बोलत का नाही ?"

"तसं नाही कुमुद. तू मलाच दोष देत आहेस. मला समजून घेण्याचा तू मुळी प्रयत्नच करीत नाहीस. तर मी काय करणार ? झोपेचं सोंग घेणाऱ्यांना . . .

"सोंग घेतलेय कुणी ? मी तुम्हाला प्रिय आहे. तुमचं माझ्यावर खूप प्रेम आहे. असं म्हणायला मला एके काळी मुळीच भीती वाटत नव्हती."

"एके काळी काय आता सुद्धा तू माझी . . ."

"पण आता मला ह्यात काहीच आनंद वाटत नाही."

". . . उगीचच काहीतरी बोलत आहेस बघ." . . .

"माझ्या शरीराचं तुम्हाला व्यसन लागलं होतं इतकंच !" एवढं बोलून कुमुद तिथून निघून गेली.

रामण्णांना ह्या सर्व गोष्टी अगदी स्पष्ट पणे आठवण्याचं आणखी एक कारण होतं. त्या दिवसापासून कुमुद त्यांना टाळत होती. रात्री ती आपल्या खोलीत आतून कडी लावून झोपत होती. कधी कुमुदकडे पाहून रामण्णा हसले तर ती तिरस्काराने त्यांच्याकडे पाही. आणि त्यांना अगदी निरुत्साहित करून टाकी. ती जास्त वेळ सरलाच्या जवळच बसून राही. जर रामण्णाही तेथे आले तर ते परत जाईपर्यंत ती नुसती खाली मान घालून बसे. तिच्या ह्या वागण्याने रामण्णांना एकीकडे तर अतिशय पश्चाताप होई. आणि पुन्हा एकदा त्यांना असे वाटे की कुमुद आपल्याला उगीचच चिडवत आहे. परंतु त्यांची स्वतःची मानसिक स्थितीच अशी होती की त्यांना रागही येत नव्हता.

काही दिवसानंतर रामण्णा आणि कुमुद दोघे जण सरलाच्या जवळ बसले होते. तेव्हा सरला म्हणाली, "कुमुद, जरा कॉफी करते का ? तोंडाला चव कशी ती नाही बघ !" कुमुद चटकन् उठून स्वयंपाकघरात गेली. तेव्हा सरला रामण्णांना म्हणाली. . . . "हे बघा, जरा स्वयंपाकघराचा दरवाजा लावून घ्या बघू "

"दार लावून येऊ ? स्वयंपाक घराचं ? ते कशाला ? . . काय झालंय ? · · · खरंच ?" रामण्णांच्या काहीच लक्षात येईना.

सरलाने त्यांना नीट समजावून सांगितलं. . . "अहो, स्वयंपाकघराचं दार लावून या. मला तुमच्याशी काही बोलायचंय !"

रामण्णांचे पाय उठेनातच, त्यांना वाटल, ज्या प्रसंगाला आपण भितोय ना तोच प्रसंग आता पुढे येणारसा दिसतोय, कुमुदने आपल्यावरचा राग ... हिच्याजवळ सांगितलेला दिसतोय.

"अहो, दार बंद करून या ना !"

"अग, मी म्हणतोय उगीच जास्त बोलल्यावर तू थकून जाशील. असं काय माझ्याशी बोलायचं तुझं ?"

एवढे बोलूनसुद्धा, दार लावून, शिक्षा भोगायला ते एखाद्या अपराध्यासारखे सरलाजवळ बसून राहिले.

"तुमचा हात जरा माझ्या हातात द्या." ...

रामण्णांनी आपला हात एखाद्या यंत्राप्रमाणे पुढे केला.

"हे बघा, मी आता सांगते ना, पण वाईट वाटून घ्यायचं नाही हं !"

"सरला, अग कशाला एवढे श्रम घेतीस ? थकून जाशील उगीच ... रामण्णांनी शेवटचाच प्रयत्न करून पाहिला. थकलेल्या सरलाच्या चेहऱ्यावर वैराग्याची कांती दिसत होती.

"हे बघा. आता इथून पुढे माझी काळजी करू नका तुम्ही."

रामण्णांना वाटलं, कुणीतरी मागून येऊन आपला गळाच दावत आहे. त्यांनी मागे वळून पाहिले. आणि त्याच्या मनात विचार आला; छे, ही कुमुदच फार दुष्ट, क्रूर, कृतघ्न ... आणि कामुक ... "अय्या, इतकं काय वाईट वाटतं हो तुम्हाला ? ... मी आता किती दिवस अशी खितपत पडू हो ?"

"रामण्णांना वाटले, ही आता एक नवीनच समस्या निर्माण झालीय. त्यांनी विचारलं ... सरला, काय म्हणालीस ?"

रामण्णांच्या हातावर आपला हात फिरवीत सरला म्हणाली ... हे बघा. आता मी माझं मन घट्ट करून सांगते. बरं का. आता माझी वेळ भरत आली आहे. थोड्या दिवसांची पाहुणी आहे मी."

काही विचार करण्यापूर्वीच रामण्णांचे डोळे अश्रूंनी भरून आले.

"हे काय लहान मुलासारखेच करता तुम्ही ? अहो, मी ह्या घरात भरभरून सुख भोगले. आता मी गेल्यावर तुम्हाला काही कष्ट होता कामा नयेत. म्हणून एक विनंती करतेय. तर तुम्ही आधीच रडायला सुरवात केलीत. रुमाल कोटाच्या खिशातच राहिला का ? ... आता माझ्या पदरानें डोळे पुसून टाका बघू."

अशा प्रसंगीसुद्धा सरलाचा हा विनोद ऐकून रामण्णांच्या चेहेऱ्यावर हसू फुलले. ते जेव्हा खाली मान घालून आपले डोळे पुसू लागले तेव्हा सरलाने त्यांच्या डोक्यावर आपला हात ठेवला. तो स्पर्श कसा होता ? मृत्यू जवळ जवळ आल्यानंतर त्या स्पर्शाने रामण्णांच्या मनात नवचैतन्य निर्माण केले होते. सरलाचे मरण जवळ आले ह्यात आता त्यांना काहीच शंका वाटत नव्हती. अश्रूंच्या प्रवाहाबरोबर दु:खाचा वेगसुद्धा कमी झाला होता.

"सरला, मी तुला इतका आवडत नाही का ? तू एकसारखी मरणाची गोष्ट काय काढतेस ?"

"अहो, तोंडाने मरणाची गोष्ट काढली नाही तरी मरण यायचे काय थांबणार आहे ? माझं मरण अगदी जवळ जवळ आलेय. म्हणून जरा अधिकारवाणीने तुम्हाला सांगतेय. ऐकणार का ?"

"मरणाची बात सोडून तुला काय सांगायचे ते सांग, मी सारं ऐकून घेतो बघ !"

रामण्णांच्या तळहातावर आपला हात फिरवीत सरलाने म्हटले,

"ऐकाल ?"

"तुला अजून खात्री वाटत नाही सरला ?"

"केव्हापासून तुम्हाला सांगत आहे. पण तुम्ही मुळी माझ्या बोलण्याकडे लक्षच देत नाही. . . .आता पुन्हा एकदा सांगायची संधी मला मिळणार आहे की नाही कुणास ठाऊक, . . .म्हणून . .

"काय सांगायचंय सरला ?"

"हे बघा. मरणाऱ्या बायकोची इच्छा आहे हं ही !"

"कोणती इच्छा, सरला ? मनाला का लावून घेतेस इतकं ? कोणती गोष्ट सांग ना मला...."

"अहो, काय सांगणार. मी . . .तेच..."

"काय ? दुसरं लग्न ? . . .हाय ! . . ." रामण्णा पुन्हा ती गोष्ट टाळण्याचा प्रयत्न करू लागले.

"अहो, कुमुदबरोबर लग्न . . ."

"काय ?"

रामण्णांना वाटले की, कुणीतरी आपल्या उघड्या पाठीवर चाबूकच मारीत आहे.

"अहो, मी डोळे मिटण्यापूर्वी हे लग्न होऊ दे'.'

"कुमुदबरोबर लग्न ?"

"हो, तुम्ही माझं कधी काही ऐकत नाही. कित्येक वेळा सांगीन सांगीन म्हणतेय."

रामण्णांना एकदम एक विचार सुचला. आता उगीच हे बोलणं वाढविण्यात काही फायदा नाही. नाही म्हटलं तर तिच्या मनावर फार परिणाम होईल... एक दिवस विचार करून मग तुला सांगीन...असंच त्यांनी सरलाला सांगून टाकलं...

"नंतर कसला विचार ?..."

"सरला, तुला कल्पना येणार नाही, तुझ्या ह्या असल्या बोलण्याने मला किती वाईट वाटतं. जरा शांतपणे विचार करून मी तुला सांगेन"...

सरलाने निराश होऊन एक दीर्घ सुस्कारा सोडला... "अहो, तुम्ही सांगेपर्यंत मी जिवंत राहते की नाही कुणास ठाऊक !"

"वेडी आहेस तू सरला."

पण शेवटी रामण्णाच वेडे ठरले. ह्या प्रसंगानंतर दुसऱ्याच दिवशी, कोणतीच गोष्ट न ऐकता सरलाने कायमचेच डोळे मिटले होते.

रामण्णा सरलाच्या फोटोकडे पाहात त्या दिवसाच्या आठवणीत तल्लीन होऊन गेले होते. त्यांच्या डोळ्यांतून घळाघळा अश्रू ओघळू लागले....डोळ्यांसमोर अंधार दाटून आला, फोटोतील सरला अंधुक अंधुक दिसू लागली तरीसुद्धा ते तिच्याकडे अगदी टक लावून पाहातच राहिले.

## १६

आपले डोके घट्ट पकडून बसलेली कुमुद काही वेळानंतर एक दीर्घ सुस्कारा सोडून उठून उभी राहिली. तिने विचार–केला आपले हे शरीर किती लज्जाहीन झाले आहे ! खूपच निर्लज्ज. एक दिवस तर तिने आपणहूनच रामण्णांना सांगितले होते– "आता तुम्हाला माझ्या शरीराची सवय लागलीय. व्यसन लागल्यासारखं झालंय" पण दुसऱ्या कुणाला म्हणण्याचा तिला काय अधिकार होता ? मनात लपलेली अनिच्छा....आणि पुन्हा सारं असह्य होऊनसुद्धा तिलाही रामण्णांच्या शरीराची सवय जडली होती. त्यांच्या शरीर-सान्निध्याची इच्छा झाली नाही असा एक तरी दिवस गेला का ? मरताना सरलाताईने अगदी स्पष्ट स्पष्ट त्यांना सांगितलं होतं. तेव्हासुद्धा रामण्णांनी आपल्या

पत्नीला वाचविण्यासाठी लग्नाची गोष्ट स्वीकारली होती. तिला एकदा वाटलं, आपल्याशी लग्न करायचं नाही म्हणून रामण्णा आपल्या बायकोचे बलिदान द्यायला तयार होतील. हे सर्व समजूनसुद्धा कुमुदचा देह, रामण्णांचीच एक वस्तू होऊन गेला होता. इतकेच काय, पण तिचे सारे स्वत्व त्यांनी जिंकून घेतले आहे. खरं म्हणजे हे सारे लज्जास्पदच आहे. आतापर्यंत तिला कशाचाच पत्ता लागला नाही. एक महिन्यापूर्वीच खरं म्हणजे तिच्या लक्षात यायला पाहिजे होतं. पण छे, तिला काहीच कळले नाही. कुमुद पुन्हा अंथरुणावर बसली. तिला विलक्षण दुःख झाले. . . दुःख ह्यासाठी . . . की घरात मुलं . . . खेळताना, बागडताना पाहण्यासाठी सरलाताई किती आसुसलेली होती. आता हे कुणाच्या सुखासाठी ? कुमुदच्या चेहेऱ्यावर तिरस्काराचे हास्य उमटले . . . पण तरीसुद्धा तिला आनंद झालाच होता. तिने विचार केला–" रामण्णांना ही बातमी दिली पाहिजे. हे ऐकून त्यांना जी वेदना, व्यथा होईल. ते पाहून आपण अगदी भरपूर हसून घेऊ !

## १७

रामण्णा डोळे चोळतच उठले. त्यांनी विचार केला, आता आणखी अशा यातना सहन करायच्या नाहीत. उद्या ही गोष्ट कुमुदला अगदी स्पष्ट सांगून टाकायची, कोणत्या-तरी एका निर्णयापर्यंत पोचलेच पाहिजे. तेव्हाच खरे म्हणजे मनाला शांती मिळेल. उठताच त्यांनी मनगटावरील घड्याळाकडे पाहिले. पहाटेची वेळ. चार वाजले होते. म्हणजे ? किती वेळ आपण असेच बसून राहिलो ? हे लक्षात येताच ते एकदम थकून गेले. त्यांनी एक जांभई दिली. बाहेर पडता पडताच त्यांनी पुन्हा एकदा सरलाच्या फोटोकडे पाहिले.

"सरला, तुला वाचविण्यासाठी मी तुझी विनंती मान्य करीत होतो बघ. पण आता कशाचंच काही राहिलं नाही. त्या गोष्टीसाठी जणू तू तुझं बलिदानच केलंस ! मी हे कधी तरी विसरू शकेन का, सरला ? पण तुझ्या बलिदानाला जी कारणीभूत झाली तिला मी आता ह्या घरात ठेवू शकत नाही. सरला, मला क्षमा कर !" रामण्णाची मनातल्या मनात सरलाला प्रार्थना केली.

एक आणखी लग्न ? छी:!

बिचाऱ्या [सरलाची फार फार इच्छा होती....घरात मुलंबाळं खेळावीत, बागडावीत. आणि त्यासाठी म्हणून लग्न करावं !"

रामण्णांनी पुन्हा एकदा स्वत:ला सावरून घेतलं. पुन्हा काही तरी विचार आला. "अरेच्या, आपण बचावलो बुवा !" ते स्वत:शीच पुटपुटले. आणि त्यांनी समाधानाचा एक सुस्कारा सोडला.

बरोबर आहे. नाहीतर ती एक कधी न सुटणारी समस्याच होऊन बसायची. पण छे, आता काही कटकट नाही....! झंझट नाही !...त्यांनी धैर्य गोळा केले.... आणि हसत हसतच ते बाहेर आले. तो काय ? कुमुदही हसत हसतच त्यांना सामोरी झाली. क्षणभर रामण्णा दचकलेच !

"लिहीत होतो मी. जरा उशीर झाला. आताच लिहून झालं—वेळ बघितली..."

"तुम्हाला एक आनंदाची बातमी सांगायला आलेय. तुम्ही येईपर्यंतसुद्धा मला धीर धरवला नाही. म्हणूनच सांगायला आले धावत धावत !"

"ओ हो,...आता काय आनंदाची बातमी ! मला पण तुला एक गोष्ट सांगायचीय !"

कुमुद चटकन् म्हणाली,

"मी आई होणार आहे."

"हां ?..."रामण्णांचे मन नुसते धडधडू लागले. स्वत:ला कसे तरी सावरून घेऊन ते म्हणाले,..."वा ! ही तर मोठीच आनंदाची बातमी आहे."

हे वाक्य रामण्णांच्या तोंडातून निघाले. पण मग लगेच त्यांना वाटले,...छे ! आता हिला काही सांगून काय फायदा ?

रामण्णांचे उत्तर ऐकून कुमुदसुद्धा चकित झाली. ती मनात म्हणाली—

"हा माणूस प्रत्येक बाबतीत तयार आहे !" तोपर्यंत स्वत:ला सावरून रामण्णा म्हणाले—

"हे बघ, मी आताच सरलाच्या फोटोपुढे प्रतिज्ञा करून आलोय."

कुमुद क्षणभर घाबरलीच. तसाच श्वास रोखून तिने विचारले..."काय ?"

रामण्णाही जरा चाचरतच म्हणाले— "सरलाची शेवटची इच्छा पूर्ण करून टाकतो."...

"परमेश्वरा ..." कुमुद थक्कच झाली. पण तिने स्वत:ला सावरून घेतले आणि म्हणाली "आपली इच्छा पूर्ण झालेली बघण्याचं बिचाऱ्या सरलाताईच्या नशिबात नव्हतं !"...तिने आपलं मस्तक खाली केले.

पुढल्यादोन महिन्यांतच कुमुदचे आणि रामण्णांचे लग्न झाले. लोकांनी त्या दोघांच्या निष्ठांची प्रशंसा केली. व ते म्हणू लागले, कुमुदने आपल्या बहिणीचे ऐकले. आणि रामण्णांनी आपल्या पत्नीची अंतिम इच्छा पूर्ण केली....पण पतिपत्नी सुखात राहू देत ...त्यांना दीर्घायुष्य लाभो, घर मुलाबाळांनी भरलेलं असू दे अशी शुभेच्छा बाळगणारी मात्र तेथे नव्हती.

---

काम अनादि आहे. त्याला अंत नाही.

प्रेम अनंत आहे. त्याचा आदि, आरंभ अज्ञात आहे. अनादि–अनंत काम आहे. अनंत–अनादि प्रेम आहे.

म्हणून 'काम' म्हणजे प्रे....

रामण्णांनी स्वतःला सावरून घेतले. कोणता विचार ? आपण कशाचा विचार करीत आहोत ? त्यांनी चेहेरा वर करून समोर पाहिले. खिडकीच्या बाहेर शहर... लोकांची गर्दी....जीवनाचा एक अणू समाजाचे एक प्रतीक दिसत होते. पण आतापर्यंत खिडकीच्या बाहेर पाहताना त्यांना ह्यातील काहीच दिसले नाही. शून्य मनाने खिडकीच्या बाहेर पाहताना, मनात मात्र, काम. प्रेम. सेक्स ह्याबद्दलच विचारांचे तुफान माजले होते. म्हणजे ते शून्यमनस्क नव्हते....तसे नव्हते. स्वत:ला शून्य समजल्यावरसुद्धा त्यांचे मन त्याहूनही जागृत होते. ह्याचा अर्थ असाच झाला की, ते स्वत: अलग आहेत आणि त्यांचे मन अलग आहे.

आपल्यालाच दोष देत रामण्णांनी एक दीर्घ सुस्कारा सोडला....आणि हसत हसत ते खिडकीपासून दूर सरले.

सेक्स, प्रेम, ती आणि मन....हे सारे एवढे लंबेचौडे विचार कशासाठी ? एका तासानंतर त्यांना सभेला जायचंय. त्यांना सन्मानपूर्वक घेऊन जाण्यासाठी संचालक महोदय येतील. त्यांचीच वाट पाहात, वेळ काढण्यासाठीच ते खिडकीच्या जवळ येऊन उभे राहिले होते. तेव्हा ह्या मोठ्या मोठ्या विचारांनी त्याना घेरून टाकले होते. शेवटी, माणसाला कशाचा ना कशाचा विचार करायला लागतेच. नाही तर मन कुठल्या तरी जुन्या जुन्या आठवणींचा रवंथ करीत बसते.

रामण्णांनी मनगटावरील घड्याळाकडे नजर टाकली. हे घड्याळ विकत घेऊन किती दिवस झाले ? बरोबर! कुमुदशी आपले लग्न झाले तेव्हाच हे घड्याळ आपण खरेदी केले.

रामण्णांनी आपला विचारप्रवाह थांबविला. कुमुदलाही सभेला यायचे होते. ती तयार झाली की नाही ? ते स्वत: जाऊन पाहणार होते. पण पुन्हा त्यांना भीती

वाटली....कुमुद तयार होऊन बसली असेल तर ? आणि तयार नसली तर पुन्हा सभेला जायला उशीर नाही का होणार ? की काहीतरी कारण सांगून ती सभेला येणार नाही ? छे, त्यांनी स्वतःलाच दोष दिला...आपण उगीचच भरकटत चाललोय. ती काय कारण सांगेल बरं ? मोहन खेळून परतला की नाही ?

रामण्णा परत खिडकीजवळ आले....आपला मुलगा मोहन आला की नाही ते पाहायला.

मोहनला घरी येण्याची कुठली घाई ? सभा सत्कारांची त्याला कसली परवा ? हा विचार करून रामण्णांनी एकदा स्वतःला सावरून घेतले....पण पुन्हा ते अगदी हवालदिल झाले. तास झाला, ते तयार होऊन बसले आहेत. ह्या सभा, सन्मान, गौरव, मानपत्र....ह्या सर्वांत त्यांना स्वतःला मुळीच आनंद वाटत नव्हता. एक काळ असा होता की, एखाद्या भाषणाचे आमंत्रण मिळाले की त्यांना केवढा उत्साह वाटत असे. एकेकाळी ते स्वतःचे पैसे खर्च करून आपले लेख प्रकाशित करायलाही मागे पुढे पाहत नसत. समालोचकांनी आपल्या साहित्याचा बारकाईने अभ्यास करावा म्हणूनही ते प्रयत्न करीत. सभेत रामण्णांचा परिचय करून दिला जात असे तेव्हा त्यांना किती आनंद होत असे. गळयात हार घातले गेले की त्यांची छाती गर्वाने फुलून येई. त्यावेळी लोकांचे त्यांच्याकडे एवढे लक्षच गेले नव्हते. आता ? बरोबर, त्यांची स्थिती दात होते तेव्हा चणे नव्हते आणि चणे होते तर दात नव्हते अशी होऊन गेली... जीवनाचेच हे सार आहे. जेव्हा जे पाहिजे तेव्हा ते मिळाले तर जीवन नीरस होऊन जाते. म्हणूनच दुष्यंत आणि शकुंतलेचे वैवाहिक जीवन, खरं तारुण्य संपल्यावरच सुरू झाले. आजच्या सभेत आपण हेच सांगायचे का ?

विचारांचा रवंथ करता करता रामण्णा सावकाश खुर्चीवर जाऊन बसले. खरं पाहिलं तर विचार करण्यासारखीच ही गोष्ट आहे....की मुलामुळेच दुष्यंत आणि शकुंतला एकमेकांना भेटले. "पतिपत्नींच्या मीलनाची संतान ही एक शृंखला आहे" हे सांगणाऱ्या भवभूतीने आपल्या नाटकात राम, सीता आणि मुले ह्यांच्याच विरहाचे चित्रण केले आहे. खरं पाहिलं तर हा एक महत्त्वपूर्ण विचार आहे. असा विचार करीत करीत रामण्णांनी पुन्हा खिडकीतून पाहिले, मोहन आला की नाही ! त्यावेळी रामण्णांना केवढी उत्सुकता होती. त्यांचे मनही बेचैन होते....काळजी अशासाठी की, संध्याकाळची वेळ होती. मोहन कधी उशीरा येत नव्हता. त्याचबरोबर खेळून, खूष झालेल्या मोहनच्या डोळयांतील चमक पाहण्यासाठीही रामण्णा बेचैन झाले होते. नीट निरखून पाहिल्यावरही त्यांना काहीच दिसेना. आपल्यासमोर कोणते चित्र उभे आहे हे रामण्णांला चांगले माहीत होते. मोहन, त्यांचा मुलगा. कुमुदपासून

त्यांना झालेला मुलगा ! पण जेव्हा जेव्हा ते मोहनकडे पाहायचे तेव्हा तेव्हा सरलाचीच प्रतिमा त्यांच्या डोळ्यांसमोर उभी राहत असे.

हे रहस्य समजले त्याला आज दहा वर्षे झाली. सरला त्यांची पहिली बायको. पण आई होण्याला तिची तब्येतच ठीक नव्हती. त्यांनी कुमुदशी लग्न केले. पण कुमुदपासून झालेल्या आपल्या मुलाचे डोळे सरलासारखे आहेत....कित्येक वेळा, ह्या जुन्या आठवणींच्या भीतीने रामण्णा मोहनकडे बघायलासुद्धा धजत नसत !

२

सरला म्हणाली होती—"घरात लहान मुलं, खेळत बागडत असली म्हणजे किती छान वाटतं नाही ?" आपण हे असले प्रसंग कधीच विसरू शकणार नाही. रामण्णा हे समजून होते. . . .ती एवढंमुद्धा म्हणाली होती— "घरात मुलं नसली ना, की ते घर अगदी सुनंमुनं वाटतं."

रामण्णांनी त्यावेळी उत्तर दिलं होतं,. . ."मुलं व्हायची तर बायकोची तब्येत चांगली हवी. म्हणून आधी बायकोच्या प्रकृतीकडे लक्ष देतोय."

"अंथरुणावर खिळून पडलेली आज आहे तर उद्या नाही अशा बायकोच्या तब्येतीची काळजी घेऊन काय फायदा ?"

"माझ्या बायकोच्या तब्येतीची काळजी घेणं हे माझं कामच आहे."

"माझ्यासारखी बायको. खरंच म्हणजे अगदी केवळ नावापुरतीच बायको आहे."

"वेडी आहेस तू सरला, जरा कुठे दोन चार दिवस अंथरुणावर पडलीस तर तुला वाटतंय, की आता आपण ह्यातून बरंच होणार नाही."

"उगीच कशाला खोटी आशा धरता ? म्हणूनच मी पुन्हा पुन्हा सांगतेय. . . .तुम्ही दुसरं लग्न करून टाका. मला हे घर मुलाबाळांनी भरलेलं पाहायचंय.". . .

"वा ! तुला काय वाटलं. आपला नवरा अगदी इतका सुंदर, स्मार्ट आहे की कोणतीही मुलगी त्याला पसंत करील. की तुला इथेच सोडून मी माझ्यासाठी मुलगी शोधायला जाऊ ?"

"काही कुठे मुलगी पाहायला जायला नको बरं का. अहो, आपली कुमुद आहे ना !"

"बिचारी, तिचा कशाला उगाच बळी देतेस ग !"

"काहीतरीच तुमचं ! उगीच वाटेल ते वडबडू नका. कुमुद सुद्धा आता अठरा वर्षांची आहे. तिला तुमचा, तुमच्या पुस्तकांबद्दल केवढा अभिमान आहे. माहीत आहे का तुम्हाला ?"

"म्हणून काय ह्या गोष्टीचा मी फायदा घेऊ. असं ती म्हणतेय ?" बोलता बोलता रामण्णा स्वत:च्या बोलण्यावर हसू लागले होते. सरला वारली. कुमुदशी त्यांनी लग्न केले. मुलगाही झाला. पण त्या मुलाला पाहायला सरला काही राहिली नाही. रामण्णा बसल्या बसल्या समोरच्या भिंतीकडे पाहू लागले. सरलाचा फोटो हलत होता. रामण्णा त्या फोटोकडे टक लावून पाहू लागले. एकदम स्वत:ला सावरून बसले. जणू काही नवीन विचारच डोक्यात आला.

सरला जिवंत आहे. आपला संसार डोळे भरून पाहात आहे. म्हणूनच मोहनचे डोळे एकदम सरलासारखे आहेत. आपला संसार; वैभव पाहण्याच्या हट्टाने सरलाचे डोळे तिच्या शरीराबरोबर नष्ट झाले नाहीत. तिचे डोळे जिवंतच आहेत. ते तिचे डोळे आपले जीवन पाहत आहेत. आज आपला जो सार्वजनिक मान-सन्मान होत आहे. तो पाहून तिचे डोळे आनंदाने चमकतील....ह्या विचाराने रामण्णा घाबरले. त्यांचे शरीर थरथरले....ह्या दहा वर्षात त्या डोळ्यांनी आपले सारे अनुभव पाहिले असतील.

"शू!" रामण्णानी तोंडातून उद्‌गार काढले. एक चिमणी उडत उडत येऊन सरलाच्या फोटोवर बसली होती

"शू !" पुन्हा त्यांनी रागानेच चिमणीला हटकले. चिमणी उडून गेली. रामण्णांच्या मनातील ते काल्पनिक चित्रसुद्धा उडून गेले. एखाद्या जाळ्यातून पार पडावे तसे रामण्णा खुर्चीवरून उठले. पुन्हा भरभर पावले टाकीत ते खिडकीजवळ आले. बाहेरच्या हवेसाठी त्यांनी तोंड उघडले,...जणू काही त्यांचा श्वासच घुसमटला. त्यांनी मनगटावरील घड्याळाकडे पाहिले....अरेच्या. त्यांना घेऊन जायला येणाऱ्या संचालकांना यायला अजून पंचावन्न मिनिटे आहेत !

३

आपल्या घड्याळाकडे पाहून कुमुद म्हणाली—"अजून पंचावन्न मिनिटे आहेत ... जवळ जवळ एक तासच म्हणा ना,"

तिने पुन्हा एकदा घड्याळाकडे नजर टाकली. आणि एक दीर्घ सुस्कारा सोडला. दहा वर्षं झाली, असं घड्याळ बघून. असंच ते म्हणाले होते... जाऊ द्या. कशाला जुने विचार डोक्यात आणायचे उगीच ! मोहनला लवकर या [illegible] हा मुलगा का आला [illegible] ती काही काम करू लागली. खरं म्हणजे काही काम करायचं नव्हतंच. जे होते तेच ठीक ठाक करू लागली. ती विचार करू लागली , त्या दिवशीसुद्धा असंच सारं ठीक ठाक करून ठेवलं होतं.

दहाच वर्षे झाली. पण वाटतं, आयुष्यातला केवढा मोठा कालावधी निघून गेलाय. तरीसुद्धा एक एक आठवणी अशा येतात की वाटतं, जणू काही एक एक गोष्ट आताच डोळ्यांसमोर घडत आहे.

मोहनच्या पहिल्या वाढदिवसाचा उत्सव होता. वाढदिवस तर होता पण उत्सवाचं वातावरण नव्हतंच मुळी. लग्नाच्या आधीच कुमुदने त्याला आपल्या पोटात वाढविले होते. त्या मुलासाठी तर रामण्णांनी तिच्याशी लग्न केले होते. जर पोटात मूल वाढत नसते तर त्यांनी लग्नही केले नसते. ती त्यांच्या उपकाराच्या ओझ्याखाली दबलीही गेली नसती. आता ह्या मुलाच्यामुळे तिची ही दुर्दशा. एक वर्षाच्या मुलाला आईच्या दुधाची गरज नसते. हा सारा ह्यांच्या वासनांचाच खेळ. त्यांनाच भोगू दे. असा विचार करून, मुलाला सोडून, कुणाला न सांगता ती घर सोडून जाणार होती. संध्याकाळच्या सुमारात निघून जायला हवे. तिने सकाळपासूनच निश्चय केला होता. तेव्हा रामण्णा तिच्या खोलीत आले होते. ती घाबरली. तिच्या अंगावर भीतीने काटाच उभा राहिला. ... आपला निश्चय डळमळेल ह्या विचाराने ती घाबरलीच. रामण्णा कशासाठी आले ? ह्याचीच तिला भीती वाटली तिला जुन्या आठवणी आठवल्या. रामण्णा, होय. ते एक पुरुष आहेत. आता तर काय अगदी विधिपूर्वक लग्नही झालंय. ..आता ते तिचा नवरा म्हणून खोलीत आले होते. आता अंथरणावर पडलेल्या बायकोपासून भीती कसली ? ... ह्याच हिम्मतीने आले असतील. आपला अधिकार दाखवावयाला. ही गोष्ट मनात येताच तिरस्काराच्या नजरेने तिने रामण्णांकडे पाहिले.... तिने विचार केला. ..ह्या घरात आपल्याला राहायला मिळाले ते ह्यांच्यामुळेच. आपल्या अस्तित्वाचे कारण तेच आहेत. कुमुद आपल्या मुलाची आई आहे, हे रामण्णा विसरूनच गेले होते. जी एक भोग्य वस्तू आहे असे समजूनच ते तिच्याकडे आले होते.

"कुमुद." . . .

'चला, 'हे' आले वाटते. का आपल्याला ह्या आवाजाची ओळख नाही ? कित्येक वेळा ती ह्या आवाजावर मोहित होऊन स्वतःला हरवून बसली नव्हती ? हा आवाज कशासाठी आहे. तिला चांगलं माहीत होतं.

"कुमुद. आज मोहनचा वाढदिवस आहे."

कुमुदने त्यांच्याकडे वर नजर करून पाहिले. तेव्हा तिने विचार केला . . . छे मीच वेडी आहे मुळी, ह्यांना माझी परवाच नाही. हे मोहनसाठी आले आहेत. आता त्यांना माझी जरूरच नाही. मला फसवून, मला भुरळ पाडीपर्यंत माझ्यावर ह्यांचे प्रेम होते. राग आवरून धरण्यासाठी कुमुदने आपली जीभ चावली.

पण आपण रागाने का असं केलं ? हा प्रसंग आठवल्यावर कुमुदने स्वतःला हा प्रश्न केला होला. तिला राग आला होता. रामण्णांचा अतिशय राग आला होता. ती गोष्ट तिला चांगली आठवत होती. परंतु एकदा . . स्वप्नात त्यांची आठवण येताच तिला निराळाच भास झाला होता. रामण्णा आल्यावर ती हादरूनच गेली. पण तिच्या डोळ्यात तिरस्कार नव्हता. उलट रामण्णांना घट्ट मिठी मारण्याची तिला तीव्र इच्छा झाली. तिने आपला ओठ चावला कारण तिला आता स्वतःला सावरून घ्यायचे होते.

कुमुदच्या मनाच्या गोंधळाचे हेच कारण होते. त्या दिवशीच तिला कळलं होतं . . की जेव्हा समजून उमजून चांगली वाईट कारणे माहीत असून रामण्णांच्याबद्दल तिरस्काराच्या गोष्टी करते वेळी सुद्धा तिचे मन मात्र रामण्णांच्या कडे धाव घेत होते.

"मोहनचा वाढदिवस आहे ना. म्हणून तुझ्यासाठी हे घड्याळ आणले आहे बघ" . . . रामण्णांचे हे शब्द ऐकून कुमुदची तर्कशक्तीच संपली. कारण तिने खाली वाकून पाहिले तेव्हा रामण्णांनी तिच्या मनगटावर घड्याळ बांधले होते.

"तेच हे घड्याळ." पुटपुटतच पुन्हा त्या घडाळाकडे पाहीले. अजूनसुद्धा जवळ जवळ एक तास आहे." असं म्हणतच, एक दीर्घ सुस्कारा सोडून कुमुद आरशाजवळ बसली. तिच्या चेहऱ्यावर हसू आले. तेव्हा ती आपल्या प्रतिबिंबाला म्हणाली, . . . छे. आपण किती निर्लज्ज आहोत. आता एका तासाभरातच आपल्याला रामण्णांच्या बरोबर सभेला जायचेय. म्हणून तर तिने एवढा साजशृंगार केला आहे. म्हणूनच तिने मोहनला लवकर यायला सांगितलं होतं. पण हा मुलगा अजून का लवकर आला नाही ? असा विचार करून तिने बाहेर दरवाज्याकडे पाहिले. बाहेर मोहनचा काही ठावठिकाणाही दिसला नाही. एक चिटपाखरूसुद्धा दिसलं नाही. आतही कुणी नव्हतं . . . तेव्हा एक दीर्घ सुस्कारा सोडून, दरवाजा बंद करून ती आरशासमोर बसली.

आज ती रामण्णांच्या बरोबर जाणारी त्यांची सौभाग्यवती आहे.

त्या दिवशी जणू डोकं फिरल्यासारखं होऊन ती रामण्णांना सोडून जाणार होती. ज्या क्षणी रामण्णांनी तिला घड्याळ दिले त्यावेळीच तिला आपला स्वतःवर विश्वासच राहिला नाही, त्यानंतर रामण्णा खोलीतून बाहेर गेल्यावर तिने झोपलेल्या आपल्या मुलाला छातीशी घट्ट धरले. त्यावेळी तिला वाटले, खरंच, रामण्णांवर आपले खूप खूप प्रेम आहे. ती अगदी थरथरून गेली. त्या दिवशी संध्याकाळी रामण्णा पुन्हा तिच्या खोलीत आले. ते कुणाला तरी भेटायला चालले होते. हसतहसतच ते म्हणाले—"मी एका तासात येईनच. तसं कुणी विचारलंच तर सांग, पंचावन्न मिनिटातच येईन !"

रामण्णा बाहेर पडल्यावर तिने आपल्या घड्याळाकडे पाहिले. "अजून पंचावन्न मिनिटे आहेत. . . . घरातून बाहेर पडायला."

छे विचारांच्या आठवणीच्या ओघात आपण कुठल्या कुठे वाहात आलोत. . . आपल्या ह्या साऱ्या आठवणी, डोक्यातून काढून टाकण्यासाठी तिने जोराने डोके हलविले. . . .

मोहन आला की नाही हे पाहण्यासाठी ती दरवाज्याजवळ गेली. दरवाजा उघडून पाहिले. निराशेने, रागाने दरवाजा धाडकन लावून घेतला. आणि रागाने मागे फिरून, आरशासमोर उभी राहून आपले केस नीट करू लागली.

४

दरवाज्याचा आवाज ऐकून रामण्णा झटकन उठले.

"कुणी आलं वाटतं . . ." पुटपुटतच ते खिडकीच्या जवळ गेले . . . इकडे तिकडे पाहिले. पण कुणीच दिसले नाही. "दरवाज्याचाच आवाज आला." ते तसेच आपल्या खोलीत चालत आले. टेबलाजवळ जाऊन उभे राहिले. टेबलावरची पेन्सिल उचलली आणि एकदम हसले. हसत हसत खुर्चीवर बसले. आणि स्वतःशीच पुटपुटले, "छे माणसाचं मन मोठं विचित्र आहे. दरवाज्याचा आवाज झाला आणि मला वाटलं, कुणीतरी आलं वेड तर लागलं नाही ? दरवाज्याचा आवाज झाला तर कुणी बाहेरही जाऊ शकते. पण दरवाज्याचा आवाज आला तर कुणी आलेच असे कशावरून वाटते ?

तेव्हा रामण्णा घाबरून झटकन् उठले आणि खिडकीजवळ आले. भीत भीतच त्यांनी दूरवर नजर टाकली. शेवटी समाधानाचा सुस्कारा टाकीत बसून राहिले.

नंतर स्वतःशीच म्हणाले, "कोणी गेलं असेल ही अपशकुनाची गोष्ट माझ्या तोंडून का निघाली ? जर खरोखरच कुणी गेलं असेल तर ?"

रामण्णांच्या अंगावर काटा उभा राहिला. त्या विचाराला थोपवून ठेवण्यात असमर्थ झाल्यामुळे त्यांनी डोळे मिटून घेतले. . . .डोळ्याच्या समोर जे दृश्य आले त्याने ते घाबरून गेले आणि घाबरून पुन्हा त्यांनी डोळे उघडून बंद केले.

"त्या दिवसाची आठवण परमेश्वरा, पुन्हा येऊ देऊ नकोस रे. शत्रूलामुद्धा त्या दिवसाची आठवण येऊ देऊ नकोस !"

त्या दिवशीसुद्धा एका स्वागत–सभेची योजना होती. पण ते फक्त रामण्णांनाच माहीत होते. कुमुदला त्यांनी काही सांगितले नव्हते. अचानक तिला सांगून खूष करणार होते ते. त्या दिवशी मोहनचा वाढदिवस होता. खरं म्हणजे तो मुलाचा वाढदिवस नव्हताच. त्यांच्या लग्नाचाच पहिला वाढदिवस होता. त्यांच्या लग्नापूर्वीच मोहनचा ह्या जगात प्रवेश झाला होता. म्हणून त्याचा वाढदिवस काही महिने पुढे ढकलण्यासाठी दोघेही सहमत होतेच. आदल्या दिवशीच त्यांनी कुमुदशी बोलण्याचा प्रयत्नसुद्धा केला होता. लग्नाचा पहिला वाढदिवस म्हणून त्यांनी कुमुदला खूष करण्याचाही प्रयत्न केला होता. तेव्हा कुमुद म्हणाली होती—"आपलं लग्न म्हणजे एखाद्या तयार झालेल्या घराची दुरुस्ती केली आहे." . . .बापरे ! किती कठोर हे बोलणं ! तरी मुद्धा दुसऱ्या दिवशी त्यांनी घड्याळ खरेदी केलेच. त्या दिवशी कुमुदच्या जवळ उभे राहताना ते अगदी बेभानच होऊन गेले होते !

त्यांना वाटले खरंच कुमुद माझीच आहे कुमुद जेव्हा आई झाली तेव्हापासून ते तिला पाहात होते. पण तिच्यातील बदल त्यांच्या लक्षात आला नव्हता. एक वर्षापूर्वी ती एक मुग्ध युवती होती. त्यांना पाहून लाजत होती. त्यांच्या स्पर्शाने मोहरून निघाल्या-वर हसत होती. तिच्या त्या सुंदर डोळ्यांत भीतीची छाया दिसत होती. आता मातृत्व प्राप्त झाल्यावर तिचे वक्ष भरदार दिसत होते. मुलाच्या पालनपोषणाने तिच्या चेहऱ्या-वर मोठेपणाची कांती पसरली होती. शांत सौम्यपण दिसत होते. मुलाच्या आधाराने तिच्यामध्ये एक नवीन शक्ती, आणि एक नवीन सौंदर्य दिसत होते. रामण्णांना जरासा संकोचच वाटला. ज्यासाठी ते आले होते ते काम ते विसरूनच गेले. त्यांनी फक्त हाक मारली— 'कुमुद.'. . तोंडातून हा शब्द बाहेर पडताच ते जणू भानावर आले.

त्यांची हाक ऐकताच, . .कुमुदची स्थिती, स्वतःच्या रक्षणासाठी. . .सिद्ध झालेल्या हरिणीसारखी झाली होती. आपण स्वतः का हाक मारली. त्याचा हेतू

रामण्णांना स्वतःला चांगलाच माहीत होता. ती पुरुष हृदयाची हाक होती. स्त्रीला आकर्षित करणाऱ्या पुरुषाचा तो सर्वशक्तिमान स्वर होता. मदमस्त पुरुषाची स्त्रीला वश करून घेणारी सामर्थ्यसूचक हाक होती ती. ती ऐकताच शिंग मारायला तयार असलेल्या गाईच्यासारखी कुमुद उभी राहिली.

त्यावेळी रामण्णाच्या विवेकशक्तीमध्ये भ्रम उत्पन्न झाला होता. पण त्यांना आपल्या व्यक्तित्वाचेही ज्ञान झाले. आपण सुशिक्षित आहोत. सामाजिक जीवनात सुसंस्कृत, साहित्यिकसुद्धा आहोत. बुद्धिजीवी आहोत. हे सर्व सोडून निसर्गातील इतर पशूंप्रमाणे आपण वागलो तर ? . . .मनुष्यसुद्धा पशूच आहे का ? स्त्रीला फक्त स्त्रीच्या रूपात पाहणे हे जंगली जीवन आहे. स्त्री आणि पुरुषात काही अंतर नाही. समानता आहे. . . .हे मानणे हेच मुळी संस्कृतीचे लक्षण आहे, हे सर्व समजत होते. तरी कुमुदला पाहून रामण्णांचे मन विकारी बनले होते. त्यांना स्वतःचीच लाज वाटली. "कुमुद, आज मोहनचा वाढदिवस आहे." . . .असं बोलून त्यांनी विषयच बदलला. अशा तशा गप्पा मारून त्यांनी कुमुदचा हात हातात घेऊन तिच्या हातावर घड्याळ बांधले होते. तो एक क्षण नाही, . .एक युग नाही. . . .क्षण आणि युगही नाही. काल तटस्थ आहे. . . . कुमुदचा हात हातात घेतल्यावर रामण्णांच्या डोक्यात हे सारे विचार आले.

ह्या नादातच कदाचित् ते रस्ता चुकले, ते आपल्या एका मित्राकडे गेले होते.

"अरेच्या, आज काय रस्ता चुकलात की काय ?" . . .मित्राचे बोलणे ऐकून रामण्णा हादरलेच. ते मित्राकडे नुसते पाहातच राहिले. त्यांना पाहून त्यांचे मित्र हसले. तेव्हा तेही स्वतःला सावरून धरून हसू लागले. ते विचार करू लागले. . . .आपण मित्राच्या घरी कशासाठी आलो ? इकडे येण्यापूर्वी आपण काही विचार केला नव्हता . . .मित्राने विचारले — "काय हो ? काही काम आहे ? ह्यावेळी आलात ? "तेव्हा रामण्णांनी एकदम उत्तर दिले. . . ."एक महत्त्वपूर्ण काम आहे. तसंच गुप्तही. "रामण्णा, असं महत्त्वाचं कोणतं काम आहे ? अगदी खूष दिसताहात. . . .आणि पुन्हा म्हणता गुप्त काम आहे. का काही नवीन कार्यक्रम ?"

"जरा गप्प बसा ना !"

"असे रागावू नका. तुम्ही लोक साहित्यिक. तुमच्यावर कोण विश्वास ठेवणार ? साहित्य जीवनाचे प्रतिबिंब आहे. लोकांना हे सांगण्यासाठी, प्रेम कथा लिहिण्यापूर्वीच, स्वतः त्याचा अनुभव घ्यायलाही तुम्ही मागे पुढे पाहात नाही. . . .म्हणून विचारले, काही नवीन पराक्रम . . .? हां हां ! . . ."

रामण्णांना वाटलं, त्या दात बाहेर काढणाऱ्या मित्राचे दातच पाडून टाकले पाहिजेत. त्याला जमिनीवर पाडून त्याच्या शरीरावर तांडव नृत्य केले पाहिजे. पण

सुसंस्कृत समाजात तसे कसे करायचे ? कुमुदच्या आणि आपल्या लग्नाबद्दल लोक वाटेल तशी चेष्टा करतात. पण त्याबद्दल आपल्याला काहीच करणे शक्य नव्हते. मित्राच्या बोलण्याला एकच उत्तर होते. खोटे खोटे हसणे. रामण्णांनी तेच केले होते. आणि ते म्हणाले— "साहित्यिक म्हणजे तुम्हाला काय वाटले ? लायसेन्स नसलेले श्रीकृष्ण आहेत ते?"

"आपल्याला काय माहीत रामण्णा ? मेलो नाही तर स्वर्गाचे दर्शन कसे होणार ? आम्ही कधी पुस्तक लिहिले नाही. . . .आणि अपकीर्तीही करून घेतली नाही."

"म्हणजे काय पुस्तकं लिहिल्यावर माणसाची अपकीर्ती होते ? . . .असं तुझं म्हणणं ?"

"मी कशाला म्हणू ? तुम्हीच सारं पाहात आहात ना रामण्णा ? जर पुस्तक चांगले निघाले तर म्हणतात ह्याहून अजून चांगले निघायला हवे होते. पुस्तक खराब निघाले तर म्हणतील, ह्यापेक्षा रद्दीचा व्यापार परवडला. पुस्तक समजले नाही तर त्याच्यावर कमी प्रतीचे म्हणून शिक्का बसतो. वाईट पुस्तक सर्वांना समजले तर त्या पुस्तकाला रद्दी पुस्तक समजतात. थोडक्यात काय तर पुस्तक लिहिणाऱ्याला लिहून सुख नाही आणि पुस्तक वाचणाऱ्याला पण सुख नाही. तुम्हाला काय वाटतं ?"

"पुस्तक लिहिणाऱ्यालाच फक्त सुख मिळते. असं म्हणा वाटलं तर. . ." बोलता बोलताच रामण्णा आपल्या मित्राबरोबर जोरजोराने हसू लागले.

"जाऊ द्या हो आता ! काय महत्त्वाचे काम आहे ते तर सांगा आता ते रहस्य कोणते ?" त्या दिवशी आपण त्या मित्राच्या प्रश्नाचे उत्तर, कोणते आणि कसे दिले ते आठवून रामण्णांना स्वतःलाच फार आश्चर्य वाटले ते सारे खोटे होते कसे सहज म्हणून गेलो होतो आपण. त्या दिवशी अगदी पूर्ण विचार करून आपण सर्वांना चकवलं होतं. जर त्यांनी सांगितलं किंवा कुणाला कळलं तर समाज त्यांना मान–प्रतिष्ठा देईल ? कोण जाणे ! त्यांचा सन्मानसुद्धा करतील. कारण त्यांच्यासारख्या अनेक ठगांचा समूह म्हणजेच समाज. आज तर समाज त्यांचा सन्मान करायला तयार झाला आहे. ते सुद्धा ठगच नाहीत का ? . . .पण त्या दिवशीचे त्यांचे उत्तर एखाद्या ठगासारखेच होते. त्यांनी विचार करून उत्तर दिले होते ?

"एक रहस्य सांगायचं होतं !" मित्राने विचारल्यावर त्यांनी हेच सांगितले होते.

"आज सरलाला जाऊन दोन वर्षे झाली."

"अरे, रामण्णा, जुन्या गोष्टीची आठवण काढून. . ."

"छे, छे, तू असं नको समजूस की मी दुःखी आहे. सरलाने मला हजार वेळा सांगितलं होतं. माझ्यानंतर तुम्ही कशाचं दुःख करू नका. तुम्ही अगदी सुखात रहा.

...घरात मुलंबाळं बागडू देत. मी सारं सारं पाहीन. माझं हे दुसरं लग्नसुद्धा सरलाच्या समाधानासाठीच आहे. ती हे लग्न निश्चित करूनच गेली. हा मुहूर्तसुद्धा तिनेच ठरविला होता. तरी सुद्धा ती..."

"रामण्णा हजार जन्मात अशी एखादीच बायको मिळते बघा. तरीसुद्धा प्रत्येक बाबतीत नशीब लागते. ती आपल्या डोळ्यांनी तुमचं लग्न पाहू शकली नाही,– म्हणून तुम्ही मनाला वाईट वाटून नका घेऊ. ती म्हणालीच होती ना. जिथे मी असेन तिथून सारं पाहीन."

"तरीसुद्धा माझ्या मनाला समाधान हवे ना !

"म्हणूनच वर्षातून एकदा तिची आठवण ठेवतोच...कसं कुणास ठाऊक. सरलाची पुण्यतिथी, आणि मोहनचा वाढदिवस एकाच दिवशी कसा येतो. आज माझा सुखाचा संसार पाहायला सरला हवी होती....ती कुठून तरी जरूर हे सारं पाहात असेल. म्हणून आज मुलाला एक सोन्याची साखळी आणि कुमुदसाठी एक छानशी साडी..."

"अग, ऐक, ऐक..."

"अरे, ओरडू नकोस बाबा. म्हणून तर म्हणत होतो हे सारं गुपचूप करायचंय... पण गुपचूप करायचं म्हटलं तरी मला वहिनींची मदत हवी बरं का !"

"मग त्यात गुप्त ते काय राहिलं ?"

"अरे बाबा, संध्याकाळपर्यंत ते रहस्य ठेवायचं. समजलास ? संध्याकाळी, तू वहिनींना घेऊन बाहेर जा....रस्ता चुकल्याचं निमित्त करून थेट बाजारात जा. तिथे पोचल्यावर वहिनींना सांग. वहिनीच दोन्ही वस्तू निवडतील. तुम्ही घरी येईपर्यंत मी इथे येतोच ... मग ह्या दोन्ही वस्तू घेऊन जाईन मी !"

"मग असं सांगा की ... आम्ही बाजारातून थेट तुमच्या घरीच येऊ काय रामण्णा ? मग चांगली छानपैकी पार्टी, उत्तमपैकी खाना ... नंतर तुम्ही आपली भेट देऊन टाका."

"आज नको.. आज तुम्ही आलात तर ..."

"आम्ही आलोत तर आमची अडचण वाटेल ? रामण्णा, तुम्ही बडे साहित्यिक. भेट दिल्यावर तुम्ही आपल्या पत्नीचे चुंबन घेतलेत तरी आमची हरकत नाही बघा. हा...हा...हा..."

"तसं नाही रे...पण तरीसुद्धा आज नको, मी चाललो आता....हे बघ, पैसे ठेवलेत इथे !"

"डोकं ठिकाणावर असलं तर तो लेखक कुठला !" मित्र आणखी काय बडबडत होता कुणास ठाऊक. रामण्णा तिथून सटकलेच. पंख फुटलेल्या पक्ष्याप्रमाणे ते बाहेर

ाडले. दिवस त्यांनी कसा तरी बाहेरच घालविला. शेवटी मित्राने आणलेल्या वस्तू घेऊन संध्याकाळी पक्ष्यासारखे घरट्यात आले. घरात कुमुदही नव्हती आणि मोहनही नव्हता.

रामण्णा झटकन् खुर्चीवरून उठले. क्षणभर त्यांना कळलंच नाही...की आपण दहा वर्षांपूर्वीच्या आठवणीत गुरफटून गेलो आहोत. साडी आणि साखळी हातात पकडून ते खिडकीजवळ आले, तेव्हा त्यांच्या लक्षात आले.

"मला वेड तर लागणार नाही ना ?..." स्वतःशी पुटपुटतच त्यांनी आपला हात खाली केला. हातात साडी वगैरे काहीच नव्हते. तरीसुद्धा त्यांनी आपला हात अशाप्रकारे खाली केला की जणू काही साडी जमिनीवर पडून मळेल. तेव्हा..." "खरंच, आपल्याला वेड लागणार...." असं बडबडतच त्यानी आपले डोके हलविले.

त्या दिवशीचे त्या साडीचे विचार आठवून रामण्णांना हसूच आले. छे ! ही सभा लवकर सुरू झाली म्हणजे बरे होईल बुवा. नाहीतर वेड लागेल मला !"

तोंडाने त्यांनी विषय बदलला पण मनाने ते ऐकले नाही. मन आठवणींच्या मागे धावू लागले. स्मृतिचित्र समोर उभे राहिले आणि रामण्णा पुन्हा एकदा हसले. साडीच्या त्या प्रसंगाची त्यांना पुन्हा आठवण आली.

## ५

कुमुदने आपला राग साडीवर काढला. मोहनही अजून आला नव्हता म्हणून ती ती चिडलीही होती. आरशासमोर उभी राहून केस नीट करताकरता तिचा पदर सरकला. पदर सरकल्यावर तिला आपल्या सळसळत्या तारुण्याचे सौंदर्य दिसले त्यामुळे ती आणखीच चिडली तिने आपले संपूर्ण प्रतिबिंब आरशात पाहिले, ती छानशी साडी नेसली होती. त्यामुळे तिचे व्यक्तित्व आणखीच खुलून दिसत होते. कुमुद त्या साडीवरच जळू लागली.

'ही नतद्रष्ट साडी तेव्हा पासून आता पर्यंत कटू स्मृतींच्या धाग्यांनीच विणली गेली आहे.' असं म्हणून ती आरशाकडे पाठ करून बसली. सवयीनेच तिने मांड्यावरून साडी नीट केली. नंतर एकदम तिला वाटलं...की जणू काही आपण अदृश्यच होऊन गेलो.

दहा वर्षापूर्वीची गोष्ट. सकाळीच रामण्णांनी आपल्याला घड्याळ दिले होते. अगदी मनगटावर घड्याळ बांधून दिले. त्यावेळी क्षणभर तिला वाटले. . . रामण्णांचा हात हातात घ्यावा. जुन्या साऱ्या गोष्टी विसरून एकदा शेवटचीच त्यांना घट्ट घट्ट मिठी मारावी, इतकी घट्ट की दोन शरीरे समरस होऊन जातील. . . . पण तेवढ्यात रामण्णा तिचा हात सोडून निघूनच गेले होते. प्रेमाच्या आवेशात एखाद्या भुतासारखे. . . तिने मोहनला छातीशी जोरात घट्ट आवळून धरले. त्याला लाडवामारखे. . . करून...! तेव्हा कुठे तिचे डोके ठिकाणावर आले. आता आणखी जर ती ह्या घरात राहिली तर रामण्णांच्या पुरती ताब्यात जाईल. आता हा अपमान सहन होणार नाही. तिने तेथून जाण्याचा निश्चय केला. तिचे सारे शरीर गरम लोखंडासारखे झाले होते. ज्या वस्तूला ती स्पर्श करू लागली ती वस्तू थरथरून जाई. ती विचार करू लागली— मला इथून गेलंच पाहिजे. गेलंच पाहिजे. दहा वर्षांनंतरसुद्धा कुमुद ही गोष्ट विसरली नव्हती. एकीकडे अगाध प्रेम. तर दुसरीकडे अगाध द्वेष. . . का ? कधी कधी तिला वाटे...ह्यात रामण्णांचा काही दोष नाही. सारा दोष तिचाच आहे. अशा वेळी सरलाताईची आठवण आल्यावर कुमुदला वाटे...आपलं ते वागणं, म्हणजे सरलाताईला फसविणंच होतं. सरलाताईने तिला किती वेळा हे सारं सांगितलं होतं.

कधी कधी रामण्णांना घरी यायला उशीर व्हायचा. तेव्हा कुमुद सरलाताईला विचारायची.

"रामण्णांना घरी यायला इतका उशीर का ग होतो ताई ?"

"उशीर कुठला ग ? हीच त्यांची यायची वेळ आहे"

"तसं नाही ग, पण तू एकटी घरात असतेस, ताई"

"मग काय झालं ? मला माझी कामं आहेत ना !"

"नाही ग, ताई, पण तू आजारी असतेस ना...."

"कशी ग तू मुलगी, कुमुद. उद्या लग्न झालं म्हणजे सारं समजेल बघ. . . पुरुषांची कामे सगळी बाहेरच असतात !"

"इकडे बायको आजारी असतानासुद्धा."

"हे बघ कुमुद, हा पुरुषांचा स्वभावच आहे. त्यांचे काम नेहमी घराबाहेरच असते. घरातून बाहेर पडावेच लागते त्यांना. बायकांचं तसं नसतं. . . तिला, आपलं घर, आपली मुलंबाळं सर्वांचं बघायला लागतं. तिला आपली कामं सोडून बाहेर कसं पडता येणार ?"

सरलाताईचा हा सरळ, साधा भोळा स्वभाव पाहून कुमुद चकितच झाली होती. रामण्णांचे सरलाकडे काही लक्ष नव्हते. पण त्याचं तिला तसं काहीच वाईट वाटत नव्हते.

"पुरुषांचा तसा स्वभावच आहे. चार मित्र बसून गप्पा मारतील. तर काय बिघडलं त्यात ? तू 'ह्यां'च्याबद्दल म्हणतेस ना ? बिचारे. . . .फारसे बाहेर पडत नाहीत ते. वाचत बसतात. लिहीत बसतात. कधी कटाळा आला तरच थोडा वेळ बाहेर जाऊन येतात.". . .सरलाने मोठ्या अभिमानाने रामण्णांची बाजू घेतली होती.

"अग बाहेर जाण्याची काय गोष्ट बोलतेस ? जेव्हा ते घरात असतात ना, तेव्हा-सुद्धा तासन् तास त्यांच्या लक्षातसुद्धा नसतं, की आपण घरात आहोत की नाहीत. इतके मग्न होऊन जातात बघ.. ." हे सांगता सांगता आजाराने पिवळटसर दिसणाऱ्या सरलाच्या गालावर अभिमानाची लाली पसरली. एकदा असंच, कुमुदने जरा उपेक्षेनेच म्हटलं होतं...

"अशा माणसांना, बायको असली तरी काय, आणि नसली तरी काय दोन्ही सारखंच !"

"अग वेडाबाई, मला तसं आपल्याबद्दल नाही म्हणायचंय. मी घरात नसले ना, तर एक क्षण त्यांना चैन पडत नाही. एकदा मी महिनाभर माहेरी गेले होते. नवीनच लग्न झाले होते आमचे. ह्या लेखक महाराजांनी महिन्याभरात एक अक्षरसुद्धा लिहिलं नाही बघ !" सरलाताईंने ही गोष्ट किती आनंदाने सांगितली होती.

"अशा ह्या सुखी संसारातून, सौभाग्यपणीच मला मरण यावं, एवढीच माझी इच्छा आहे बघ. . . ." सरलाताईच्या ह्या बोलण्यावर कुमुद अगदी ओक्साबोक्शी रडली होती.

आतासुद्धा तेच हे रामण्णा आहेत ना ! त्यावेळीसुद्धा आपल्याला रामण्णांचा स्वभाव कळला नव्हता ? सर्व माहीत असूनसुद्धा आपण त्यांच्यावर प्रेम केलंच की नाही. . ."

तर काय झालं ? रामण्णा, आपले कधीच झाले नाहीत का ?

रामण्णा आपले झाले नाहीत. त्यांचे आपल्यावर प्रेम नाही, ही गोष्ट कुमुदच्या मनात अगदी पक्की बसून गेली होती. तिने रामण्णांवर खूप प्रेम केले होते. पण रामण्णांचे प्रेम फक्त तिच्या देहावरच होते. बायको अंथरुणावर खिळली होती. आपणही घरात नवीनच होतो. पुन्हा त्यांचा पुरुषी अहंकार होता ना. म्हणून रामण्णांनी आपल्याला स्वीकारले. तिला माहीत होतं, लग्न न होताच ती आई झाली होती. समाज तिला तुच्छच लेखणार होता. म्हणूनच दया किंवा उपकार बुद्धीनेच रामण्णांनी तिच्याशी लग्न केले होते.

कुमुदला रामण्णांचे प्रेम हवे होते. समाजाने तिचा अपमान, उपेक्षा केली तरी प्रेमासाठी ती साऱ्या सुखाचा त्याग करण्यासाठीसुद्धा तयार होती. पण तेव्हाच ती प्रेमशून्य लग्नाच्या बंधनात जखडली गेली.

कुमुदने विचार केला– त्याच दिवशी आपलीही प्रेमकहाणी संपली. लग्नानंतर महिनाभरातच कुमुद आपल्या आत्याकडे निघून गेली होती. लग्न झालंच होतं, तरी समाजाचं थोडं का होईना भय होतंच. प्रेमशून्य...आणि गर्भात वाढणाऱ्या त्या लहानग्याचाही ती द्वेष करू लागली. आत्या काही जवळची नातेवाईक नव्हती. दूरच्या नात्याची एक म्हातारी बाई होती ती. तिथे महिना दोन महिने राहणार होती. पण ते-सुद्धा अगदी असह्यच झाले होते.

दुसऱ्याच दिवशी, सकाळी ती म्हातारी म्हणाली होती––

"अग, किती छान दिसतेस ग ? दिवस गेलेत काय? आम्हाला काही कळवलं नाही, लग्नाला बोलावलं नाही. तुला काय वाटलं, लग्नाचं गोडधोड खायला म्हातारीला दात नाहीत ? का ग ?"

हे ऐकून कुमुदला वाटलं, इथून एक दोन दिवसातच निघून जावं!.... तरी सुद्धा...

आजसुद्धा आठवण आल्यावर कुमुदला हसू आलं. त्या म्हातारीजवळ राहात होतो, तेव्हासुद्धा आपल्याला जीवनाचे केवढे जबरदस्त आकर्षण होते. आजसुद्धा वाटतं, ते दिवस किती सुखाचे होते.

"उशीरा लग्न करायचं.. मग लगेच एखाद्या महिन्यात दिवस जायचे तुम्हा आजकालच्या मुलींना लग्नाचं सुख काय मिळतं मग ?..."एक दिवस बोलता बोलता म्हातारी सांगत होती.

तेव्हा कुमुद थट्टेनं म्हणाली होती— "आत्याबाई, लग्न म्हणजे काय ? हे समजायला लागल्यानंतरच आजकाल लग्ने होतात."

"तुला काय वाटतं, लग्न म्हणजे फक्त तेच ?"

"तेच म्हणजे काय आत्या ?"

"हेच, जे तुझ्या पोटात वाढतेय ते...." म्हातारी बोलत होती.

"आत्याबाई, हे नसेल तर मग त्या लग्नात काय अर्थ आहे ?"

"तुम्ही आजकालच्या मुली....ह्यामुळेच आणखी दुःखी होता. मुलं नाही म्हणजे काय ?...अग पुरुषांनीसुद्धा असा विचार केला तर तुमची स्थिती कशी होईल बघ."

"मला तर वाटत, पुरुषांना तेच महत्त्वाचं वाटत असेल. पण बाईला तर, जन्माला घातलेल्या मुलाचे पालन पोषणसुद्धा करायचे असते."

ह्या बोलण्यावर म्हातारीने तोंडाचं बोळकं उघडून मनमुराद हसून घेतले... "पुरुषासाठी तेच महत्त्वाचं...वेडाबाई पुरुषांना तेवढंच महत्त्वाचं वाटत असतं, तर

पुरुषांनी लग्न कशाला केलं असतं ग ? घरातल्या जेवणापेक्षा त्यांना हॉटेलातले खाणे-पिणे जास्त चवदार लागते. तुझ्याशी लग्न करून, तुझ्या मुलांची आजारपणं सोसून तू म्हातारी होईपर्यंत तुझ्याशी संसार करणाऱ्या पुरुषाला दुसरंसुद्धा काही हवं असतं बघ ?"

हे ऐकून कुमुद चकीतच झाली. त्या अशिक्षित म्हातारीच्या बुद्धिमत्तेचे तिला आश्चर्यच वाटले. इतक्यात तिने म्हातारीला हुंदके देताना ऐकले.

" काय आत्याबाई ? मला शिकवता शिकवता तुम्हीच रडायला लागलात ?

" रडत नाही मुली, पूर्वीचे सुखाचे दिवस आठवले. . . . आनंद आवरून धरता आला नाही ग पोरी !"

ह्या म्हातारीनेसुद्धा कधी सुखाचें दिवस पाहिले होते ? कुमुदला ही गोष्ट नवीनच होती सुरवातीपासून ती तिला विधवाच म्हणून पाहत होती. म्हणूनच ती जरा चरकली. कुमुदला तिचे हसू आले.

" का, ग कुमुद, हसतेस का ?

" काही नाही, आत्याबाई, तुम्ही 'सुखाचे दिवस' म्हणालात ना. तेव्हा मला पण कशाची तरी आठवण आली.

" तुला काय वाटलं ? माझं लग्न झालं नाही ? मी सुख पाहिलंच नाही ? . . म्हातारीला कुमुदचं बोलणं समजलं, . . . म्हणून पुढे म्हणाली . . . "तुला काय वाटलं, मी जन्मापासून अशीच विधवा आहे."

" मला वाटलं, मागले सुखाचे दिवस आठवून तुम्हाला वाईट वाटेल."

" वेडाबाई. वाईट कशाने वाटेल ग ? सुखाच्या आठवणींनी माणसाच्या मनाला समाधान वाटते. नाही तर इतके दिवस कशाला सडत पडले असते अशी ? कुठल्यातरी विहिरीत, तलावात सुखाने बुडून मेले असते. पण, त्या जुन्या सुखाच्या आठवणींवर तर अजूनपर्यंत जिवंत आहे."

" असं कोणतं सुख, आत्याबाई ?"

" तू अजून लहान आहेस, तुला समजायचं नाही बघ."

" अय्या, आत्याबाई उगीच खोटा खोटा बहाणा करू नकोस. आज काल मुलींना लहानपणातच सारं समजतं !"

" कसल्या मोठ्या . . . त्या कामाला. सगळ्याच मोठ्या बघ !"

कुमुद जरा दुःखी कष्टी आवाजातच म्हणाली– "तुझ्या डोक्यात दुसरा विचारच नाही का ग आत्या ?"

"मी तुझं नाही म्हणत कुमुद. आजच्या मुलींच्याबद्दल सांगत होते. आमच्या वेळी आठव्या नवव्या वर्षीच लग्न होत असे. मग वर्षांचे सण, लग्न, कार्य, पंचमी, चतुर्थी .. इकडे येणं, जाणं ह्यातच दोन वर्षे मोठी आनंदात जात असत. तेव्हा मोठ्या मुलींबरोबर बोलता बोलता, सारं काही समजायचं !"

"ते जाऊ दे ग, आत्याबाई तुझ्या स्वतःच्या सुखाच्या आठवणी सांग ना."

"तेसुद्धा सांगते ना. पण आधी हे ऐक. ते सांगितलं नाही तर हे पण कळणार नाही. हे सगळं झाल्यावर मग आम्हाला सगळं कळत असे. पुरुष कसे असतात, त्यांचा स्वभाव कसा असतो. आमचे यजमान कसे आहेत. कुणाबरोबर ते असतात. सारं सारं ...! म्हणून आम्हाला कधी त्यांच्या वागणुकीचा राग नाही आला ! कधी आश्चर्य पण वाटले नाही."

"आत्याबाई, तुमच्या यजमानांची वागणूक चांगली नव्हती ?"

"अग कसली चांगली ? आणि कसली वाईट ! जसे इतर पुरुष तसेच हे ...

"म्हणजे काही बाहेरचा ? .. आणि तरी सुद्धा तुम्ही म्हणता त्यांचा राग नाही ..."

"राग कसला ग बाई ? लहान मुलाने पाण्यात हात घातला तर आपण त्याच्यावर रागावू या ? त्याला तर पाणीचा पत्ताही नसतो. त्याला तर एक नवी वस्तूच वाटते. नवी मजाच येते त्याला."

"हा कसला आनंद, आणि मजा, आत्या ! घरातली लोकं, इथ त्यांच्या नावाने रडतात !

"अग, मी कशाला रडू ? ते का माझ्याशी भांडत होते ? का शिवीगाळ करीत होते ? का मला मारत होते ?"

"पण तुम्हाला सोडून, आणखी एक ...."

"अग वेडाबाई, मला सोडून कुठे ? मला कुठे त्यांनी सोडले ?"

"नाही, आत्याबाई सोडण्याचा प्रश्न नाही. तुम्ही घरात असताना रोज ते त्या ठिकाणी ..."

"रोज ... म्हणून तर म्हणते की आजकालच्या मुलींना लग्नाचा अर्थ एवढा एकच कळतो. माझ्या बरोबर संसार करीत राहावा. बस्, आणखी काय ? ते रोज काय करीत होते. उरलेल्या वेळात काय करीत होते ? त्याच्याशी मला काय करायचं होतं ? मला घरात ढीगभर काम होतं. घर सदा भरलेलं. सासूबाई, मामंजी, मोठे दीर, लहान दीर, नणंद, जावा .. पुन्हा येणारे जाणारे .. हे सगळे सोडून मी काय त्यांच्या-बरोबर रामक्रीडा करू काय ?"

"मग काय, हेच तुमचे सुखाचे दिवस ?"

"तर काय, सुख, सुख म्हणजे दुसरे काय ?"

"हे कसलं सुख आत्याबाई ?"

"मी ! सागते ना. . . . ऐक तर . ."

"सांगण्यासारखं असलं तर सांगा ना . . . आत्याबाई"

"वा ! इथपर्यंत तर अगदी खोदून खोदून विचारलंस. आता म्हणतेस सांगण्या-सारखं असेल तर सांग . . . लबाड कुठली. तोंडात पाणी टाकल्यावर तुकडा खायचं कोण सोडून देईल ग ! थांब सांगते. एक दिवस सारं काम आटोपून रात्री आपल्या खोलीत जाऊन मी झोपेच्या तयारीत होते . . . "

"एकट्याच !"

"मग तुला काय वाटलं, मी भित्री भागूबाई होते ?"

"नाही हो, पण तुमचे यजमान ?"

"ते हो ? आमचे 'हे' जेवण करून बाहेर पडले होते. जेवणसुद्धा धड नीट केलं नव्हतं ! मी विचार केला . . होत असेल. रात्री झोपायच्या वेळी त्यांना विचारीन !"

"म्हणजे ते रात्री येतील, ह्यावर तुमचा विश्वास होता तर !"

"अग, जग विश्वासावरच चाललय ना. विश्वासाशिवाय ह्या जगात सुख कुठलं ग ? त्याच्या आधीच्या दोन तीन रात्री ते घरी आलेच नव्हते. मला वाटलं होतं, मित्राबरोबर पत्ते वगैरे खेळत बसले असतील !"

"तरीसुद्धा सुख देण्याचा तुमचा हट्ट होता ?"

"काय म्हणालीस ?"

म्हातारीला आपल्या बोलण्याचा प्रकारच उमगला नाही थोडा वेळ. म्हणून थोडीशी दचकलीच. . .पुन्हा विचारले. . ." अग मी काय सांगत होते ग ?"

"तुमचे यजमान दोन तीन रात्री घरी आले नव्हते. त्या दिवशी तुम्ही झोपण्याच्या तयारीत होता."

"बरोब्बर. आठवलं, बघ. . .इतक्यात दरवाज्यावर खटखटलं. मला आश्चर्य वाटले. अरेच्या. हे काय ? इतक्या लवकर ते कधी येत नाहीत. धड नीट जेवलेही नव्हते. रागात होते की काय कुणास ठाऊक ! काय झालंय काय ? असा विचार करीत होते, एवढ्यात 'हे' खोलीत आले. लगेच सदरा काढून खुंटीला अडकविला. हुश्श करीत म्हणाले '. .छोटी' . . .'

"काय म्हणाले ?"

"अग, त्यांनी मला 'छोटी' म्हणून हाक मारली. मी लग्नाच्या वेळी अगदी लहानशी दिसत होते. म्हणून मला सर्वजण छोटी, छोटी म्हणूनच हाका मारीत असत. पुढे आमचा संसार सुरू झाला. तेव्हा माझ्याकडे पाहून म्हणाले, 'अरेच्या. तू तर आकाशातल्या ताऱ्यासारखीच दिसत आहेस. लग्नात तुला दुरून पाहिलं होतं. एवढीशी दिसत होती. आता जवळून पाहतो तो !' खरं म्हणजे मी काही तशी लहानशी नव्हते. पण ते सदाच मला छोटी छोटी म्हणूनच हाका मारीत असत. . मी त्यांना विचारलं. . आज तुम्ही नीट धड जेवलासुद्धा नाही. का हो ?"

डोकं फार ठणकतंय, छोटी. . .

"अमृतांजन आणू का ?" म्हणून मी विचारलं. . . तशी म्हणाले. . . अमृतांजन येऊ दे. . .

"काय म्हणाले ?"

"अमृतांजन येऊ दे. त्यांच्या बोलण्याची पद्धतच तशी. नंतर म्हणाले. . . अग मला कुठल्याच औषधाची जरूरी नाही. छोटी, तूच इकडे ये. . . आणि मग मला तेथे बसवून माझ्या मांडीवर आपलं डोकं ठेवून पडून राहिले बघ. मी त्यांच्याकडे बघते तो काय. . . त्यांना चांगली गाढ झोप लागली होती. पुरुष म्हणजे खेळणारं, बागडणारं एक मूलंच कुमुद. हे तेव्हा माझ्या लक्षात आलं. . . बाहेर वाटेल ते खेळ खेळतील. हवा तितका वेळ खेळतील. पण, विश्राम, समाधानाचा त्यांचा आधार म्हणजे त्यांची बायकोच. आज माझ्या तोंडाचं बोळकं झालंय. डोळ्यांनी धड दिसत नाही. मांड्या तर सुकलेल्या फांद्यासारख्याच झाल्या आहेत. पण जेव्हा ही आठवण मला येते तेव्हा वाटतं. माझं तारुण्य परत मला मिळालं."

"पुरे पुरे. . . आत्याबाई. . ."

"अग वेडाबाई, तुला काय रडायला झालं ?

"मी रडत नाही आत्याबाई. . . असं म्हणतच कुमुद, रडू आवरेना म्हणून आपल्या खोलीत पळून गेली होती, त्या रात्रीसारखी गाढ झोप तिला कधीच लागली नव्हती."

सकाळी उठून पाहते तो रामण्णा आलेले. त्यांच्या हातात ती हीच साडी. त्याच क्षणी आदल्या रात्रीची आठवण स्वप्नासारखी निघून गेली.

नतद्रष्ट साडी ! ही साडी नाही. माझ्या सुखाच्या आड येणारा हा पडदाच आहे. . . आणि तरीसुद्धा, समजत नाही मी ही साडी कशाला नेसले आज ? मागे एकदा ही साडी नेसले तर मोहनला ताप आला होता.

"छे, काय वाईट विचार येतात मनात. आता मोहन येईल." . . . असं म्हणून निराशेने भिंतीकडे पाहात ती तेथेच बसून राहिली.

## ६

रामण्णा हसत हसत खिडकीजवळ गेले आणि एक दोन मिनिटे त्यांनी दूरवर डोकावून पाहिले. नंतर त्यांनी आपले हातातल्या घड्याळाकडे पाहिले. अजूनसुद्धा जवळ जवळ पंचेचाळीस मिनिटे आहेत, सभेच्या लोकांनी बोलवायला यायला. नाहीतर ते बोलवायला येणारे, रामण्णांना उगीचंच विनाकारण हसताना पाहून काय समजतील कोण जाणे. तसं पाहिलं तर ते विनाकारण हसत नव्हते. पण हे कारण दुसऱ्यांना सांगण्यासारखे नव्हते. दहा वर्षापूर्वीची गोष्ट. शिवाय तो एक आपला अनुभव आहे. आपली स्वत:ची भावना आहे.

"जाऊ द्या." . . . म्हणतच. एक दीर्घ सुस्कारा सोडून रामण्णा खुर्चीच्या जवळ गेले . . . मग पावले दुसरीकडे वळवून, पुस्तकाचे कपाट पाहून ते तिकडे गेले. कपाटाचा दरवाजा उघडून पुस्तके पाहू लागले. एक पुस्तक हातात घेऊन त्याची पाने उलटू लागले. त्यातील एका पानावरील एक श्लोक त्यांनी वाचला . . . पुस्तकाचे नाव पाहिले—ते कालिदासाचे अभिज्ञान-शाकुन्तलम् नाटक होते. ते पुन्हा श्लोक वाचू लागले.

रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान् पर्युत्सुकी भवति यत् सुखिनोपि जंतु: ।
तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वम् भावस्थिराणि जननांतरसौहृदानि ॥
(पर्याकुलस्तिष्ठति)

श्लोक गुणगुणताना रामण्णा व्याकुळ होऊन उभे राहिले. म्हणून तर लोक त्या महात्म्याला श्रेष्ठ कवी म्हणतात. ह्या श्लोकामुळेच तर त्याला हे सर्टिफिकेट मिळाले . . . असे म्हणून ते पुन्हा एकदा तो श्लोक वाचीत खुर्चीवर बसले. कालिदास श्रेष्ठ कवी आहे. ह्यात काहीच संशय नाही. कालिदासाने बाहेरील जगापेक्षा मनुष्याच्या आंतरिक जगात प्रवेश करून, तेथे खूप भ्रमण करून अंत:करणाचा नकाशा असा तयार केला आहे की तो आम्हा सर्वांना उपयोगी पडेल . . . असेच म्हटले पाहिले.

आज खरं म्हणजे रामण्णांना खूप आनंद व्हायला पाहिजे. दुसऱ्या कोणत्याही साहित्यकाराला मिळाला नाही असा श्रेष्ठ गौरव त्यांना प्राप्त झाला आहे. सार्वजनिक सभेची व्यवस्था होत आहे. सार्वजनिक सन्मान होत आहे. आणखी काय हवे ? ह्याच सार्वजनिक सत्कारसभेत त्यांच्याबरोबर कुमुद येत आहे. तिची वेशभूषा, अलंकार, आणि त्याहून ही तिच्या अंगांगातून प्रकट होणारे तिचे संयमित जीवन ह्या साऱ्यांचे क्षणभरच दर्शन घेऊन रामण्णांना वाटले . . . वा ! मला काही जणू स्वर्गच मिळाला. स्वर्गच का ? कुमुदने नेसलेली ती साडी पाहून तर रामण्णांना वाटले—आपल्याला मोक्षच मिळाला.

ती साडी त्या दिवशी अगदी मनापासून आपण कुमुदला दिलेली प्रेमाची भेट. ती साडी नेसल्यावर कुमुदचे सारे सौंदर्य किती खुलून दिसत होते...क्षणभर ते आनंदाने बेभान होऊन गेले होते. पण दुसऱ्याच क्षणी त्यांचे मन उद्विग्न होऊन गेले. ते अगदी हैराण होऊन गेले होते. का ? जुन्या गोष्टींच्या आठवणींनी की भविष्यकाळाची काही सूचना मिळाल्यामुळे ?

कालिदास म्हणतो,—सुंदर वस्तू पाहिल्यावर जुन्या आठवणींना उजळा मिळतो. आणि नकळतच आपले मन उद्विग्न होऊन जाते.

मागच्या जन्मापर्यंत जाण्याची जरूर ती कुठे ? ह्या जन्मातील आठवणींनीच केवढा थकवा आला होता दहा वर्षांपूर्वी गर्वाच्या तोऱ्यात खोटं बोलून. आपल्या मित्राला भलंतच काही सांगून त्यांनी कुमुदसाठी ही साडी खरेदी केली होती. उत्साहाने ते घरी आले. पण कुमुद घरीच नव्हती. तेव्हा क्षणभर रामण्णा घाबरले. दुसऱ्या क्षणी निराशेने पांढरेच पडले. पण तिसऱ्या क्षणी ते जोराने हसलेच. हास्य आणि संतोष ह्यांचा तसा काही संबंध नाही. अत्यंत संतप्त हृदयानेसुद्धा माणूस आपले हसू व्यक्त करू शकतो... रामण्णांना हे त्या दिवशीच्या अनुभवावरून कळून चुकले. त्या दिवशी त्यांना हसू का आले ? ते जर नाटकात काम करत असते तर त्यांनी आपल्या लांबलचक, स्वागत भाषणात सांगितलं असतं...आपल्याला हसू का आलं ? "अरे मूर्ख रामण्णा, तुझी अशी फजिती कशाने झाली ? तुझ्या गालावर थप्पड कशी बसली ? हा हा हा... साडी आणली ना ? कुमुदसाठी साडी आणली ना ? हा हा हा...अरे धोकेबाज प्रेमिक. तुझ्यासाठी प्राण देणारी, तुम्हीच माझे जीवन आहात, असं म्हणणारी तुझी पत्नी सरला जोपर्यंत जिवंत होती तोपर्यंत तिला–ह्यापेक्षा अर्ध्या किमतीची तरी एक चांगली साडी आणली होती का ? आता ही साडी आणलीस कोणासाठी ?" ...परंतु रामण्णा हे सारे भाषण इतक्या हळू आवाजात म्हणाले की ते फक्त त्यांनाच ऐकू आले... म्हणूनच ते हसले होते. दहा वर्षांनंतर, आज विचार करून पाहिले तर ? का ह्या विचाराचा मोठ्या हिम्मतीने सामना करायचा ?

रामण्णा एकदम घाबरले. मनात जो प्रश्न उठला होता नेमक्या त्याच वेळी त्यांचे लक्ष समोर गेले. समोर भिंतीवर सरलाचा फोटो होता ... फोटोत तिच्या चेहेऱ्यावर केवढं हास्य पसरलेलं होतं. ओठांवर, चेहेऱ्यावर, गालांवर, डोळ्यांत, जिथे पाहावे तिथे हास्य आणि हास्यच असं वाटतं होतं. चित्रकाराने ब्रश रंगात बुडवण्याऐवजी हास्यातच बुडवून चित्र तयार केले होते. पहिल्यांदा गरिबी. नंतर आजारपण. सरलाचं जीवनच असं होतं मुळी. सुखाचे दर्शन न घडतासुद्धा ते हसू शकत होते.

एकदा तिने विचारले होते .... "काय करताय तुम्ही ?" रामण्णांनी उत्तर दिले– "लिहीत आहे."

"पुरे झालं बाई. जेव्हा पाहावं तेव्हा लिहीतच असता. इतकं काय मिळतंय बाई ...लिहून लिहून."

"सरला, तुला सुखी करायची मला अगदी घाई झाली आहे बघ. म्हणून तर एकसारखं लिहीत आहे."

"मला ? आणखी किती सुख देणार हो ? माझ्या हृदयात एवढं सुख मावलं तरी पाहिजे ना?"

"तुझ्या हृदयात इतकं सुख झालं पाहिजे की बाहेर सगळ्यांना ते दिसलं पाहिजे. तेव्हा तू खूप सुंदर दिसशील बघ." बोलता बोलता त्यांनी हळुवारपणे तिच्या गालावर चापट दिली. त्या वेळी सरला पान खात होती. ओठ अगदी लाल चुटुक झाले होते. ...विड्याची लाली ओठांवर आली होती. तेव्हा, "अग पुसून टाक..." असं म्हणून रामण्णांनी तिच्या ओठांवरून आपली बोटे फिरविली.

"जसं बोलता तसं लिहायला पाहिजे. तेव्हा तुमच्या पुस्तकांची विक्री छान होईल बघा."

तेव्हा रामण्णा मजेत म्हणाले– "जे तोंडाने बोलतो ना ते ऐकणारी फक्त माझीच पत्नीच आहे. आणि जे लिहितो ना. ते दुसऱ्यांच्या बायका वाचतात."

"आता ते वाचायला त्यांना एखादा दिवस उशीर होऊ दे. आज लिहू नका हं!"

"का ? आज काही विशेष ?"

"आज काय ? अहो आपला हात हातात घेऊन आज ! ..."

"वा ! वा! विसरलोच की. पुन्हा सरला, मला क्षमा कर. ह्या लिहिण्याच्या गोंधळात मी हेसुद्धा विसरलो. की आज आपल्या लग्नाचा वाढदिवस आहे."

सरलाने त्यांच्या तोंडावर हात ठेवून म्हटले... "असं नका बोलू. आमच्या लग्नाचा वाढदिवस वर्षातून एकदाच येत नाही. मला तर रोजच सणा उत्सवासारखे वाटते."

"सरला, तुझ्यासारख्या स्त्रीचा हात हातात घेण्याची माझी खरं म्हणजे योग्यताच नाही. तुझ्यासारखी बायको मिळायला ... अनेक जन्माची पुण्याई हवी."

"अहो, जन्मजन्मांतरीसुद्धा मी आपली साथ सोडणार नाही ... बोलता बोलताच ती हसू लागली.

"सरला मला वाटतं मागल्या जन्मी तू चुकून कुणाला एखादी गवताची काडी सुद्धा दिली नसशील."

"का ? हा विचार सुचला आज ?"

"म्हणून माझ्यासारखा गरीब नवरा तुझ्या पदरी पडला. एकदासुद्धा, कधी तुला चांगली साडी आणण्याची ताकत नाही माझ्यात....खरं म्हणजे, तुझ्यासारख्या सुंदरीचे सौंदर्य खुलवणारी साडी मला आणायला हवी होती.

"अहो. बायकोचे सौंदर्य साडीने नाही खुलत स्त्रीचा हात हातात घेणारा पती तिच्यावर प्रेम करतो. त्यानेच तिचे सौदर्य खुलते, वाढते...."

"मग असं म्हण की. सौंदर्याचासुद्धा कनसेशनल रेट आहे!" ह्या गोष्टीवर सरला हसू लागली. प्रत्येक गोष्टीसाठी हसू 'आता फोटोतसुद्धा हसू !"

रामण्णांनी एक दीर्घ सुस्कारा सोडला. कालिदास कदाचित सर्वज्ञानी असेल. सुखाच्या आठवणीने दुःख होते. किती योग्य गोष्ट सांगितली आहे त्याने.

हूं...कालिदासाने आणखी एक गोष्ट सांगितलेली नाही. तो अनुभवानेच ती जाणतो....तो म्हणजे दुःखाच्या आठवणीने सुख होते. नाहीतर मागल्या भूतकाळातील आठवणी कशाला दाटून येताहेत ?

त्यांनी पुन्हा एकदा मनगटावरील घड्याळ पाहिले....हूं... विचारांच्या वेगामध्ये आणि घड्याळाच्या चालीत किती अंतर आहे ? आता सन्मानसमितीच्या लोकांना यायला फक्त ४२ मिनिटे राहिलीत. आता आपल्याला गंभीर होऊन बसण्याचा प्रयत्न केला पाहिजे. पुन्हा त्यांना हसू आले. छे ! त्या साडीच्या आठवणीची चव पुरती घेतली पाहिजे. जर ती घेतली नाही तर सन्मान समितीच्या सदस्यांवर मोठाच अनर्थ होईल.

.. थू ! कसला तो काळ. आणि ह्या व्यर्थ कशाला त्या जुन्या जुन्या आठवणी ....स्वतःशी पुटपुटतच रामण्णा खुर्चीवरून उठले. पाठीमागे हात बांधून ते खोलीत एकीकडून दुसरीकडे चकरा मारू लागले ... पहिली बायको वारली. तिच्या मरणापूर्वीच कुठल्यातरी कारणाने घरी आलेल्या एका मुलीला आपल्या मोहजाळात फसविले. अंथरुणावर खिळून पडलेल्या बायकोचा डोळा चुकवून त्या घरात राहिलेल्या दुसऱ्या मुलीशी व्यभिचार केला. त्या मुलीला दिवस गेले, बायको वारली तेव्हा त्या मुलीशी लग्न केले. जगात, दररोज.. कुठे ना कुठे, कित्येक जण, असं वागतच असतील. त्यांना मानसिक त्रास होत नसेल ? मग आपणच कशाला एवढा त्रास करून घेतोय. का आपण व्यभिचार न पचविता येणारे भित्रे, डरपोक आहोत ?

'व्यभिचार' शब्दाचा उपयोग करून आपण कुमुदचा अपमान करतोय. तो व्यभिचार नव्हताच. खरोखर ते मग ते प्रेम होते ? की वासना ?

आजसुद्धा घडीघडीला सरलाची आठवण आली तशी त्यांना वाटले, आजसुद्धा आपले सरलावर प्रेम आहे. का ? दोघींवर सारखे प्रेम करणे शक्य नाही ? तर काय,

लग्न झाल्यावर वासना व्यक्त केल्याने पहिल्या बायकोशी प्रेम; आणि वासना व्यक्त केल्यानंतर लग्न केले म्हणून दुसऱ्या बायकोशी, कुमुदशी, व्यभिचार झाला असं म्हणायचं का ?

रामण्णांना कधी कधी वाटतं. खरंच आपलं कुमुदवर प्रेम आहे. कुमुदवर प्रेम होतं...! असं का ते अशक्य आहे ? त्या दिवशी ते कुमुदसाठी साडी घेऊन आले होते. कुमुद घरात नाही, हे पाहून, त्या क्षणी त्यांचे मन किती निराश होऊन गेले होते. .... नंतर दुसऱ्या क्षणाची गोष्ट निराळी. त्यानी जाणीवपूर्वक विचार करून, आपल्या उसळत्या रागाला हसण्याच्या ठिणग्यांनी विझवूनच टाकलं. तरी पहिल्या क्षणाचा अर्थ काय ?

तरीसुद्धा रामण्णांच्या मनात संशय होताच. कुमुदच्याबद्दल त्यांना प्रेम वाटत असतं, तर इतकं सारं असह्य झालंच नसतं. आज ह्या गोष्टीला दहा वर्षे होऊन गेली. एकदुसऱ्याच्या सहवासाशिवाय घर, संसार चालवीत आहेत. तरीसुद्धा त्यांना दुसरीकडे कुठे आसक्ती उत्पन्न झाली नाही. का ? हे खऱ्या प्रेमाचे लक्षण होऊ शकते ?

विचाराच्या ओझ्याने थकून जाऊन रामण्णा पुन्हा खुर्चीवर बसले. त्यांच्या डोळ्यांसमोर एकदम कुमुदची मूर्ती उभी राहिली. त्यांनी इकडे तिकडे पाहिले....ती साक्षात कुमुदच होती का ? त्यांच्या मनाने निर्माण केलेली मूर्ती – स्मृतीने त्यांच्या समोर आणून उभी केली होती. दहा वर्षांपूर्वी जेव्हा ती घरी नव्हती . . .तेव्हा. मनात एकदम तीच कल्पना येऊन ते कुमुदच्या आत्याच्या घरी गेले. तेव्हा त्यांच्या समोर उभी. राहिलेली कुमुदची ती मूर्ती. कुमुदच्या चेहेऱ्यावर हसू दिसले. तिला पाहून रामण्णा घाबरले होते. रस्त्यावर रस्त्यावरचे बरेचसे लोक त्यांच्याकडे पाहून हसले होते. त्यामुळे रामण्णा आधीच घाबरले होते. लोकसुद्धा म्हणा हसणार नाही तर काय करणार होते ?

कुमुद घरात दिसली नाही, तेव्हा रामण्णांची स्थिती फार विचित्र झाली होती. शेवटी त्यांनी विचार केला, कदाचित कुमुद आपल्या आत्याच्या घरी गेली असेल. त्यांनी कुमुदला खूप ठिकाणी शोधले. ते कुणाला विचारूही शकत नव्हते. काही सांगूही शकत नव्हते. म्हणून कित्येक ठिकाणी भटकंती करून शेवटी, मनाशी निश्चय करून त्यांनी स्टेशनचा रस्ता धरला होता. मनाशी निश्चय करून तिकीट खरेदी करून कंपार्टमेंटमध्ये पोचेपर्यंत गाडी सुटण्याची वेळ झालीच होती. आत घुसले तर कंपार्टमेंटमधील अपर क्लासचे प्रवासी आश्चर्याने त्यांच्याकडेच पाहात होते. रामण्णा विचार करू लागले.– हे सगळे आपल्याकडेच काय पाहताहेत ? एका रिकाम्या बर्थवर ते बसले. रामण्णांना कुणाशी बोलण्याची इच्छा नव्हतीच. दुसरीसुद्धा कुणी त्यांच्याशी बोलली नाहीत. कधी

कधी ते त्यांच्याकडे चोरून पाहात. खूप वेळ त्यांना झोप आली नाही. जशी जशी रात्र झाली, लोकांनी आपले बिछाने पसरले. इतक्यात थकून भागून गेलेले रामण्णा. झोपायच्या विचारात . . . बिछाना . . .

छे ! काय मूर्ख आहोत आपण ! किती हास्यास्पद स्थिती. ते प्रवासाला निघाले तेव्हा त्यांच्या हातात फक्त ती एक साडीच होती. . . . रात्र झाली . . . तरी हातात साडी तशीच. तिलाच बिछाना समजून ते ती साडी पसरू लागले. डब्यातले दुसरे प्रवासी हसू लागले. शेवटी त्यांनासुद्धा स्वतःच्या परिस्थितीचे हसूच आले.

पुन्हा इतर लोक तर त्यांना ह्या स्थितीत पाहून रस्ताभर हसत असतील. . . . हा विचार मनात येताच रामण्णा कुमुदला भेटायलासुद्धा काचकूच करू लागले. त्यांच्या चेहऱ्यावर कोणता करुणभाव दिसत होता कुणास ठाऊक. कुमुदसुद्धा त्यांच्याकडे पाहून हसू लागली. त्या दिवशी सकाळी तिने आपल्या नजरेनेच रामण्णांना घाबरवून सोडले. तीच कुमुद आज रामण्णांच्या पुढे उभी होती. प्रसन्न चेहऱ्याने हसत हसत.

रामण्णांनी विचार केला. आज दहा वर्षे झाली पण आपल्या डोळ्यांसमोर कुमुदची हीच मूर्ती दिसत आहे. कितीही प्रयत्न केला तरी कुमुदची दुसरी कोणती मूर्ती त्यांच्या डोळ्यांसमोर येईनाच. मनाला हे किती फसवणं आहे. जगात मनुष्याचा व्यवहारच असा असतो. म्हणून तर शंकराचार्यांनी संसाराला माया म्हटले आहे ? कोणतीही वस्तू घ्या. ज्या रूपात ती आहे त्या रूपात कधी दिसतच नाही. पाहणारा आपल्या इच्छेनुसार त्या वस्तूला जे रूप देतो तशीच ती त्याला दिसते. शेवटपर्यंत तेच रूप त्याच्या दृष्टीसमोर राहते. . . . छे, तत्त्वज्ञानाच्या नावावर कितीही डोकेफोड करा. सगळं व्यर्थंच. जे आहे त्याचा स्वीकार केलाच पाहिजे. कुमुदने त्यांना प्रथम स्त्रीच्या रूपाने मोहित केले होते. नेहमी तीच मूर्ती त्यांच्या डोळ्यांसमोर उभी राहते. आपल्याकडे बोलावून घेणारे तिचे ते डोळे. पाहताक्षणीच आलिंगन देण्याची इच्छा होईल असा सळसळत्या तारुण्याचा देह. जवळ गेल्यावर, चुंबकासमान खेचून घेणारे ओठ . . . तिचे पुष्ट स्तन. रसरसलेल्या मांड्या . .

कधी कधी रामण्णांना वाटे, असा विचार करण्यात आपल्याला लाज नाही वाटत ? पण, खरं म्हणजे त्यात लाज वाटण्यासारखी कोणतीच गोष्ट नव्हती. बुद्धिपूर्वक कल्पना करण्याचे ते चित्र नव्हते. ते चित्र नष्ट करण्याची, विसरून जाण्याची शक्ती त्यांच्यात नव्हती. त्या दिवशी आत्याबाईच्या घरी गेल्यावर कुमुद समोर दिसल्यावर, तिच्या चेहऱ्यावर हास्य पाहिल्यावर एक क्षणभर रामण्णांच्या डोळ्यांसमोर अंधारच पसरला.

ओहो. रामण्णांना बरोब्बर आठवले. आपण साडी तेव्हा नव्हती नेली. ती तर दुसऱ्या वेळची गोष्ट आहे. प्रथम मोहनच्या जन्मा-आधी. . . आणि लग्नाच्यानंतर थोडे

दिवसांनी कुमुद आपल्या आत्याबाईच्या घरी गेली होती. तेव्हासुद्धा रामण्णांची अवस्था अशीच झाली होती. तेव्हा का आता कधीही असू दे. कुमुदची जेव्हा जेव्हा आठवण येते तेव्हा तिची हीच मूर्ती डोळयांसमोर उभी राहते. त्यावेळी कुमुद मोहनच्या जन्मा आधी, अकस्मात, निराश, हवादिल होऊन निघून गेली होती. त्या दिवसाचा तो अनुभव ! आजसुद्धा आठवला की अंगावर काटा उभा राहतो. ती गालातल्या गालात हसत उभी होती. रामण्णा स्तब्ध उभे होते. ती आई होणार होती म्हणून कदाचित तिच्या चेहेऱ्यावर एक निराळीच कांती दिसत होती. तिच्या डोक्यात करुणा साठलेली होती. तिला तोंड देणे जणू अशक्यच म्हणून रामण्णा एखाद्या अपराध्यासारखे उभे होते. त्यांना भीती वाटली. इथे किती वेळ असं उभं राहायला लागणार आहे. जर कुमुद त्यांच्यापुढे तशीच उभी राहिली असती तर रामण्णा बेशुद्धच पडले असते. अगदी नक्कीच. तेवढ्यात आतून एक म्हातारा आवाज ऐकू आला.

"अग, कुमे, हे बाहेर कोण आलेत ?"

कुमुद काय उत्तर देणार. . .ती सांगणार, ह्यांची माझी ओळख नाही. की माझे मित्र आहेत. . . .नातेवाईक आहेत. कुणी बदमाश माणूस आहे. . . .पण ती म्हणाली– "आत्याबाई, 'हे' आले आहेत. या ना तुम्ही इकडे."

त्याच क्षणी रामण्णांना धीर आला. त्यांना खात्री झाली की कुमुदचे अजूनसुद्धा आपल्यावर प्रेम आहे. तिने आत्याबाईंना सांगितले– 'हे' आलेत..."माझे हे" म्हटले नाही. तिच्या बोलण्यात आत्मीयता नव्हती.

"अय्या, तुझे यजमान का आले ! आणि असे शाळेतून पळून आलेल्या मुलासारखे का आले ?..." बोलत बोलतच म्हातारी खोलीत आली होती. चित्रातल्या बाहुल्यासारखे दोघांना उभे पाहून म्हातारीला चेष्टा करण्याची लहर आली.

"का रे बाबा, लग्नात, ह्या म्हातारीला बोलावलंसुद्धा नाही. पण पहिल्या बाळंतपणाला मात्र माझ्याकडे धाडलीस पोरीला".

आपण, उत्तरादाखल, एखाद्या वेडयासारखे फक्त दात बाहेर काढले होते.

"हस रे बाबा हस....कधी ना कधी सारी जणं म्हातारी व्हायचीतच, तेव्हा तरुण-पणी असंच हसत खेळत राहावं बघा ...ए कुमे, अशी उभी का ? नवऱ्याला बैस तरी म्हण"...

"आत्याबाई, घर तुमचं आहे !"

"अग. पण घरवाला तुझा आलाय ना ! जिथे तू राहतेस तेच तुझ्या नवऱ्याचं घर. बैस बाबा बैस. मी चहा करून आणते. मग आंघोळ कर. का रे बाबा बायको का कुठे पळून जात होती ? दुसऱ्याच दिवशी लगेच धावत धावत आलास !"

आपल्या उत्तराची अपेक्षाच न करता, शेवटी आपल्या आपल्याशीच बोलत म्हातारी आतमध्ये गेली. तेव्हा रामण्णांना जरासा धीर आला.

"कुमुद ?"...

"काय ?"

"माझ्यावर रागावलीस का ?"

"का ?"

"तुला माझ्याशी लग्न करायचं नव्हतं ?"

"केलं नसतं तर तशाच लाथा खात पडले असते. तुमच्या कृपेनेच वाचले मी !"

"समजलो. माझ्यावर राग आहे. तुझा."

"तुमच्यावर नाही. माझा मलाच राग आला आहे."

"काय ?

"तुमच्या गोड गोड बोलण्याने मी फसले."

"कुमुद, कुमुद, असं म्हणू नकोस. आपण दोघांनी आपल्या विचारांनी, सहमताने लग्न केले "

"लग्न केल्याने होणाऱ्या मुलाच्या नावापुढे त्यांच्या वडिलांचे नांव लिहिले जाईल. मला काय..."

"कुमुद, तुला अगदी मनःपूर्वक..."

"पुरी झाली.. आपल्या मनाची गोष्ट. तुम्ही लेखक आहात. तुम्हाला शब्दांचे महत्त्व कळते. म्हणून मनःपूर्वक म्हणता, चुकूनसुद्धा प्रेमपूर्वक म्हटले नाही....

"कुमे, ए अग, किती वेळ गप्पा मारीत बसायचं" बोलता बोलताच म्हातारी तिथे आली. रामण्णा ह्या आत्याबाईना कधीच विसरू शकणार नव्हते. त्यावेळी ती म्हातारी तिथे आली नसती तर त्या परिस्थितीत, जोरात येऊन ते काय म्हणून गेले असते कुणास ठाऊक. म्हातारीच्या प्रवेशामुळे तसं काही झालं नाही म्हणूनच त्यांनी थोडंसं धैर्य गोळा केले. कुमुदला त्यावेळी त्यांनी जे काही सांगितलं त्याची आठवण येताच, त्यांना आतासुद्धा संकोचल्यासारखं झालं, तेव्हासुद्धा त्यांना किती संकोच वाटला होता.

कुमुदवर ते प्रेम करू शकत होते.... तिला सांगायला पाहिजे होतं ... मी तुझ्यावर प्रेम करतो. परंतु सरलाची आठवण अंधुक, अस्पष्ट होईपर्यंत त्यांना कुमुदला तसे सांगण्याचे धाडसच झाले नाही. त्या दिवशी त्यांनी तो प्रश्न कुमुदलाच विचारला.

कुमुद म्हणाली होती,—"मला आता तुमचं प्रेमही नको आणि तुम्हीही नको . . ."

परंतु शेवटी तिनं ऐकून घेतलं. ती रामण्णांच्या घरात एका अटीवर, नाममात्र राहण्यासाठीच तयार झाली होती. ती अट अशी होती . . . मूल होईपर्यंत ती आत्या-बाईकडेच राहील. नंतर ती रामण्णांच्या घरी राहायला आल्यावर रामण्णा तिच्या बरोबर दांपत्यजीवन जगण्याचा अधिकार गाजविणार नाहीत."

रामण्णा म्हणाले होते— "तुझे म्हणणे मला मान्य आहे. अगदी आनंदाने मी तुझे ऐकतो."

'तुझे म्हणणे मान्य आहे' असे म्हटले होते. ह्याचेच आश्चर्य वाटते. तो कोणता संदर्भ होता ? मी तिचे काय ऐकतो . . . शेवटी सारी स्मृतिचित्रे डोळ्यासमोरून जाता. . .जाता आपण मान्य केलं. . .

की कालिदास एक श्रेष्ठ कवी आहे. . .

## ७

कुमुदने समोरच्या भिंतीला म्हटले— "त्या दिवशी त्यांचं ऐकलं हीच चूक झाली मोठी." नंतर तिने विचार केला, आज आपल्याला नवऱ्याच्या सत्कारसमारंभात त्याच्या छायेप्रमाणे सक्तीने जायलाच हवे. ही एक शिक्षाच आहे. काही का असेना. हा स्त्रीस्वभाव आहे. पुन्हा ती आरशाकडे तोंड करून बसली. तिने स्वतःशीच म्हटले . . . चेहेरा दिसायला पाहिजे. साडी नाही दिसली तरी चालेल. वेडाबाई. संसारातल्या सगळ्या सुखसोयी तुला हव्या आहेत. पण त्यातले काटे नकोत. हे कसे शक्य आहे ? लग्नाच्या आधी ते कसेही वागले असतील. पण आता तर ती एक विवाहित गृहिणी आहे. नवऱ्याची बायको आहे. तिला खाण्यापिण्याची कपडयालत्त्याची काळजी नाही. पण तरी नशिबात सुख नाही.

त्या दिवशीच तिला थोडं हिमतीने काम करायला हवे होते. तेव्हा तिच्या पोटात जीव वाढत होता. म्हणून तिला जरा नमतं घ्यावं लागलं होतं. म्हणूनच तिला सुरवाती पासून मुलाची जरा चीडच होती. तो रामण्णांचाच मुलगा होता. जेव्हा ती छोट्या बाळाला पाहायची तेव्हा तिला रामण्णांचीच आठवण यायची. रामण्णांची आठवण

यायची. रामण्णांची आठवण आली की आजसुद्धा, आतासुद्धा, कुमुदचे सारे शरीर मोहरून निघते.

एका दृष्टीने तो मुलगा तिच्या स्वर्गीय आनंदात एक बाधाच होता. एक दिवस, त्या घरातील म्हातारीने म्हटले होते.— "कुमे. तुझं शरीर, पोट, पाहून वाटतं, की तुला मुलगा होणार आहे."

कुमुदने जरा मोठेपणानेच म्हटलं होतं— "जे नशिबात असेल ते होईल. मुलगा का मुलगी कुणाच्या हातातली गोष्ट नाही."

कुमुदच्या मनात कधी कधी विचार उठत. हे काय रहस्य आहे ? जर मनुष्य पूर्णरूपाने परतंत्र आहे. असं म्हणणं आहे तर मनुष्यजन्मच पाहिला पाहिजे. तेव्हा तिला हे सारे माहीत होते ? आता कोणी विचारलं तर सांगता येईल. . . . हो माहीत होतं, पण तेव्हा तिला काहीसुद्धा माहीत नव्हतं. कोणत्याच गोष्टीची अपेक्षाही नव्हती. आणि कशाची काही कल्पनाच नव्हती.

काय आश्चर्य ! आता जे झालं, ते सारं पाहून, विचार करून त्याचा हिशेब बघून...त्याचा फायदा तोटा बघून तिला रामण्णांची चीडच आली. जर आत्याबाईचे शब्द खरे असतील तर रामण्णासुद्धा दुसऱ्या पुरुषांसारखेच. किंवा इतर सारे पुरुष रामण्णांसारखेच. भूक लागल्यावर अन्नाची चव काही निराळीच लागते. पोट भरल्यावर माणसाला शांत झोप लागते. हे प्रसिद्धच आहे. तसं बघितलं तर त्यात रामण्णांचा तरी काय दोष आहे ? चूक तिचीसुद्धा आहे. एक हाताने टाळी वाजत नाही. एका जीवाच्या जन्मासाठी दोन जीवांची आवश्यकता असतेच. नवीन कोवळी पाने आल्यावर जुनी, पिकलेली पाने गळून पडतातच. हे सारं ठीक आहे. पण तीच एकटी जुने पिकले पान होणार ? रामण्णा का नाही ?

हळूहळू कुमुदमध्ये एक प्रकारची कोमलता आली. ती विसरूनसुद्धा गेली की कधी आपण रामण्णांच्या रसिकतेची शिकार बनलो होतो. आपण एका नव्या जीवाला जन्म देणार. त्याचे पालन पोषण करून त्याला मोठा करणारी आई आपण होणार. ह्या विचारानेच ती आनंदून जायची. आपली एवढी योग्यता आहे ? ह्याचे तिला भय वाटे. . .आणि जसेजसे पोटातील अपत्य वाढत होते, तिचा उत्साहही वाढत होता. ओटीपोटात वाढलेला भार पाहून ती आनंदाने मोहरून निघे. मूल जन्मल्यावर त्याला पाजायचं. त्याला खायला प्यायला घालून मोठं करायचं,. . .ह्या साऱ्यांचा विचार करून तिच्या हृदयात एक वेदना टोचू लागे. पण मग तिला कळले. ही टोचणी, ही सळ आनंदाची आहे. मुलाला पाजायचं आहे म्हणून ह्या स्तनाच्या कळा आपण सोसायला हव्यात. बाळाच्या आहाराच्या पूर्वतयारीचे ते बाह्य लक्षणच होते.

कधी कधी तिला वाटे...रामण्णाच आपले बिचारे आहेत. त्यांच्यावर रागावून काय फायदा ? कसंही असलं तरी तो शेवटी एक पुरुषच आहे. पुरुषांना क्षणिक सुखाचा मोह असतो. चिरंतन मातृत्वाचा सुखद अनुभव पुरुषांना मिळत नाही. ह्या विचाराने तिला रामण्णांची कीवच यायची. ह्याच विचार प्रवाहात ती किती वेळ गुंग होऊन जायची. आपल्याला मुलगाच होणार भरवशावर ती होती. तिला रामण्णांची दयाच येऊ लागली. आरशासमोर बसल्या बसल्या कधी कधी तिच्या चेहेऱ्यावर अभिमानाचे हास्य चमकायचे. छे, वेडे पुरुष ! रामण्णा माझ्या सौंदर्यावर मोहित झाले, त्यात आश्चर्य ते कसले !

कित्येक वेळा अशाच विचारप्रवाहात तिला सरलाताईची आठवण येई. बिचारी ! सुख कसं ते तिने पाहिले नाही. नेहमी म्हणायची...."घरात मुलं बाळं असली म्हणजे घर कसं भरल्या भरल्या सारखं दिसतं !" तेव्हा आपल्याला काही कळत नव्हतं. एक दिवस, सरलाताईशी गप्पा मारता मारता, आपण किती वेडपट प्रश्न विचारले होते...

"हे बघ कुमुद, बाईला एक आपलं स्वत:चं घर असावं, पोटभर खाऊन ते पचवून टाकणारा नवरा असावा. आणि घरभर बागडणारी, खेळणारी, हुंदडणारी मुलं असावीत."

"ताई, तुम्हां...आपलं घरकूल आहे."

मग खाण्याची आठवण आल्यावरून सरलाताई म्हणाली—अगदी हसत हसतच..
"खाऊन ते पचविणारा नवरा आहे !"

"मग आणखी काय हवे ? थोड्याच दिवसांनी मुलंबाळं होतील."

आपल्या ह्या बोलण्यावर सरलाताईने दीर्घ सुस्कारा सोडला. आणि वर आढ्याकडे टक लावून स्तब्ध बघतच राहिली.

"मग त्या नंतर ?"...

सरलाताई म्हणाली होती..."तू अगदी वेडाबाईच आहेस." आपल्याला काहीच कसं कळलं नव्हतं. नवरा असला की मुलं बाळं होणारच. हाच विचार कुमुदच्या मनात पक्का बसलेला होता.

"तुला काही कळत नाही कुमुद. ह्या आजारातून बरं होणं कठीण आहे."

"ताई..."

"आणि, समजा, मला जरी बरं वाटलं, तरी मुलाचं सुख माझ्या नशिबात नाही."

"कां ग ?"

ह्यावर सरला अगदी खळखळून हसली होती. तिचा थकलेला मलूल चेहेरा, ह्या

हसण्याने खूपच सुंदर दिसत होता. सरलाताई म्हणाली होती—"का ? अग, उद्या लग्न झालं म्हणजे सगळं कळेल तुला."

लग्न झाल्यावरसुद्धा मुलं होतीलच असा भरवसा नाही. प्रत्येक स्त्री आई बनेलच हाही भरवसा नाही. हे रहस्य कसले ? तेव्हा तिला काहीच उमगले नाही.

तेव्हा कळले नाही पण नंतर सारं काही कळायला काही वेळ लागला नाही.

जी गोष्ट, अक्कल होती तेव्हा समजली नाही. आता सारी अक्कल गमावल्यावर ध्यानात आलं !

कितीही उद्विग्नता आली तरी कुमुदला ह्या आठवणींनी हृदयात एक नवीनच चेतना मिळत होती.

ठेच लागल्यावरच माणसाला शहाणपण येते. तेव्हाच्या त्या आपल्या मन:स्थितीची आठवण येताच कुमुदला अजूनसुद्धा आश्चर्य वाटते. एक वेळ अशी होती, रामण्णांना पाहताच किंवा त्यांची आठवण करताच तिचे मन ताळ्यावर राहात नसे. असं का होत होते ? प्रत्येकीला असे वाटते ? कुमुदला काहीच कळनासे झाले होते. तिला असेच वाटत होते. त्यांना ही असंच वाटते ? बुद्धी आणि शरीर दोन्हींवर खरं म्हणजे तिचा ताबाच नव्हता. योग्याची गोष्ट सांगतात ना ? जे डोळ्यासमोर नाही तेसुद्धा त्यांना प्रत्यक्ष दिसते असं म्हणतात ना. शरीराच्या सुखदु:खाचेही ज्ञान त्यांना नसते. तिला वाटलं, की मोहनची आई होण्याच्या आधी आपल्यात अशीच योगवृद्धी होती.

त्या दिवसाची ती घटना, कुमुदला अजून आठवते. तिला वाटलं, की जणू आपली सारी कथाच संपून गेली. सरलाताईला आपल्याबद्दल सारं कळलं का ? तिची खात्रीच झाली त्याबद्दल. त्या दिवशीच्या त्या अनुभवाने तर तिला स्वत:लाच केवढे आश्चर्य वाटले.

गोष्ट तशी मामुलीच होती, रात्रीचे नऊ वाजले होते. रामण्णा बाहेरून परत आले नव्हते. म्हणून तिनेसुद्धा जेवण केले नव्हते. सरलाताईने दूधही घेतले नव्हते. सरलाताईने इतक्या उशीरा दूध घेणं तिला बरं वाटलं नाही. तिने एकदोनदा सरलाताईला आग्रहसुद्धा केला. तिने विचारलं,

"ताई, तुला दूध आणू ?"

"मला कसली ग एवढी घाई ? त्यांना यऊ दे, त्यांचे जेवण होऊ दे.

"ताई, मी थांबते त्यांच्यासाठी !"

"अग, मलातरी कुठलं मोठं काम आहे ? मी थांबते त्याच्यासाठी."

"त्यांची वाट पहात बैस तू ताई. पण आधी तुझं दूध टाक बघू."

"राहू दे ग कुमुद. मी काय भुकेनं तडफडत आहे का ?" जरा चिडूनच सरलाताई म्हणाली.

थोडा वेळ आणखी निघून घला. पण रामण्णा आले नाहीत. कुमुदला काय वाटलं कुणास ठाऊक. झटकन् म्हणाली—

"ताई, तुला दूध आणू का ?"

"अग, नको म्हटलं ना ? मी एकटी..."

"मीसुद्धा जेवून टाकते, ताई."

सरलाताईला तिचं बोलणं कळलंच नाही.

"अग, वेडाबाई, तुला कुणी नको म्हटलं ग ? तुला केव्हाची म्हणतेय जेवून घे. जेवून घे. तुझं हे वाढीचं वय आहे. असं उपाशी राहून कसं चालेल ? भूक लागली तर चटकन् खाऊन घे बघू. मी थांबते त्यांच्यासाठी."

"तसं नाही ग ताई. मी कुठे म्हटलं, मला भूक लागलीय म्हणून...रामण्णा कुठे तरी जेवायला गेलेत."

"केव्हा सांगितलं त्यांनी ?"

"तेव्हाच. जायच्या वेळी सांगून गेले होते. म्हणून म्हटलं, आपण दोघी उरकून टाकू या"

"छे, मला काहीच माहीत नाही. केव्हा, कुणाला काय काय सांगून जातात कुणास ठाऊक..." सरलाताई वैतागून काही काही बडबडत होती. कुमुदने सरलाताईला दूध आणून दिले होते आणि आत जाऊन ती जेवणाची तयारी करू लागली. बाहेरून कसला तरी आवाज आला. तिनं नीट लक्ष देऊन पाहिलं, तर बाहेर कुणीच नव्हतं ..पण आवाज तर ऐकल्यासारखा वाटला. म्हणून तिने जरा काम थांबविले, लगेच ती बाहेर आली तशी तिला पाहून सरलाने विचारले,

"का ग, इतक्या लवकर जेवण झालं ?"

"नाही. जेवायला बसणार, इतक्यात कुणाचा तरी आवाज ऐकू आला."

"कुणाचा आवाज ?"

"कुणीच नाही. पण आवाज कानावर आला."

"म्हणून का उठून आलीस ? जा, इथेच ताट घेऊन ये. एकटीला आत..."

"नाही ग. मी थोडावेळ आणखी, त्यांची वाट पाहते."

"अग तूच म्हणालीस ना. त्याना कुठेतरी जेवायला जायचेय."

"हो ताई, पण मी म्हटलं ना, कुणाचा तरी आवाज कानावर पडला म्हणून बाहेर आले."

" 'हे' च आले असतील. मला कळलं सुद्धा नाही बघ. ...काय म्हणतेस ?"

"नाही ग, ताई. मित्रांनी ओढून जेवायला नेलं असेल, पण मग ह्यांना वाटले असेल आपल्याला खूप उशीर होईल म्हणून परत आले असतील. मला तरी असंच वाटतं !"

"कुमुद, काही खाल्लं नाहीस म्हणुन तुला डुलकी यायला लागली का ?" . . .सरलाताई असं सांगत होती इतक्यात बाहेर दरवाज्यावर आवाज झाला. कुमुदने खाली मान घालून दरवाजा उघडला. तो समोर रामण्णा उभे. तशीच माघारी पळून गेली. का कुणास ठाऊक, तिचे मन नुसते धडधड करीत होते. स्वयंपाकघराच्या दाराआड उभं राहून ती सारं बोलणं ऐकू लागली.

रामण्णांनी येताक्षणीच इकडे तिकडे नजर टाकली. "वा! तू औषध, दूध घेऊन टाकलंस ? बरं केलंस मला वाटलंच. की तुम्ही दोघी विनाकारण माझी वाट बघत बसाल.

"तुमचं जेवण झालं !" सरलाताईने विचारले. रामण्णांना आधीची घटना काहीच माहीत नव्हती. त्यांनी विचारलं– "काय म्हणालीस ?"

"नाही, म्हटलं, तुम्हाला कुणी मित्रांनी आग्रहानं जेवायला बोलावलं होतं ना !"

"होय. तुला कुणी सांगितलं ?"

"कुमूद म्हणाली मला."

"तिला कुणी सांगितलं ?"

"का, तुम्हीच तर जायच्या वेळी तिला सांगितलं होतं ना ? रामण्णांनी जरा दचकूनच इकडे तिकडे पाहिले. कदाचित ते स्वतःलाच शोधीत होते. ते सरलाकडे आश्चर्याने पहातच राहिले.

"का ? आता काय झालं ? कुठून खाऊन आलात का ? सरलाताईच्या ह्या बोलण्यावर रामण्णा जोरजोरात हसू लागले.

"अग, आता असं वाटतंय. की तुम्ही दोघींनी मिळून आज मला उपासाची शिक्षा द्यायचा निश्चय केला की काय ? पण माझी चूक कबूल करतो बघा. कारण आपल्याला तर अगदी कडकडून भूक लागलीय."

"भूक लागलीय ? मग मित्राकडे जेवण ?"

"अग, त्या महाशयानं, खूप आग्रह केला. म्हणून मी सुद्धा त्याच्या आग्रहाला बळी पडून अर्ध्या रस्त्यापर्यंत गेलो. पण इतक्यात मला वाटलं, हे जेवणखाण गप्पा. आवरता आवरता किती उशीर होईल. म्हणून मधूनच त्यांचा निरोप घेऊन आलो . . हॅं हॅं . . ."

"म्हणजे तुम्ही जेवला नाहीतच ?" सरलाताईने अगदी हैराण होऊन विचारलं. रामण्णानी नुसती मान हलविली."

"पहिल्यांदा मित्राचा आग्रह मानलात. नंतर उशीर होईल म्हणून निघून आलात. ..." सरलाताई अशा आवाजात बोलली जणू काही स्वतःशीच बोलत आहे.

तेवढ्यात कुमुद तिथून सटकली. त्या दोघांची बोलणी ऐकायला ती उभी न राहताच. त्यावेळी रामण्णा आणि सरलाताई तिच्याकडे ज्या नजरेनं पाहात होती त्याचा अर्थ तिला समजला. बाहेर जी बोलणी झाली होती तसंच तिने सरलाताईला सांगितलं होतं. पण ह्यावर रामण्णांचा विश्वासच बसला नव्हता. पण आता विश्वास न ठेवूनही चालणार नव्हतं. असं का ? कारण काय ? तिचा स्वतःचासुद्धा विश्वास बसत नव्हता. पण तरीसुद्धा मित्रांचा आग्रह करून घेऊन जाणे, रामण्णांचे काही तरी सबब सांगून परत येणे ह्या सर्व गोष्टी तिने स्पष्टपणे ऐकल्या होत्या. तेव्हा तिला जे वाटले होते ते सारे खरे होते.. . .जाऊ द्या. सारे काही ठीक झाले होते. ज्यांच्यावर विश्वाससुद्धा बसणार नाही अशी घटना घडली होती.

त्या दुसऱ्या घटनेनेही तिचे मन विचलित होऊन गेले होते. ही एखादी भुताप्रेताची तर घटना नाही ना अशीही भीती तिला वाटली. प्रथम रामण्णांच्या रात्रीच्या जेवणानंतर जी घटना घडली होती त्याबद्दल त्यावेळी कुमुदला आश्चर्य वाटले. पण काही दिवसानंतर ती घटना साफ विसरून गेले होते. कधी कधी गप्पा मारता मारता . . . "काय आजचं भविष्य काय आहे ?" असं विचारून कुमुदला चिडवीत. पण नंतर तेसुद्धा ती गोष्ट विसरून गेले. सारं काही ठीक चाललं होतं.

एक दिवस संध्याकाळी, कुमुद सरलाताईबरोबर गप्पा मारीत बसली होती. रामण्णा कुठलं तरी पुस्तक आणायला म्हणून पटकन बाहेर गेले. . . . जाता जाता म्हणाले— आत्ता आलोच हं. एक प्रसंग मिळाला नाही म्हणून काम थांबलं होतं म्हणून पुस्तक आणायला जातो."

पाच सात मिनिटे सरलाताईशी गप्पा मारून, कुमुद झटकन उठली. उठताक्षणीच 'हाय, हाय' करून पाय पकडून बसली.

"का, काय झालं पायाला ?"

"ठेच लागली."

"काय म्हणालीस ? सरलाताईला विचारल्यानंतर ती थोडीशी शुद्धीवर आली. मलूल चेहेऱ्याने ती सरलाताई कडे पाहू लागली. तेव्हा सरलाताईने हसत हसत विचारले, . . . "काय, कुमुद, दिवसासुद्धा स्वप्न बघतेस काय ?"

"नाही ग ताई कशाला तरी ठेच लागली बघ. फार दुखतंय ग." बोलता बोलताच

पाय धरून ती उठली. तेव्हा तिच्या आणि सरलाताईंच्या लक्षात आलं, फारसं लागलं नाही."

"बरं, ह्या दुखण्यावर मात्र तुला अगदी लवकर औषध घेतले पाहिजे बघ." सरलाताई हसत हसत म्हणत होती. इतक्यात बाहेरून कुणाचा तरी आवाज आला. "दरवाजा उघडा, दरवाजा उघडा."

दरवाजा उघडताच रामण्णा कुणाच्या तरी खांद्याचा आधार घेऊन उभे राहिलेले दिसले, भरभर जातांना त्यांना चांगलीच ठेच लागली होती. सरळ पायालाच लागलं होतं.

तेव्हापासून कुमुदचा पूर्ण विश्वास बसला होता. पण हे असं का होतं ते तिच्या लक्षात आलं नाही. तरीसुद्धा रामण्णांच्या संबंधीच्या ह्या अनुभवावरून तिचा अगदी पुरता विश्वास बसला होता की आपलं मन आता पूर्णपणे रामण्णांचे होऊन चुकले आहे.

कुमुदने किती वेळ विचार केला, का प्रेम असेच असते ? ज्याच्यावर आपण इतके प्रेम करतो त्याच्याशी इतकी आत्मीयता होते ? कुमुदची हीच अवस्था होती. पोटात वाढणाऱ्या त्या जीवासाठी तिला असे वागणे भागच होते. मातृत्व म्हणजे काम-तृप्तीची शिक्षा नाही. संभोगाच्या परिश्रमाचे फळ नाही आणि स्त्री पुरुष मीलनाचा परिणाम-सुद्धा नाही. कुठल्या वास्तविक कारणातून निर्माण झालेलं कार्य नाही. हे दोन हृदयांचे एक होऊन जाण्याचा हा बाह्यसंकेत आहे. कुमुदच्या बुद्धीच्या पलीकडे असूनसुद्धा ही भावना अगदी अस्पष्टपणे तिथे होतीच. मातृत्वाच्या ह्या प्रभावानेच, कुमुदने मुलाच्या जन्मानंतर रामण्णांच्या जवळ राहण्याचे वचन दिले...पण तरीसुद्धा तिने एक अट मात्र घातलीच होती– "आपण दोघे जण दांपत्य जीवनापासून दूरच राहणार."

तरीसुद्धा कुमुदला कधी कधी वाटायचं, की आपण रामण्णाचं ऐकायला नको होतं. नंतर त्या साडीच्या प्रसंगावरून तर सारखं वाटायला लागलं "आपण उगीचंच त्याचं ऐकलं..."

ती स्वतःशीच पुटपुटली–"छे, त्यांचं ऐकायला नको होतं !" नंतर तिने एकदम चहूकडे पाहिलं. मी काही तरी बोलत होते का ? मला ऐकायला नको होतं...असं मी म्हणत होते ? लगेच तिने मनगटावरील घड्याळाकडे पाहिले. तेव्हा तिला आठवण झाली...खरंच आज त्यांच्याबरोबर सन्मानसभेला जायलासुद्धा आपण तयार नको होतं व्हायला. पण पुन्हा तिला जरा बरं वाटलं...कारण तिला वाटलं..."ह्या मुलाचा स्वभाव मला माहीत आहे. एकदा खेळायला लागला की त्याला कशाची आठवण म्हणून राहत नाही. कितीदा समजावून सांगितलं...आज सभेला जायचंय; लवकर खेळून ये. पण अजून ह्याचा पत्ता नाही. आता केव्हा तयार होणार ?" बोलता

बोलता तिने पुन्हा हातातल्या घड्याळाकडे पाहिले. "अरेच्या. फक्त अर्धा तासच राहिलाय. सभेला जायला." असं पुटपुटतंच ती बेचैन होऊन दरवाज्यापाशी आली आणि मोहनची वाट पाहू लागली.

## ८

रामण्णांनी मनगटावरील घड्याळ पाहून म्हटले, "अजूनसुद्धा अर्धा तास बाकी आहे. अरे बापरे, कसा तो जात नाही. किती वेडे आहोत आपण. भूतकाळातील आठवणी आठवता आठवता वेळ कसा तो संपत नाही. जाऊ द्या. आजची ही सन्मान-सभा, म्हणजे मागच्या आठवणी काढायचा विषय नाही. आपण त्या सन्मानसभेचीच वाट पाहात आहोत. लेखक म्हणून त्यांचा सन्मान करण्यासाठी आज सत्कारसमारंभाची योजना झाली होती. आता रामण्णा पंचेचाळीस वर्षांचे झाले आहेत. लोकशाहीच्या युगात आज जनतेकडून त्यांचा सत्कार होत आहे. हा खरं म्हणजे केवढा गर्वाचा विषय आहे ? पण तरीसुद्धा त्यांना ह्याबद्दल काही उत्साह का नाही वाटत ? का ? ह्यात एवढे काय ? सगळे जग म्हणजे एक ढोंग आहे. माफ करा. असं म्हणणं, कदाचित सौजन्याचं ठरणार नाही. सारे जग म्हणजे एक माया आहे. होय. ढोंग शब्द जरा कठोर आहे. माया शब्द तत्त्वज्ञानसूचक आहे बरोबर हीच तर साहित्याची मोठी शक्ती आहे. तरीसुद्धा आपल्या घरात विचार करताना 'ढोंग' शब्दाचा योग्य उपयोगच होतो. ढोंग ! आपले साहित्यही 'ढोंग'च आहे आजचा सार्वजनिक सन्मानसुद्धा ढोंग आहे. आपले साहित्य कसे आहे ? ते आता जसे वागतात तसेच आहे ना ? का अशा विषयावर इतके दिवस जो अनुभव प्राप्त केलाय त्याचे वर्णन आपण कुठे केलेय ? एका पत्नीचा मोठ्या प्रेमाने स्वीकार केला. दुसरीचा लोकलज्जेसाठी स्वीकार केला. आपण ही कथा लिहिली ? ही कथा सांगायला आपल्याजवळ शब्द नाहीत. टेक्निक नाही. ही आपली कथा लोकांना सांगणे तसं योग्यही नाही. आणि समजा सांगितली तर ऐकणारे ती समजू शकतील ?

वेड्या अरे वेड्या. लोकांना समजेल अशा विश्वासाने तू इतकी वर्षे आपल्या एका विशिष्ट शैलीत विचारपूर्ण आणि विचारोत्पादक किती भाषणे दिलीस ? हे माहीत आहे तुला ? तू केवढी साहित्यसेवा केली आहेस. पण समाजाने तुझ्या त्या 'सेवेने' प्रगती केली नाही .

ढोंग. सारं जग ढोंगी आहे. जर काही सत्य असेल तर एकच— ते म्हणजे आमचे पाशवी जीवन. भर्तृहरीच्या म्हणण्याप्रमाणे आहार, निद्रा, भय, मैथुन हेच वास्तविक जीवन आहे. मनुष्याचे स्वाभाविक जीवन त्याच्या ह्या वृत्तीमध्येच आहे. बाकी सारे ढोंग आहे थोडा वेळ आपल्या ह्या वृत्तींना दूर ठेवून आपण स्वतःला 'सुसंस्कृत' म्हणतो. एखादे दिवशी ह्या वृत्ती दाबून ठेवता आल्या नाहीत की जो संघर्ष होतो त्यामुळे निग्रहाची सारी बंधनें तुटून जातात. तेव्हा थोडा वेळ शरम वाटते. . .कुणाच्या समोर आपण तोंड दाखवीत नाही. एक दुसऱ्यांना टाळतो. 'सुसंस्कृत' बनतो. . .मग नंतर. . . नंतर. . .

नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण. . .

आजच्या सभेत ह्या विषयावरच बोललो तर? अरेच्या, आपल्याला मानपत्र देण्याचाही कार्यक्रम आहे ना? म्हणून तर दैवाला क्रूर म्हटले आहे. मानपत्रामध्ये त्यांच्या साहित्यसेवेचीच नाही तर त्यांच्या दांपत्यजीवनाचीही प्रशंसा केली गेली आहे.

काय आदर्श! दहा वर्षे झाली. दांपत्यजीवनाचा आनंद एक क्षणही मिळाला नाही. सुखी संसाराचे नाटक करता करता दहा वर्षे निघून गेली. तरीसुद्धा आजच्या सभेला यायचे कुमुदने कबूल केले. . .खरं म्हणजे हे एक आश्चर्यच आहे. पहिल्यांदा एकदा असंच तिनं आपलं ऐकलं होतं. तेव्हा रामण्णांना असाच आश्चर्याचा धक्का बसला होता. मोहनच्या जन्मानंतर घरी परत आली होती. बरोबर. आता आठवलं साडीचा तो प्रसंग नंतरचा. मोहनचा पहिला वाढदिवस होता. त्या दिवशीसुद्धा निघून गेली होती नाही का? आपल्याजवळ राहण्याचे तिने मान्य केले होते. तिच्या अटीप्रमाणे आपण ब्रह्मचारी राहण्याचे व्रत घेतले तरीसुद्धा ती निघून गेली होती. आजही तशीच वागली तर? सन्मान सभेसाठी बोलवायला येण्याच्या आधीच ती निघून गेली तर?

रामण्णा जरा घाबरलेच. हळूच खाली उतरून उंबरठ्यावर उभे राहिले. कुमुद तिथे दिसली. तेव्हा त्यांनी फिरून विचार केला. छे! आपण किती अधीर झालो आहोत? अरेच्या आणखी एक गोष्ट. मोहन घरात नाही. त्याला सोडून कुमुद कशी येईल?

मोहनशिवाय आपल्याला जिवंत राहता येणार नाही. मोहनच्याशिवाय कुमुदलाही राहता येणार नाही. म्हणून कुमुदला आणि आपल्यालाही एकमेकांशिवाय राहता येणार नाही. हा एक चांगला तर्क आहे. . .असं म्हणतच रामण्णा वर गेले एक वस्तू प्रमाणेच दिसणाऱ्या दोन वस्तू परस्पर समानच असतात. एकाच जीवाला चिकटलेल्या दोन जीवांना परस्पर चिकटूनच राहायला पाहिजे ना?

भवभूतीनेसुद्धा म्हटले आहे. "आनंदग्रंथिरेकोयं अपत्यमिति बध्यते". . अर्थातच. . "पति-पत्नींना जोडणारी कडी म्हणजेच मूल." मोहनला घेऊन आत्याबाईंच्या धरून कुमुद जेव्हा पहिल्यांदा परत आली तेव्हा रामण्णांना असंच वाटलं. कुमुद रामण्णांशी मुलाच्याबद्दल खूप बोलायची. आत्याबाईंच्या घरी मुलाच्या बाल-लीलांचं वर्णन करायची. रामण्णा जेव्हा मुलाशी खेळायचे तेव्हा रामण्णा किती गर्वाने, आनंदाने कुमुदकडे पाहायचे. हळू हळू रामण्णांना वाटले की आपल्या दोघांमधला दुरावा कमी झाला. मी आणि कुमुद. मी आणि कुमुद. काय ?

प्रेमाने संसार करू शकतो ? 'नाही' असं कधी मनात आलंच नाही. पण आता तर खात्रीच झालीय की कुमुद व आपण पहिल्यासारखे राहू शकू ! का राहता येणार नाही ? असा विचार करून त्यांनी एकदा कुमुदला विचारलेही होते कुमुदनेच उलट विचारले— "पहिल्यासारखे म्हणजे कसे ?"

"तसं नाही. . . .म्हटलं, असंच दोघांनी राहण्यापेक्षा !"

"असंच म्हणजे काय ?"

"नाही. . .पण हे असं नुसतं. . .

"पण आता काय कमी आहे तुम्हाला ?"

"कमी असं म्हणायचं नाही ग. पण एका घरात राहून असं—"

"तुम्हाला तसं वाटत असेल तर एका घरात राहायचीही जरूरी नाही."

"छे, छे, असं नाही माझं म्हणणं. . . ."

"मग काय म्हटलंत ?"

असंच काहीतरी बोलणं झालं पण तशी संधीच आली नाही. जेव्हा ह्या गप्पा चालल्या होत्या, तेव्हा मोहन कुमुदच्या जवळून रामण्णांकडे येण्याचा एकसारखा प्रयत्न करीत होता.

कुमुदने त्याला अडवून धरले होते. मोहन हट्ट करू लागला. कुमुदने त्याला घट्ट पकडून ठेवले होते. तोपर्यंत तो हात पुढे करून भोकाड पसरू लागला. रामण्णांचा जीवात जीव आता. संवादाला योग्य गती मिळतच नव्हती. तिच्याशी बोलताना मूळ मुद्याला कसा हात घालायचा हाच प्रश्न होता. चर्चा पुढे कशी वाढवावयाची तेच त्यांना कळेना. अशा वेळी आपल्या मुलाने हात पुढे करून आपल्याकडे येण्याचा प्रयत्न करणे प्रत्यक्ष परमात्म्याने मुलाचे रूप घेऊन आपल्याला संकटातून वाचविण्याचा प्रयत्न करणेच. लहान मुलांना, कुठून ही मोठ्यांना छळायची बुद्धी येते कुणास ठाऊक. तेव्हा मोहन आपल्याकडे यायचं म्हणून हट्ट धरून उसळी मारू लागला. आपण त्याने पुढे केलेला हात पकडू लागलो तर त्याने आपल्या आईलाच घट्ट मिठी मारली. आपल्याला

ही कल्पनाच नव्हती. आपण त्याला घ्यायला म्हणून हात पुढे केला. मुलाचा आपला हात आईपासून मुलाला सोडवू लागला....पण त्याच वेळी..."

ती आठवण येताच रामण्णांचे सारे शरीर थरथरून निघाले. त्यांच्या साऱ्या शरीरातून जणू वीज सळसळून उठली असा अनुभव त्यांना कधीच आला नव्हता. एक क्षणार्धातच त्यांना वाटले, आपल्या शरीरातून हिच्या शरीरात, आणि हिच्या शरीरातून आपल्या शरीरात एकाच विजेचा संचार झाला. तो अनुभव. त्या अनुभवाबद्दल दोघांचा संकेत. त्या संकेताला दोघांचे उत्तर आणि त्या उत्तराला दोघांची सम्मती...इतकंच काय पण आणखीसुद्धा खूप होऊन गेलं त्या तेवढ्या वेळात असं वाटलं. आपण दोघे पुतळ्यासारखे स्तब्ध उभे आहोत.

किती युगांचा, किती जन्मांचा अनुभव त्या एका क्षणात दाटला होता. त्या दोन जीवांना निसर्गाने त्यांच्यावर सोपविलेल्या जबाबदारीची जाणीव झाली होती. दोघांची शरीरे अकस्मात् परस्परांशी अशी मिळून गेली की जणू काही दोघांचे वेगळे अस्तित्वच राहिले नाही.

रामण्णा खिन्नपणे हसले स्वतःशीच. त्या दिवसाची ती आठवण आणि त्याबद्दलचे अनेक विचार मनात दाटून आले होते. दोन शरीरांचे अस्तित्वच राहिले नाही ही गोष्ट रामण्णानी आपल्या साहित्यिक शक्तीच्या कल्पनेवरच सांगितली नाही. रामण्णा जेव्हा त्या बेहोशीतून उठले तेव्हा त्यांना तिथे कुमुद दिसलीच नाही.

तरीसुद्धा रामण्णांना खूप आनंद झाला होता. त्या एका क्षणाच्या अनुभवाने ते मागल्या कित्येक महिन्यांच्या साऱ्या यातना पार विसरून गेले. त्या यातना दूर झाल्या होत्या. इतके महिने कुमुदने असा असहकार दाखविला होता. पण शेवटी मात्र तसे काही न दाखविता ती आपल्याजवळ येऊन राहिली होती.

कुमुद आपल्यावर पूर्वीप्रमाणेच प्रेम करीत आहे ह्याबद्दल रामण्णांना काहीच संशय नव्हता. कुमुदच्या शरीराला स्पर्श करणाऱ्या त्यांच्या हातांनीच त्यांना हा विश्वास दिला होता. निसर्गातील हा केवढा चमत्कार ? देहाला आपण जड मानतो. परंतु तोच देह अत्यंत सूक्ष्म, अशा अनुभवाला किती लवकर व्यक्त करतो. असा विचार केला की वाटतं, देहाबद्दल आपली सारी कल्पना चुकीचीच आहे. देह नश्वर आहे. पण देह जड नाही.

त्या दिवशी नुसता हाताचा स्पर्श झाल्यावर लगेच कुमुदच्या शरीराने एकदम कसे उत्तर देऊन टाकले होते ? क्रियाप्रतिक्रिया ह्या न्यायाने, रामण्णांनी कुमुदच्या हाताला स्पर्श करताच, तिचे शरीर आखडले नाही. परंतु इतके कोमल, मृदू होऊन गेले की जणू

तिचे सारे शरीर रामण्णांच्या मुठीतच सामावले. थंडीचा आनंद लुटण्यासाठी चादरीत स्वत:चे शरीर गुरफटून घेण्या घेतल्यासारखे त्यांना वाटले. जणू काही कुमुदचे सारे शरीर त्यांच्या मुठीतच सामावणार होते.

त्या दिवसाचा तो भरवसा, तो आत्मविश्वास रामण्णांना आजसुद्धा वाटत आहे. त्यांना वाटत होते, कुमुद जितकी दूर आहे तितकीच आपल्या जवळही आहे. एकदोनदा विरोध करून आणि दूर होण्याची इच्छा करूनसुद्धा ती रबराच्या चेंडूसारखी रामण्णांच्या जवळ आली होती.

कुमुद आपल्यावर प्रेम करीत आहे.

म्हणून तर आज तिने आपल्या सत्कारसभेला यायचे कबूल केले आहे. पण का कुणास ठाऊक ! आजचा सत्कार पाहून तिचे हृदय भरूनही येईल.

ह्याच आशेने रामण्णांनी आपल्या मनगटावरील घड्याळाकडे एक नजर टाकली... छे ! कमीत कमी अजूनसुद्धा अर्धा तास अवकाश आहे. ह्या लोकांनी जरा लवकर नको का यायला ?. . .आमच्या लोकांना वेळेच्या बंधनाचे महत्त्वच कळत नाही. . . .असंच बडबडत, कुणाला तरी पाहण्याच्या आशेने रामण्णा खिडकीजवळ गेले.

## ९

मोहनची वाट पाहता पाहता कुमुद भीतीने एकदम थरथरली. रस्त्यात फारशी गर्दी नव्हती. संध्याकाळ झाली होती. प्रत्येकाची घरी पोचण्याची वेळ झाली होती. पण मनुष्य सर्व प्राण्यांहून निराळाच, हा विचार मनात येताच कुमुद गालातल्या गालात हसली. मनुष्याचे नागरिक जीवनाचा अर्थ सृष्टिनियमांच्या विरुद्ध जीवन घालवणे हाच आहे. प्रत्येक प्राणी संध्याकाळच्या वेळी आपल्या घरी जाऊ इच्छितो. घराचा आश्रय घेऊ पाहतो. पण ह्याच संध्याकाळच्या वेळी जो नागरिक घराबाहेर पडतो तो खरोखर एक विक्षिप्त प्राणी आहे. तिचा मोहन तर आणखीच विक्षिप्त आहे.

बापासारखाच मुलगा असतो. तोसुद्धा आपल्या मनानेच सारे करतो मी बोलावलं तर येईल ?. . .येऊ शकतो. . .ही भूक लागल्यावर.. असं बोलत बोलतच कुमुद आत गेली. मनात विचार येताच दुसऱ्यांचा काही एक विचार न करता, तो पूर्ण करण्याचा हट्ट रामण्णांसारखाच.

सुखाच्या किती आठवणी. म्हणून तर ती आजसुद्धा रामण्णांच्या सहवासासाठी आतुर असते. किती वेळा आपण निश्चय केला ? रामण्णा आपल्यावर प्रेम करतात ह्याचा भरवसा नाही. रामण्णा आपला आदर करतात ह्याचा ही भरवसा नाही. त्यांच्या घरात, त्यांच्या मनात आपल्याला मानाचे स्थान नाही. रामण्णांच्या दृष्टीत पश्चात्तापाचे मूर्तिमान प्रायश्चित दिसत आहे. हे सर्व समजूनसुद्धा आपण इथे राहिलो आहोत. रामण्णांच्या जवळ राहूनही आपल्याला त्यांच्यापासून दूर दूर राहायला लागते ही एक कठीण समस्या आहे. . . .तरीसुद्धा आपण इथेच आहोत.

मोहन रामण्णांचाच अवतार ! नाही. रामण्णांबरोबर आपण जे जीवन जगलो, त्या सुखद अनुभवाचे प्रतीक म्हणजे मोहन. म्हणून तिची मोहनवर केवढी ममता आहे. मातृत्वाची ममता निःस्वार्थी असते, असं म्हणतात. पण आपली दृष्टी तशी नाही. हा विचार कुमुदच्या मनात किती तरी वेळा येऊन जातो. मोहन म्हणून आपण मोहनवर माया करीत नाही. परंतु मोहनमध्ये रामण्णांचे दर्शन होते म्हणूनच आपण त्याच्यावर एवढी माया करतो म्हणून सुरुवाती सुरुवातीला तिला मोहनचा उगीचच राग यायचा. बिचारा. दुसऱ्यांनी चुका करायच्या, आणि कित्येकवेळा ती त्याबद्दल मोहनलाच मार द्यायची.

ती गोष्ट तर कुमुद कधीच विसरू शकत नाही. आता तर ते दृश्य तिच्या डोळ्यांसमोर अगदी जसेच्या तसे उभे राहिले. मोहनला कडेवर घेऊन ती उभी होती. समोरच रामण्णा काहीतरी करीत होते. पतिस्वभावानुसार रामण्णा कुमुदला आपल्याकडे आकर्षित करण्याचा प्रयत्न करीत होते. त्यांच्या डोळ्यांतील भाव पाहून, कुमुदला चटकन कळले की ह्यांना आपली भूक लागली आहे तेव्हाच तिने विचार केला . . आता जरा हुशारीनं काम केलं पाहिजे. कुमुद म्हणजे रामण्णांना एक विलासाची वस्तूच होऊन गेली होती. पूर्वीच्या काळच्या वायकांसारखी एक उष्टी पत्रावळच झाली होती ती. हिलासुद्धा काही भावना आहेत, काही हक्क आहेत, ह्याचा रामण्णांना विसरच पडला होता. सावधान राहिलं पाहिजे, असा विचार करून कुमुद रामण्णांच्या शब्दांच्या जाळ्यातून वाचण्याचा प्रयत्न करू लागली. तेव्हा मोहनच्या खोड्या काढल्या. मग मोहनला आपल्या जवळ घेण्याच्या निमित्ताने रामण्णांच्या खोड्या सुरू झाल्या.

त्या दिवशी आपण मोहनला किती मारलं होतं कुमुद विचार करू लागली. का मारलं ? कारण त्याच्यामुळेच तर आपल्या चंचल स्वभावाचा पडदा दूर झाला. रामण्णाच्या हाताचा आपल्याला स्पर्श होताच, आपले सारे निश्चय, धुळीत मिळून गेले. भुकेने व्याकुळ झालेले शरीर थरथर कापत होते. ओठ भिजून गेले होते. छातीत धडधड होत होती. असं वाटलं की आपण बेशुद्ध पडणार की काय. इतक्यात तिला मोहनचे रडणे ऐकून शुद्ध आली. तेव्हा आपण लगेच घाईघाईने आत गेलो.

बिचारा. खरं म्हणजे जे काय झालं त्यात मोहनची काय चुकी होती ? पण त्यावेळी आपण मोहनला किती जोराने थप्पड मारली होती. त्याचं रडणं जोरात सुरू झालं, तसा आपल्याला ही जोर चढला. कदाचित आत लपलेला द्वेष बाहेर आला होता. आपलाच सारा मूर्खपणा. व्यभिचाराची मूर्तीच. हे असे अपमानित जिणं जगायचं. का कुणास ठाऊक, अशाच विचाराच्या उद्वेगाने, तिने रागात येऊन मोहनला मारले होते.

त्या नुसत्या आठवणीनेच कुमुद थरथर कापली. किती मारलं आपण त्याला. जसजसं मारीत होती तसा तसा तिचा राग, जोर वाढतच गेला. शेवटी शेवटी तर तिची शुद्धच गेली होती. तेव्हा रामण्णा तिथं केव्हा आले आणि तिला केव्हा त्यांनी थांबविले हेही तिला कळले नाही. शेवटी तिची थप्पड रामण्णांच्या पाठीवर लागली तेव्हा कुठे कुमुद शुद्धीवर आली, तेव्हा तिने काय पाहिले ? रडणाऱ्या मुलाला एका हाताने धरून दुसऱ्या हाताने, रामण्णांनी, कुमुदचा मारायला वर उठलेला हात पकडून धरला होता.

जर त्या दिवशी रामण्णाच खूप रागावले असते तर ? कुमुदशी भांडले असते तर ? पण रामण्णांनी असे काहीच केले नव्हते. जर ते रागावले असते तर हीसुद्धा खूप भडकली असती. भांडली असती, जोरात ओरडली असती. शेवटी रामण्णांनी जरी तिला चांगलं मारून काढलं असतं, तरी छान झालं असतं ! पण त्यांनी असे काहीच केले नाही. मुलाला उचलून, त्यांनी त्याला उगी केले होते आणि अशी करुण मुद्रा करून उभे राहिले की जणू काही तेच अपराधी होते. एकदा वाटले की असे उभे राहिलेत त्यांनाच एक चांगली ठेवून द्यावी पण त्यांना तसे शांत, चुपचाप उभे पाहून कुमुदच शरमली.

रामण्णांनी म्हटले होते . . "पाहिजे तर मीच ह्याला बाहेर घेऊन जातो." पण कुमुदच्या लक्षातच आलं नाही काही ! तेव्हा रामण्णा फिरून म्हणाले—"माझ्यामुळे तुला इतका त्रास होत आहे ना. मी घर सोडून निघून जातो." शेवटी, प्रश्नाचे उत्तर देऊन मन हलके करण्याची संधी आपल्याला मिळाली, आणि संधी मिळताच, कुमुदने उत्तर दिले,

"तुम्ही कशाला जाता ? तुमचंच घर आहे."

"कुमुद. हे घर जसं माझं आहे तसं तुझं पण आहे."

"माझं कुठलं हे घर ? मी एक निराश्रित तुमच्याकडे आसऱ्याला आले आहे."

रामण्णा विनवणी करू लागले—"कुमुद, कुमुद, अग, असं बोलू नकोस."

"मग कसं बोलू ? माझ्या मुलाला मारायचासुद्धा मला अधिकार नाही, ह्या घरात." बोलता बोलताच कुमुद रडू लागली.

"कुमुद, ह्या घरात तुझाच अधिकार आहे. तुला काय कमी आहे ?"

"मला तुमचं हे घरही नको. आणि अधिकारपण नको." बोलता बोलताच रामण्णांनी तिचा धरलेला हात कुमुदने हिसका देऊन सोडवून घेण्याचा प्रयत्न केला.

"कुमुद." रामण्णांनी तिचा हात सोडला नव्हता... "कुमुद, मला माहीत आहे. तुला काही गोष्टी लागल्या आहेत. तू काही बाबतीत असंतुष्ट आहेस. पण ते सारं दूर करायला मी तयार आहे बघ. जर माझी काही चूक झाली असेल तर. ."

"तुमची चूक ? अय्या ! तुमची कशी हो चूक होईल ? तुम्ही किती समजदार. प्रसिद्ध लेखक साहित्यकार. . तुमची तारीफ करणारे तुमचे इतके लोक..."

"कुमुद, तू अशा प्रकारे बोलतीस त्याला मी काय करू ? घरात आणि तेसुद्धा तुझ्याबरोबर मी कधी खोटी बढाई मारली का ?"

"माझ्याबरोबर तुम्ही कसं ही वागलात तरी त्यात एवढा फरक पडणार नाही कारण मी काय बोलून चालून वाईट चालीची, निराश्रित स्त्री !"

"कुमुद, कुमुद, इतकी कठोर होऊ नकोस बघ. 'वाईट चालीची' हा शब्दसुद्धा तोंडातून काढू नकोस. वाईट चालीचा बाकीनी जर कुणी असेल तर मीच. मला नीट, चांगल्या मार्गावर तूच आणलस बघ कुमुद..."

"मला तुमची आणि तुमच्या मार्गाची, दोघांची जरूरच नाही बघा..." असं म्हणत, रामण्णाचा हात झटकून कुमुद दूर झाली होती.

कुमुदनं हात झिडकारला तसा मोहन बाळ पुन्हा रडू लागला. तो कुमुदकडे जाऊ लागला. आता ही पुन्हा मुलाला बददणार की काय अशी रामण्णांना शंका आली. मुलाला घेऊन त्यांचे हे विचारचक्र चालू होते. तोच मुलगा कुमुदजवळ जाण्यासाठी हट्ट करू लागल. आणि जोरजोराने रडू लगला.

कुमुदसुद्धा आपल्याला आवर घालू शकली नाही. तिने जोराने मुलाला ओढायचा प्रयत्न केला. पण रामण्णांनी मोहनला सोडले नाही. ते म्हणाले—"मी ह्याला बाहेरून हिंडवून आणतो."

"तुम्हाला बाहेर त्याला फिरवून आणण्याची जरूर नाही मुळीच. मीच त्याला बाहेर घेऊन जाते कशी, आणि पुन्हा परत येतच नाही. तुम्ही आणि तुमचं घर, सुखात नांदा..." बोलत बोलतच ती झटकन आपल्या खोलीत गेली. मुलाला खाली जमिनीवर बसवून ती आपल्या सामानांची बांधाबांध करू लागली.

"हूं...कुमुदने श्वास घेतला. जणू कांहीं ती आठवणींच्या लोंढयातून बाहेर आली."

आज तसं घडलं तर कुमुद काय करेल ? बसल्या बसल्या कुमुदला मागच्या आठवणी आल्या, "परत येणार नाही" असं आपण म्हटलं होतं. नंतर काय झालं, कुणास ठाऊक. पण आज तरी आपण इथंच आहोत. रामण्णांच्या घरी नाही... आपल्या स्वतःच्या घरात...ऊंहू तसं नाही, मोहनच्या घरात आपण राहात आहोत. छे, आपण अगदीच वेडया आहोत. फुकटच्या खोटया अभिमानाने आपण असं बोलत आहोत. हे रामण्णांचे घर आहे. आपले पण घर आहे. आणि म्हणूनच हे मोहनचे घर आहे. त्या दोघांच्या तपस्येचे फळ मोहन आहे नाहीतर मोहन कोण ? आज ती असं करणार नाही त्याचं खरं कारण काही निराळंच होतं. हे तिला मानायलाच हवे होते. आज ती अशी का वागत नाही ? ..त्या दिवशी तसं वागायचं तेच कारण होते. रामण्णांच्याबद्दल तिच्या मनात जी भावना होती तेच त्याचे कारण होते.

कुमुदच्या पराजयाचे हेच कारण होते.. हीच रामण्णांच्या बद्दलची तिची भावना. आतापर्यंत प्रत्येक वेळी पराजय तिचाच होत होता. आणि ही बोच तिच्या मनाला एकसारखी लागून राहिली होती.

नऊ वर्षांपूर्वी जो प्रसंग घडला. तिथेच खरं म्हणजे आपला पहिला पराजय झाला. हे कुमुदला चांगले पक्के माहीत होते. "मी ह्याला बाहेर घेऊन जाते. पुन्हा म्हणून परत येत नाही." ही तिची गर्जना म्हणजेच तिच्या पराजयाची पहिली घोषणा होती. का ? तिने पहिल्यांदा असे का म्हटले ? नीटपणे विचार करून तिने तसं म्हटलं होतं ? काही वेगळाच निश्चय करून ? तेसुद्धा नाही. मनात जे होतं ते स्पष्ट स्पष्ट सांगून टाकण्यासाठी ? ऊंहू...हे असले काहीच कारण नव्हते. फक्त एकच कारण होते. ते म्हणजे भय. स्वतःचे भय. रामण्णांचे भय. रामण्णांच्या हाताचा आपल्या हाताला स्पर्श होताच कुमुदला स्पष्टपणे कळले होते...की हा जन्मजन्मांतरीचा संबंध आहे. फक्त एका गोष्टीने तो तोडणे केवळ अशक्यच आहे.

एकदा रामण्णांनीच आपल्याला दुष्यंत शकुंतलेची गोष्ट सांगितली नव्हती का ?

तेव्हा कुमुद म्हणाली होती—"मी जर शकुंतला असते ना. तर त्या दुष्यंताला जवळ फटकूसुद्धा दिलं नसतं ?"

"का बुवा ? त्या दुष्यंताने बिचाऱ्याने काय केले ?" रामण्णांच्या ह्या विचारण्यावर कुमुदला आश्चर्य वाटले होते.

"काय म्हणालात ? दुष्यंताने काय केले ? आणखी काय करायचं ठेवलं होतं ?"
"एकांतात लग्न केले. बायकोला जेव्हा दिवस गेले, तेव्हा विचारलं,. . . मी कुठे तुझ्याशी लग्न केले ? केव्हा लग्न केले ? ह्याचा अर्थ ?"

"त्याचा काय दोष बिचाऱ्याचा. त्याला तसा शापच होता ना."

"वा. वा. कुणाला सांगता ही शेंड्याबुडख्याशिवायची गोष्ट. कालिदाससुद्धा पुरुष होता आणि दुष्यंतसुद्धा पुरुषच."

"पण ही गोष्ट प्रथम लिहिणारा कालिदास नव्हता. ही महाभारतातील गोष्ट आहे."

"मग ह्याचा अर्थ ? अहो. त्याने ही असली गोष्ट निवडलीच कशाला ? लोकं हसणार नाहीत ?"

"का ?"

"का ? कोण मानणार ? लग्नाचीच आठवण राहिली नाही असं सांगणारा हा माणूस कसा होता ?"

"तो एक मोठा माणूस होता."

"बस्. राहू द्या हो."

"तसं का कुमुद ? समजा उद्या मी म्हणालो.—तुझ्याशी लग्न केलेलं मला आठवत नाही. . .तर सगळी लोकं मला वेडा म्हणतील की नाही ?"

"त्यापेक्षा आणखी काही वाईट नाही म्हणाले तर नशीबच म्हणा तुमचं !"

"मग बरोबर आहे की नाही ? मी असं म्हटलं तर लोक मला वेडं म्हणतील. कोर्टात केस लावतील. पण खरं म्हणजे त्या दुष्यंताने तेच केले होते. त्याला लोक मोठा, श्रेष्ठ म्हणू लागले. त्याच्यावर नाटक लिहिलं."

"पुरे, पुरे. . .तुम्हीसुद्धा कसं म्हणता ?"

"नाही, ग. तूच म्हणत होतीस ना. मी शकुंतला असते तर असं केलं असतं !"

"बरोबरच आहे मग. त्या दुष्यंताला बरोबर रस्ता दाखवला असता."

"तसं तू केलं नसतंस हेच दाखविण्यासाठी कालिदासाने हे नाटक लिहिले."

"मी केलं नसतं हे दाखविण्यासाठी ?"

"म्हणजे अग तू शकुंतला असतीस तर. . ."

"तुम्ही काय म्हणता तेच मला कळत नाही."

"असं नाही. इकडे बघ. दुष्यंत-शकुंतलेचे लग्न कसे झाले ? दुष्यंताच्या महालात अनेक सुंदर स्त्रिया होत्या. शकुंतलेला प्रेम-विवाह वगैरे काही माहीत नव्हतं. दुष्यंत सुद्धा तिथे फक्त शिकारीसाठी गेला होता. कण्वांचा आश्रम जवळच आहे, असा विचार करून तो महर्षींना प्रणाम करण्यासाठी गेला होता."

"ती सारी गोष्ट मला माहीत आहे."

"ऐक तरं खरं, त्या गोष्टीतली मजेची बात तर ऐक. तुला समजावून सांगतो. कुणाला कशाची कल्पना नव्हती. पण अकस्मात भेट झाली. भेटीत परिचयाने आकर्षण निर्माण झाले. आकर्षणातून स्नेह- आणि स्नेहातून प्रेम. . ."

"आणि शेवटी लग्न झाले."

"हो. हे सर्व थोड्याच दिवसांत झाले."

"पण हे सारं मला ऐकवण्यात काय अर्थ ?

"ह्यात अर्थ आहे कुमुद, परिचयाशिवाय काही एक विचार न करता, कमलीही जरूरी नसतांना, मोठयांच्या मदतीशिवाय हे लग्न झाले का ?"

"दुष्यंत एक दैवी पुरुष होता."

"वा, वा, आणि शकुंतला काय कमी होती ? दोघांचीही जबाबदारी होती. दोघांचे प्रेम किती सहज, किती नैसर्गिक होते. जगात ते दोघे कुठेही गेले. असते तरी एक ना एक दिवस त्यांचे मीलन नक्कीच झाले असते. हेच दाखविण्यासाठी कालिदासाने हे नाटक लिहिले. त्यानंतर मारीच ऋषींच्या आश्रमात जेव्हा तिने दुष्यंताला पाहिले तेव्हा तिची स्थिती अशी झाली. जणू काही तिने प्रथमच त्याला कण्व मुनींच्या आश्रमात पाहिले होते."

तेव्हा कुमुदने म्हटले होते.—"अहो, गोष्टीत काय वाटेल ते लिहितात. माझा त्यावर विश्वास नाही !" तिला वाटलं, की ह्यांच्यावर विश्वास ठेवण्याचंच प्रायश्चित आपल्याला मिळालं. शकुंतलेचे वागणे अगदी नैसर्गिकच होते. . .ही गोष्ट तिला पटली होती."

रामण्णांनी ज्या प्रकाराने तिच्याशी लग्न केले होते, त्या प्रकाराने पाहिले तर त्यांना कुमुदशी संसार करण्याची कधीच इच्छा नव्हती. ते आपणहून कुमुदकडे आकर्षित झाले होते. त्याशिवाय सरलाताईही एकसारखं तेच सांगत होती. म्हणून रामण्णांनाही लग्नाला हो म्हणावे लागले. तरीमुद्धा जोपर्यंत सरलाताई जिवंत होती तोपर्यंत रामण्णांनी उघड-पणे लग्नाचा प्रस्ताव मांडला नव्हता. पण त्यांना कुमुदच्या सहवासाची इच्छा होती. सरलाताईच्या मृत्यूनंतरही रामण्णांनी लग्नाचा विषय आपणहून काढला नव्हताच. पण

शेवटी कुमुदने जेव्हा आपल्याला दिवस गेल्याचे सांगितले तेव्हा त्यांनी लग्न करायचे कबूल केले. ह्याचा अर्थ काय ? रामण्णांना स्वतःला लग्न करायचेच नव्हते. त्यांनी जाणूनबुजून आपल्याला फसविले. अशा माणसाबरोबर संसार कसा करायचा ? पुन्हा त्यांनी कुमुदवर लग्न करून उपकारच केले होते. जर तिने लग्नाला नकार दिला असता तर स्वतंत्रपणे ती राहू शकली असती. जर लग्न झाले नसते तर आज तिच्यावर कुणाचाही अधिकार नसता. आता ती एक विवाहित पत्नी आहे. आता ती एक हक्काची भोग्य वस्तू आहे. जर लग्न झाले नसते तर ? भोग्य वस्तू मिळविण्यासाठी त्यांना याचना करावी लागली असती !

जाऊ द्या. ते सारं ठीक आहे. आपल्याला कुणी अडवलं तर नव्हतं ना ? लग्नाला हो म्हणायची तरी आवश्यकता होती ? आणि आता हो म्हटल्यावर रामण्णांची निंदा कशी करायची ! निंदेची गोष्टच निघाली कशाला ? हे स्त्रीचे नशीब. शकुंतलेची ही कथा. . बोलता बोलताच कुमुदने दीर्घ सुस्कारा टाकला. कुठल्या दैवी शक्तीने ती रामण्णांच्या वश झाली होती ? ही कुठलाही प्रयत्न करो सगळं व्यर्थच. जरा बुद्धी एकीकडे ओढेल तर हृदय दुसरीकडे ओढेल. ती रामण्णांपासून दूर राहण्याचा जितका प्रयत्न करीत होती, तितक्याच वेगाने ती रामण्णांच्याकडे ओढली जात होती.

म्हणून ती नेहेमी भीत असे. रामण्णांची भोग्य वस्तू बनण्यातच तिला संतोष होत होता. पण जेव्हा आपल्याला भोग्य वस्तूच समजली जाते तेव्हा मात्र तिला असहाय, बेचैन वाटू लागे.

जितके ती रामण्णांवर प्रेम करीत होती, तितकेच ते जर हिच्यावर ? . . .नाही. तिला हा भरवसा नव्हता. म्हणूनच म्हणूनच भीती वाढत होती. की आपण रामण्णांच्या ताब्यात जाणार नाही का ?

रामण्णांच्या सहवासाने तिची भीती वाढतच होती. त्यांचा स्पर्श तर . . म्हणूनच त्या दिवशी म्हटले होते. . "आता पुन्हा येणार नाही."

हो, आणि फिरून आलोच ना ? आलो. आणि पुन्हा इथेच घर–संसार सुरू केला. मुलाचे पालनपोषण सुरू केले.

कुमुदने एकदम आपली दिवास्वप्ने थांबविली. मनगटावरील घड्याळ पाहिले,... "हे काय ? मी किती सांगितलं होतं. तरीसुद्धा मोहन आला नाही. आता सभेचे लोक बोलवायला आले तर ? छे ! कसा मुलगा आहे. . . कुठे मस्ती करायला गेला काही पत्ताच नाही." बोलता बोलताच ती उठून दरवाज्याकडे गेली.

## १०

"हे काय ? काही दिसत नाही ? रामण्णा खिडकीतून बाहेर पाहात होते. दुसऱ्याच क्षणी त्यांना आश्चर्य वाटले. रस्ताभर जनावरं हिंडत होती. त्यांच्या मागे गुराखी मुलं गडबड करीत चालली होती. तिथे कुणी दोन माणसे येत होती. एक उभ्या-उभ्या हसत होता. रस्त्याच्या एका बाजूचे कावळे एक थवा बनवून पंख पसरवीत त्या पलिकडच्या कावळ्यांकडे जात होते. तो कुत्रा त्यांना पकडण्याच्या प्रयत्नात भुंकत होता.. इतके सगळे पाहूनसुद्धा रामण्णा म्हणाले—"छे, काही दिसत नाही बुवा !"

माणसांचे जग एवढेच आहे म्हणूनच म्हणतात—मनुष्याला जे हवंय, तेच तो पाहतो. नाहीतर त्याला काहीसुद्धा दिसत नाही...हुं...काही तरी गुणगुणतच रामण्णा खोलीत चकरा मारू लागले. खोलीभर चक्कर मारीत, गुणगुणत ते पुन्हा खिडकीजवळ उभे राहिले. ". .कंडूयमानाम्. . ." गुणगुणत ते स्वतःशीच हसले .. "काही असू दे. आपली लबाडी लक्षात आली ." आणि पुन्हा हसू लागले. ही त्यांची एक स्वतःची संवय होती. जेव्हा जेव्हा मनातले विचार विसरावेसे वाटतात तेव्हा तेव्हा ते संस्कृतचे श्लोक गुणगुणू लागतात. त्यातसुद्धा मनातले विचार पुन्हा पुन्हा बाहेर काढून टाकण्यासाठी ते कालिदासाचा एक श्लोक पुन्हा पुन्हा गुणगुणत. आतासुद्धा तोच श्लोक बरोबर सुरात ते गुणगुणत होते.

> कार्या सैकत–लीन–हंस–मिथुनास्रोतोवहा मालिनी।
> यादास्तामभितो निषण्ण हरिणा गौरी गुरोः पावनाः।
> शाखालंबित वल्कलथ च तरोर्निर्मातु भिच्छाम्यधः
> पार्श्वे कृष्णमृगस्य वामनयमां कंडूयमानां मृगीं ॥

त्या श्लोकात एक प्रकारचे शांत वातावरण आहे हे रामण्णांना माहीत होते. मालिनी नदीच्या तटावर वाळूत हंस–हंसिनी मैथुनमग्न आहेत. ईश्वराचे चरणचिन्ह दिसत आहेत. जवळच एक झाड आहे. त्यावर वल्कले वाळत टाकली आहेत. त्या झाडाच्या मुळापाशी एक कृष्ण मृग आहे. त्याला एक हरिणी चाटत आहे.

शाबास ! कालिदासाने शकुंतलेच्या आठवणीने तरफडणाऱ्या दुष्यंताचे किती सुंदर चित्र रेखाटले आहे. त्या श्लोकाच्या वातावरणानुसार ही अर्थ आणि शब्दयोजना आहे. ती किती सौम्य आणि शांति सूचक आहे. का ? माहीत नाही. तीच तर कवीची प्रतिभा आहे. कवि–कालिदास मनावर केवढा प्रभाव करतो.

हा श्लोक गुणगुणण्याची सवयही रामण्णांना अशाच एका घटनेपासून झाली. ती घटना ते कधीच विसरू शकणार नाहीत.

केव्हा बरे ? सात आठ वर्षांपूर्वीची गोष्ट असेल. एक दिवस ते असेच खिडकीजवळ वाट पाहत उभे होते. दुसऱ्या दिवशी, तिसऱ्या दिवशी सुद्धा . . आता आठवत नाही नक्की. त्यावेळी त्यांना काळ इतका लांबलचक वाटू लागला. . . अणू वर्षे उलटून गेली. कुमुद मोहनला घेऊन घरातून निघून गेली होती जेव्हा ती निघाली होती, तेव्हासुद्धा रामण्णा असेच खिडकीजवळ उभे होते. कुमुद परत आली नाही. कित्येक वेळा त्यांच्या मनात आले – जाऊन कुमुदला पाहून यावे. पण आपण जाऊ आणि तेवढ्यात ती येईल ह्या संशयाने ते तिथल्या तिथेच उभे राहिले. कुमुद आली नाही. ती पुन्हा आपल्या आत्याबाईकडे गेली असेल ह्या विचाराने रामण्णांना जरा शांत शांत वाटलं. एकदा तर रात्री घरात दिवासुद्धा नव्हता दोन दिवस रामण्णांनी काही खाल्लसुद्धा नाही. कधीं कधी वाटे, जाऊन कुमुदची क्षमा मागावी. तिला पुन्हा घरात बोलवावं. कधी वाटतं. आपण किती काही करा. पण कुमुद काही यायची नाही

रामण्णांना कळून चुकलं, की दोष आपलाच आहे. ज्या अटीवर कुमुद आपल्या घरात राहायला तयार होती तीच अट मोडून, तोडून टाकण्याची चूक आपण केली. पण ह्याआधी ती अट तोडून टाकण्यासाठी रामण्णा किती आत्मविश्वासाने तयार झाले होते.

त्या दिवसाची आठवण आल्यावर रामण्णांना फिरून हसू आले. आज ते ४५ वर्षांचे आहेत. अर्थात तेव्हा ते सदतीस अडतीस वर्षांचे होते. तरीसुद्धा त्या दिवशी एखाद्या अविवेकी तरुणासारखे ते वागले.

"कामी स्वतः पश्यति !" कदाचित अशाच अविवेकी तरुणाला पाहून कालिदासाने असे म्हटले असेल. त्या दिवशी, मोहनला घ्यायला जेव्हा रामण्णा पुढे झाले तेव्हा कुमुदला त्यांच्या हाताचा स्पर्श झाला. तिच्या डोळ्यात आनंद, हास्य पाहून रामण्णा उत्साहित झाले होते. पण लगेच तिने विरोध केला. आणि खोलीत जाऊन आपले सामान बांधू लागली. आता काय करील कुणास ठाऊक. म्हणून त्या अर्धवट उघडलेल्या दारातून त्यांनी डोकावले. तेव्हा कुमुद रामण्णांच्या फोटोसमोर उभी असलेली दिसली. कोण जाणे काय करील ही ? जरा पाहू तर खरं, ! आपला फोटो खाली टाकून पायाखाली तुडवून टाकील. असा विचार करून, रामण्णा भीत भीतच त्या क्षणाची वाट पहात होते. कुमुदने तो फोटो हातात घेऊन एकदम त्यावर आपले मस्तक टेकविले. हे दृश्य पाहून रामण्णांच्या हृदयात एक नवचेतनाच निर्माण झाली. कुमुद खरं म्हणजे आपल्यावर किती प्रेम करीत आहे. तिचा काही तरी गैरसमज झाला आहे. म्हणून तर आपल्यावर रागावली आहे. . . . आपण तो गैरसमज, दूर केलाच पाहिजे.

त्यावेळी आपण किती वेडे होतो ! तिचा काय गैरसमज होता ते त्यांनी शोधून काढले. तेव्हा त्यांना केवढा आनंद झाला. केवढा अभिमान वाटला. तेव्हापासून रामण्णा स्वत:ला जणू बृहस्पतीचा अवतारच समजू लागले.

'कामी स्वतः पश्यति !'

बरोबर आहे. अगदी त्याप्रमाणेच रामण्णांनी निर्णय घेतला होता. कुमुदच्या रागाचे हेच कारण असेल, कदाचित. . .की रामण्णांनी तिच्या अटीचे अक्षरश: पालन केले होते. कुमुद रामण्णांवर किती प्रेम करते. . . .रागात ती काहीतरी म्हणाली आणि तेवढंच रामण्णा घेऊन बसले. दांपत्यजीवन एक वयोधर्म आहे. त्याची इच्छा म्हणजे पाप किंवा अहित नाही. स्त्री–पुरुषभेद सृष्टिनियमांची एक योग्य व्यवस्था आहे. वयोधर्मासाठी तो भेद नाही. अशा प्रकारे महान ज्ञान्याप्रमाणे ते एका दुसऱ्या वात्स्यायनाप्रमाणे तर्क करून एका सिद्धांतापर्यंत पोचले होते.

आता, सात आठ वर्षानंतर वाटू लागलं . त्या दिवशीचे आपले विचार, वागणे दोन्ही एखाद्या निर्लज्ज माणसाच्या वागण्याहूनही अधिक होतं. त्या आपल्या निर्लज्जपणाची आपल्याला योग्यच शिक्षा मिळाली होती. सकाळपर्यंत कुमुद आपल्या खोलीचा दरवाजा तसाच उघडा ठेवून झोपली होती. पण आपल्याला तिकडे डोकावण्याचीही हिम्मत झाली नाही. अशी त्या दिवशी त्यांना शिक्षा मिळाली.

कुमुद असं काही म्हणेल, म्हणू शकेल असं रामण्णांना स्वप्नात सुद्धा खरं वाटलं नाही. त्यांना जरी नुसती कल्पना आली असती तरी ते तिच्याशी एक अक्षरही बोलले नसते.

तर मग काय झालं ? "कामी स्वतः पश्यति" ! कामांध बनून आपण हवा तसा समुद्र पोहून पार करून गेलो होतो. त्या त्यांनी तिच्याशी बोलणे सुरू केले.

"कुमुद !"

रामण्णांकडे कुमुदने एकदा चकित होऊन पाहिले. आणि मग ती गालातल्या गालात हसली. त्या हसण्यात, चेहेऱ्यावर सौम्यता दिसली नाही. "कुमुद"

"आत या ना"

"कुमुद, कुमुद, मला वाटलं, जे होऊन गेलं, ते तू सारं विसरून जाशील. तसं पाहिलं तर ह्यात माझीच चूक होती. मी कबूल करतो."

"आपल्यासारखे प्रगतीवादी ते चूक कसं मानतील ?"

"हं. . .काय म्हणालीस ?"

"तसं नाही हो. जुन्या विचाराचे लोक असं म्हणू शकतात पण तुम्ही .

"काय ? कोणती गोष्ट ? तू कशाबद्दल बोलतेस ?"

"वेश्यांशी लग्न करणे"...

कुमुद"...चाबकाचा मार खाल्ल्याप्रमाणे रामण्णा किंचाळून उठले.

"ज्या स्त्रीवर प्रेम नाही आणि तिच्याशी शरीरसंबंध ठेवला तर तो वेश्येशीच शरीरसंबंध ठेवल्याप्रमाणे आहे...अस तुम्हीच...

कुमुद, कुमुद, असलं बोलून तू मला उगीच का शिक्षा देतेस ?

जर मी तुझ्यावर प्रेम करीत नव्हतो तर तुझ्याशी लग्न केलं असतं का ?" उगीच निरर्थक गोष्टींचा विचार करीत बसतेस, बघ."

"मला माझं मूल हवं होतं. पण म्हणून मी तुम्हाला त्याबद्दल जबाबदार धरत नाही. आता तरी झालं का समाधान ?

"कुमुद, कुमुद,...कसला गैरसमज घेऊन बसली आहेस तू ? काय काय विचार तुझ्या डोक्यात भरले आहेत कुणास ठाऊक !"

"मी काही चुकीचा विचार केला नाही बघा. तुम्ही आता ह्यावेळी का आलात ह्याची मला चांगली कल्पना आहे. बघा...चुकीचं आहे का, मी काय म्हणते ते ? पण एक गोष्ट आहे तुमच्या तृप्ती-समाधानात माझा अडथळा नाही बघा. आता ह्या वेळी मी तुमची लग्नाची बायको आहे....तुम्ही त्याच अधिकाराने इथे आला आहात ? का तुमच्यावर फिदा झाली एक प्रेयसी म्हणून तुम्ही इथे आला आहात ? तुम्ही जसा म्हणाल तसा अभिनय करायला मी तयार आहे.

एवढं बोलून कुमुदने दिवा विझविला. तेव्हा रामण्णांना कळून चुकले की अंधार-सुद्धा किती भयानक असतो. थांबले तरी भीती वाटते आणि पळून गेले तरी भीतीच. आता आपल्याला इथून पळूनसुद्धा जाता येणार नाही. ह्या विचारानेच रामण्णा हताश होऊन गेले.

त्यानंतर कुमुद घर सोडून जाईपर्यंत रामण्णांनी तिला आपलं तोंडही दाखवलं नाही.

रामण्णा विचार करू लागले–कुमुदने म्हणटले होते...तुम्ही माझ्यावर मुळीच प्रेम करीत नाही. मग आपण तिचे समाधान करीत म्हणायचे.. " नाही, कुमुद, माझं तुझ्यावर प्रेम आहे..." असं म्हणायला हवं होतं का ? हे तर फक्त शब्दच झाले. त्या वेळच्या तिच्या मानसिक स्थितीमध्ये ती ह्या शब्दावर विश्वास करू शकत नव्हती. ती विश्वास करो अथवा न करो...त्याचा विचार आपण कशाला करायचा ?"

त्यावेळी आपण कुमुदवर प्रेम करीत होतो ?

आजसुद्धा आपण कुमुदवर प्रेम करीत आहोत ? रामण्णांनी जोराचा श्वास घेतला. पुन्हा त्यांनी खिडकीतून बाहेर डोकावलं. . . तोंडाबर घाम आला नव्हता तरी एकदा सारा चेहेरा पुसून टाकला. हळूच पाऊल टाकून, खुर्चीवर बसून त्यानी समोरच्या भिंतीकडे पाहिले. "दोघींबर एकाच वेळी प्रेम करणे ह्यात ईमानदारी आहे. ते शक्यही आहे. जर तुला ही गोष्ट मान्य असेल तर सरला, मी ह्या प्रश्नाचे उत्तर देतो. रामण्णांनी भिंतीवर टांगलेल्या सरलाच्या फोटोला सांगितले. नंतर त्यांनी सरलाच्या फोटोकडे नीट लक्ष देऊन पाहिले. आणि नंतर निराशेने मान हलविली.

"तू उत्तर देऊ शकत नाहीस ?"

"हूं . . . " असं म्हणून श्वास सोडीत रामण्णा विचारात बुडून गेले.

"शक्य आहे की नाही हे तू सांग, ह्यात इमानदारी आहे की नाही हे मी सांगेन . . . " बोलता बोलता त्यांनी पुन्हा एकदा सरलाच्या तसबिरीकडे पाहिले. ईमानदारी-बद्दल आता त्यांना धैर्य आले होते. सात आठ वर्षांचा अनुभव होता. त्या अनूभवा-बरोबर धैर्यसुद्धा आले होते. एकाच वेळी दोघींच्यावर प्रामाणिकपणे प्रेम करणे शक्य आहे. हा धडा रामण्णा अनुभवाने शिकले होते.

आता आपण कुमुदवर प्रेम करीत आहोत ह्यात रामण्णांना काहीच संशय वाटत नव्हता. पण आता हे कुणासमोर सांगायचं ? कारण मी तुझ्यावर प्रेम करतो असं सांगितल्यावर कुमुद आपल्यावर विश्वास ठेवील ह्याची रामण्णांना खात्री नव्हती. शिवाय असं तिला सांगून तिचं समाधान होईल अशीही त्यांची खात्री नव्हती. फक्त आपल्यावरच त्यांनी प्रेम करायला हवे अशीच आशा बाळगणाऱ्या स्त्रीचे ह्या उत्तराने समाधान कसे होणार ?

तरीसुद्धा, कुमुद जेव्हा दुसऱ्यांदा घर सोडून गेली, तेव्हा रामण्णांना समजून चुकलं · · की आपलं कुमुदवर प्रेम आहे. तेव्हासुद्धा खिडकीतून बाहेर पाहताना, त्यांना वाटले– "आपल्याला काहीच दिसत नाही" आता दुसऱ्यांदा पाहिल्यावर असे वाटले की काहीतरी दिसत आहे. तेव्हा कित्येक वेळा पाहिल्यावर काहीसुद्धा दिसले नव्हते. वास्तविक शून्यता आत–बाहेर पसरली होती. असं वाटलं, नजरेत कुमुदच समावलेली आहे. नजरेतच नाही, मनातच म्हणायला हवे. कारण मन नाही तर कोणतीही वस्तु डोळयांना दिसतच नाही. त्या दिवशी रामण्णांना जो अनुभव आला त्यावरून तरी त्यांना असेच वाटले की आपण कुमुदवर प्रेम करीत आहोत. पण पुन्हा मनात आणखी एक विचार डोकावत होताच की सरलावर प्रेम करणारा आता कुमुद-वर प्रेम करीत आहे. ही आत्मप्रवंचनाच नाही का !

खरं म्हणजे ती आत्मप्रवंचना नव्हती. ह्या एकाच अनुभवाने त्यांना पूर्ण विश्वास झाला होता. कुमुदचा वियोग झाल्यावर, कशासाठी कुणास ठाऊक रामण्णा एक कादंबरी लिहीत होते. लिहिताना त्यांना वाटत होते, कुमुद आणि सरला. दोघी आपल्या जवळच आहेत. त्यांच्या सहवासाची इच्छा म्हणून ते तास-न्-तास लिहीत बसत. काही का असेना. एक दिवस ती कादंबरी लिहून पूर्ण झाली. एक एकीला वाचून दाखविली. त्या दोघींना पसंत पडली. म्हणूनच की काय ती कादंबरी लवकरच छापून तयार झाली. वा ! टीकाकारांनी त्या कादंबरीची किती प्रशंसा केली होती. त्या दिवशी ग्रंथालयात अनेक मासिकांतील लेख वाचून रामण्णा धावतच घरी आले होते

आल्या आल्याच ते म्हणाले– "कुमुद, कुमुद, माझ्या त्या कादंबरीबद्दल . . ." पण मग एकदम चकित हैराण होऊन उभे राहिले. कुमुद कुठे होती ? कुमुद घर सोडून निघून गेली होती. हे रामण्णा विसरूनच गेले. पण तरीसुद्धा त्यांनी आपल्या आनंदात वाटेकरी करून घेण्यासाठी कुमुदला हाक मारली होती. आता, त्या प्रश्नाचे उत्तर होते- "रामण्णा, कुमुदवर प्रेम करीत होते." रामण्णांना त्याबद्दल आता काहीच आश्चर्य वाटले नाही. कधी कधी ते आपणच स्वतःशी विचार करीत. बायको आणि मुले ह्या दोघांवर निःस्वार्थ प्रेम करू शकतो तर मग दोन बायकांवर त्याचप्रमाणे प्रेम का नाही केले जात ? ह्याचा निर्णय रामण्णांना किती तरी वेळ घेता आला नाही. बायकोबरोबर शारीरिक संबंध असतो. ही ह्या तर्कात एक अडचण होती. पण रामण्णांनी त्याला चुकीचे म्हटले होते. पति–पत्नींचे प्रेमाची मर्यादा बिछान्यापर्यंतच असे समजणे चुकीचे आहे. हे रामण्णांचे पक्के मत आहे. प्रेमाची लक्षणं काही निराळीच असतात. प्रेम आणि शारीरिक ह्यांचा निकटचा संबंध मानला तर वेश्यांच्या-बद्दल समाजाची तिरस्काराची भावना राहणार नाही. तर मग नवरा–बायकोच्या मध्ये शरीरसंबंध महत्त्वाचा नाही असे म्हणू शकतो ? जर शरीर संबंध महत्त्वाचा नाही तर कित्येक समाजात त्याचा अभाव किंवा अयोग्यता, लग्न मोडण्याचे कारण होतो. तर मग ? एक दिवस रामण्णा ह्या कोड्यातूनही सुटले. शारीरिक संभोग–ही स्त्री–पुरुषांना निसर्गाने दिलेली एक जबाबदारी आहे. एका उद्देशासाठी सोपविलेली जबाबदारी. त्या उद्देशाचे ज्ञान नसेल तर तो कमी दर्जाचा होतो. त्या उद्देशाला एक कर्तव्य समजले तर तो एक स्वाभाविक धर्म होतो. तो उद्देश, दुसरा तिसरा कुठला नसून . . . निसर्गाच्या नियमांचे पालन करणे हाच आहे. निसर्ग चिरंतन तरुण आहे. त्याला म्हातारपण माहीत नाही आणि त्याला मृत्यू पण नाही. मृत्यूला खोटं ठरविण्या-साठी, म्हातारपणाची कात काढून टाकल्याप्रमाणे, नेहेमी जुन्यांना नवे नवे अंकुर फुटतात. ती जबाबदारी, प्राण्यांमध्ये, स्त्री–पुरुषांमध्ये वाटली गेली आहे. म्हणून काम–तृप्ती कोणत्याही स्त्रीपासून होऊ शकते परंतु निसर्गाच्या तृप्तीसाठी जिच्या

बरोबर आपला विवाह झाला, मोठ्या प्रेमाने विवाह झाला तीच स्त्री हवी. काही का असेना, प्रेमात आणि काम-तृप्तीमध्ये सहज संबंध नाही.

पण मग, रामण्णांचे आणि कुमुदचे संबंध पाहिले तर? कुमुदने रामण्णांना कामवासनेच्या दृष्टीनेच आकर्षित केले होते हे खरेच आहे . . . व्यवहार पाहूनच त्यांनी कुमुदबरोबर लग्न केले होते.

हे सारे खरे असले तरी, आज कुमुद समोर नसली तरीसुद्धा रामण्णांना आपल्याकडे ओढून घेत आहे, केवळ तिच्या सहवासानेच रामण्णाना समाधान मिळत होते. एका वर्षाहून जास्त काळ निघून गेला . . . कुमुदचा सहवास, तिच्याशी गप्पागोष्टी . . . इतकंच काय पण तिच्याशी भांडायला सगळ्यात किती आनंद वाटतो. पण आता ह्या सर्वांचा विचार करून काय फायदा ?

शेवटी कित्येक महिन्यानंतर रामण्णांचा ह्या चर्चेत विजय झाला. तोपर्यंत कुमुद दुसऱ्यांदा घरी आली होती. का ? तिच्याशी कसे वागले पाहिजे ? पुन्हा रामण्णांचे अवसान गळून गेले होते. आजसुद्धा त्यांची दशा तशीच आहे. त्यांना वाटले –एकदा कुमुदशी सगळं बोलून मन मोकळं करावं, तिला सगळ्या गोष्टी समजावून सांगाव्या. . . . मग सारं जग जिंकल्यासारखेच ! पण तरी कुमुदशी बोलण्याचं त्यांना धैर्यच झाले नाही. ती पुन्हा घर सोडून जाईल अशी भीती त्यांना वाटत होती.

मनगटावरील घड्याळ पाहून रामण्णा खुर्चीवरून उठले. सभेला जायला उशीर झाला. कुमुदबरोबर मोहनसुद्धा आला तर किती छान होईल. पण अजून हा मुलगा घरी आलेला दिसत नाही. . . . ह्याच शंकेने ते पुन्हा खिडकीतून डोकावू लागले.

## ११

दरवाज्याजवळ उभ्या राहिलेल्या कुमुदला मोहनची झलकसुद्धा दिसत नव्हती. का ? सकाळपासून एकसुद्धा शुभ शकुन दिसला नाही. तसं पाहिलं तर काही वाईटसुद्धा झालं नाही. काहीतरी कुठेतरी वाईट घटना घडली आहे. काहीतरी अशुभ घडणार आहे. अशी भीती मनाच्या कोपऱ्यात दडी मारून बसली होती. . . .कधी कधी तीच भीती वर उसळी मारून उठे. मधूनच विचार येत होता, बाहेर जावे की नाही ? मोहन लवकर आला तर बरे ! आपणसुद्धा अगदी बावळटच आहोत. मोहन येईलच आता

नक्की. उगीचच आपण घाबरून जातो. मुलांच्या बरोबर खेळण्यात दंग झाला असेल. पण तरीसुद्धा लवकर आला असता म्हणजे बरं झालं असतं. हात, पाय, कपडे...सारे घाण करून येईल. आणि मग नंतर म्हणेल, "मी पण येतो तुमच्या बरोबर !"... चांगलाच हट्ट धरून बसेल. बरं आहे, जाऊ दे. असं कोणतं मोठं काम आहे ? वेळेवर पोचलेच पाहिजे असं कुठे बंधन आहे ? सभेची सारी व्यवस्था तर आमच्यासाठीच आहे. सगळा कार्यक्रम तर आमच्यासाठीच आहे.

"आमचे, आमच्यासाठी !"

त्या दिवशीच्या समारंभात आपल्याला बोलावले म्हणून कुमुदला जरा विचित्रच वाटले. तिने मनाशी विचार केला—

"वेडे, तुझा काय ह्याच्याशी संबंध ? सभेची योजना रामण्णांच्या सन्मानासाठी होत आहे !" आपण रामण्णांची पत्नी म्हणून समारंभाला जात आहोत. नवऱ्याचा सन्मान पाहून आपल्याला आनंद वाटणार ? का मत्सर वाटणार ? अशा समारंभांना बायकोला आमंत्रण देण्याची एक प्रथाच असते. कुमुदला अशा सभांना कधी जावेसेच वाटायचे नाही. बायकोजवळ स्वाभिमान नावाची जर चीज असेल तर तिने कधी अशा सभांना जाऊच नये..असेच ती नेहेमी म्हणत असे. नवऱ्याचा सन्मान चाललेला असतो. पण त्या प्रत्येक क्षणी लोक मात्र त्याच्या शेजारी बसलेल्या बायकोकडेच पाहत राहतात. त्यातील काही मंद स्मित करीत असतात. काही जणं जवळच बसलेल्या लोकांशी कुजबुजत असतात. आणि त्या बाईला मात्र अगदी बेचैन बेचैन वाटते. तेव्हा वाटते अशा सभांना जाऊच नये....पण एवढं समजूनसुद्धा आज ती सभेला जायला तयार झाली होती. त्याचे कारणही कुमुदला माहीत होते. संचालकांनी तिला किती विनंती केली होती. विनवणी केली होती...."आम्ही आपल्याला एक विनंती करतो. आपण आमची प्रार्थना मोडू नका. आपला सत्कार करताना आम्ही आमचाच सत्कार करून घेत आहोत..." त्यांच्या, आपण, आपले ह्या शब्दांच्या प्रयोगाने असे वाटत होते जणू दोघांचाही सन्मान होत आहे. परंतु दोघांचा नाही, हे कुमुदला माहीत आहे. आणि रामण्णांनाही माहीत आहे. ...लोक जास्तीत जास्त आपल्याबद्दल काय म्हणणार...हेच, ह्या रामण्णांच्या पत्नी आहेत. बिच्चारे, त्यांना काय माहीत ?

कुमुदला वाटलं, जणू काही आपल्याला कुणी तरी चिडवतंच आहे. ती मनाशी पुटपुटली– "त्यांना काय माहीत. एके काळी मीच रामण्णांच्या साहित्याची एकमेव प्रेरणा होते." जे लोक स्वतः पशूसारखे जीवन जगतात ते दुसऱ्याबद्दलही तसेच [illegible]जतील तर त्यात त्यांचा काय दोष ? कुमुदला माहीत होतं...सुशिक्षित–सुसंस्कृत कुटुंब कसे जगते ? दिवसभर नवरा कचेरीत काम करतो. किंवा नोकरीच्या काळजीत

असतो....दमल्या भागल्यावर घराची आठवण होते. पुन्हा खाऊन पिऊन हॉटेलात मजा करायला जायचे. थकून गेल्यावर पुन्हा घरी झोपायला जा....जरूर वाटली तर मनोरंजनासाठी सिनेमा. आणि पुन्हा सेक्ससाठी घर. प्रेम करायची इच्छा झाली तर पार्क वगैरे ठिकाणी परक्या स्त्रिया आहेतच. नवरा-बायकोची संभाषणे म्हणजे भांडणेच. शरीरसंबंधाची इच्छा झाल्यास बिछाना ...केवळ लग्न झालं म्हणून मुलांना जन्म द्यायचा, घर काम करायचं...मग नवऱ्यानं उपेक्षा केली तरी काय करणार ? छोटीशी, कमी वयाची बायको पतीच्या जवळ, आई किंवा बहिणीसारखी दिसते. शिकलेली किंवा न शिकलेली सगळ्या बायकांचे हेच नशीब. तसं पाहिलं तर अशिक्षित, अडाणी बायकाच खऱ्या सुखी. त्या कष्ट करतात. स्वतःचं पोट भरतात आणि आपल्याला पाहिजे तसा नवरा निवडून त्याच्याबरोबर राहतात.

रामण्णांची एक गोष्ट आठवून कुमुदला हसूच आले. त्याच गोष्टीची चर्चा चालू असताना रामण्णा आवेशात येऊन म्हणाले होते, "स्त्रियांना आपले व्यक्तित्व दाखविण्या-साठी योग्य पौरुष हवे." तेव्हा हे ऐकून कुमुद जोरात हसली होती. क्षणभर रामण्णांना काहीच समजले नाही. मग त्यांच्या लक्षात सारे आले. तेव्हा दोघांची हसता हसता पुरेवाट झाली.

कुमुदने एक दीर्घ सुस्कारा सोडला. कोणे एके काळी आपली रामण्णांशी किती आत्मीयता होती ह्या विचारानेच तिला समाधान मिळाले....म्हणूनच तिने दीर्घ सुस्कारा सोडला होता.

ती आत्मीयता कशी होती ? आपल्याला दिवस गेलेत हेसुद्धा कुमुदच्या लक्षात आले नाही. कित्येक वेळा त्या विचारानेच ती घाबरून जाई. एकदा तर ती आठवण झाल्यावर कुमुदचे सारे शरीर भीतीने थरथरून निघाले होते.

त्यावेळी मोहन तिच्या पोटात वाढत होता. आता ही काही नवीन गोष्ट नाही हे कळूनसुद्धा तिला एक प्रकारची भीतीच वाटत होती. स्त्रीच्या बाबतीत हे स्वाभाविकच आहे. मुलाला जन्म देण्यातच स्त्रीत्वाची सफलता आहे...वगैरे वगैरे गोष्टी सांगून रामण्णांनी तिला दिलासा दिला होता. पण तरीसुद्धा तिला भीती वाटत होती आणि का वाटणार नाही ? बाहेरून कचऱ्याचा एक कण किंवा काट्याचे एक टोक शरीरात घुसले तर शरीराला केवढे कष्ट होतात. काय आहे आणि काय नाही ह्याचेच कुमुदला भय वाटत होते. मुलगा होणार की मुलगी ह्याचे भय कुमुदला वाटत नव्हते. पण काही-तरी निश्चित रूप आहेच हे भय होतेच. पुन्हा ह्याहूनही आणखी एक भीती होती. पुन्हा आपण ह्यातून वाचणार की नाही ? काहीतरी गडबड झाली आणि आपणच खलास झालो तर ? हा विचार येताच तिला आपल्या गर्भात वाढणाऱ्या मुलाचाच राग

आला. तिला साऱ्याची चीडच आली. कधी कधी मनातल्या मनात ती रामण्णांच्यावर चिडत असे. त्यांनाच दोष देत असे. ह्यांनी करायचं आणि आम्ही भोगायचं ! तिला वाटू लागे. . .स्त्री जातीवर हा एक अन्यायच आहे. तिच्या मनात असे विचार आले पण रामण्णांच्या मनात असेच विचार येत असतील का? पुन्हा कुमुद विचार करू लागली—"हे तर असे आहेत की चेहेऱ्यावरून काही दाखवतही नाहीत." जणू काही, काही झालंच नाही. झोपायच्या वेळी मनात असे विचार आले तर तिला झोप लागायची नाही. तेव्हा ती रामण्णांना आपला संताप, चीड दाखविण्यासाठी त्यांच्याकडे पाठ करून झोपत असे. तिने किती कूस बदलून पाहिली. पण रामण्णा गाढ झोपी गेलेले. ह्यावर पुन्हा आणखी एक भीती—काय, रामण्णांचे आपल्यावर प्रेम नाही ? आपल्या शरीरात होणारे बदल पाहून, रामण्णांना आपल्याबद्दल तिरस्कार तर वाटत नाही ? का आपली आणि रामण्णांची प्रेमकहाणी इथेच संपली ? कधी कधी अशा विचारांत कुमुद रमून गेली तर झोपेतच रामण्णांच्या हाताचा तिच्या पोटाला स्पर्श होई. कळतनकळत ! तेव्हा ती थंडी लागल्या-सारखी कुडकुडून जाई. मग सारे विचार सोडून देऊन हळू हळू कूस बदलून रामण्णांकडे तोंड करून ती झोपी जाई. रामण्णांच्या तोंडावरून हात फिरविता फिरविताच तिचा डोळा लागे.

आज ती आठवण आल्यावरही कुमुदचा गळा दाटून आला. ह्या दोघांचा हा संसार कसा ? कुणाला खरं तरी वाटेल की ह्या दोघांनी सांसारिक जीवनाचा भरपूर आस्वाद घेतला आहे. मोहन जसा जसा पोटात वाढत होता तसं तसं कुमुदचं धैर्य वाढत होतं. रामण्णांचा आनंदही दिवसेंन दिवस वाढत होता. कधी कधी रामण्णांच्या गप्पा ऐकून हिला हसूच येई. कुमुदला पाहून एखाद्या गर्विष्ठ लहान मुलाप्रमाणे रामण्णा वागत. ते म्हणत—"अग, अग उठू नकोस. अग, हे सगळं उचलू नकोस. उगीचच जिना चढू नकोस" ...वगैरे वगैरे. तेव्हा कुमुदला ते ऐकून हसूच यायचे. . . .त्यांना काय माहीत? हा भार पोटातलाच आहे. बाहेरून उचलून तर कुणी ठेवला नाही. हा शरीराच्या एखाद्या अवयवासारखाच एक स्वाभाविक भाग आहे. तेव्हा कुमुदच्या लक्षात आलं, पुरुष म्हणजे एखाद्या अनुभवशून्य मुलासारखाच असतो. एकदा रात्री, कुमुदला अस्वस्थ वाटू लागले. तिला झोप येत नव्हती. तेव्हा दिवा लावून ती अंथरुणावर बसली. रामण्णा जवळच झोपले होते. त्यांच्या चेहेऱ्यावर विश्रांतीचे तेज दिसत होते. गाढ झोपेत त्यांचे शरीर एखाद्या बाहुलीसारखे निश्चल पडले होते. डावा हात, डोक्याखाली दबला गेला होता. डाव्या बाजूवर झोपी गेले होते. त्यांचा उजवा हात कुमुदच्या अंगावर पडला होता. तिने उठून रामण्णांचा हात हळूच उचलून आपल्या मांडीवर ठेवला. मग तो दोन्ही हातानी पकडला. त्यांच्या हाताचा गरमपणा हिच्या हाताला लागला. तो हात उचलून तिने आपल्या पोटावर ठेवला. क्षणभर तिच्या डोळ्यांसमोर अंधार पसरला. रामण्णांचा

हात लागताच तिच्या साऱ्या शरीरातून वीज सळसळली. समोर झोपलेला रामण्णा जणू तिच्या पोटात अदृश्य होऊन गेला आहे. आणि लपून बसला. ती एकदम दचकून उठली. खरोखरच रामण्णा, आपल्या पोटात लपले ? आपण किती घाबरून गेलो होतो. त्यांचा हात जोराने पकडला... रामण्णा घाबरून उठले—

"काय आहे ? कुमुद, काय झालं ?" बोलता बोलताच ते उठून बसले. इतक्यात कुमुदला सारं उमगलं, समजलं, त्या स्थितीत आनंदाने तिचा सारा चेहेरा उजळून निघाला. रामण्णांनी मग तिला पुन्हा नीट न्याहाळले व तिच्या पोटावर पुन्हा हात ठेवला. आणि हसून म्हणाले "ओ हो!"

त्या दिवशी पोटात वाढणारा तो जीव पहिल्यांदाच फिरू लागला.

तोच माझा मोहन आहे. नाही. नाही...आमच्या दोघांचा मोहन. मोहन आणि रामण्णा एकच आहेत. तर मोहनला मारणं रामण्णांना मारण्यासारखंच नाही का ? म्हणूनच आपण मोहनला मारलं, त्याचं रामण्णांना फार फार वाईट वाटलं.

अतिशय निराशेने कुमुदने एक सुस्कारा सोडला. ... नंतर तर तिने इतक्या जोराने श्वास सोडला की जणू खूप वर्षापूर्वीच्या जुन्या कटु आठवणींना एकदमच बाहेर फेकून दिले.

त्या दिवशी कुमुद म्हणाली होती "मी आता परत फिरणार नाही." पण तरीसुद्धा परत येऊन किती वर्षे निघून गेली...किती युगे उलटली.

तो सुद्धा एक अनुभव होता. हा विचार येताच कुमुदला हसू आले. तो कसा अनुभ. होता. आता मजा वाटते त्याची. पण त्या दिवशी ती केवढी भांडून रागाच्या भरात ोहनला घेऊन गेली होती. कुठे गेली होती ? पुन्हा त्याच आत्याबाईच्या घरात.

सकाळीच ती आत्याच्या घरी पोचली. कडेवर मोहन आणि हातात छोटीशी बॅग. म्हातारी कुठल्या कुठल्या श्लोकांचे परायण करीत म्हातारी अंगणात सडा टाकीत होती. ही आलेली तिलाच कळलेच नाही. शेवटी कुमुदने 'आत्या' म्हणून तिला हाक मारली. तेव्हा म्हातारीने तिच्याकडे वळून पाहिले. आधी तर तिचा हिच्या येण्यावर विश्वासच बसला नाही, आणि नीट काही दिसलं नाही म्हणून डोळे ताणून ताणून पाहिले आणि मग विचारले.

"कोण ? कुमी ? हे काय कुमुद ? काही खबर बात, निरोप न देता आलीस ? एकटीच आलीस का ?"

दोघी गप्पा मारीत मारीत आत गेल्या. तेवढ्यात मोहन झोपेतून जागा झाला. आपण कुठे आलोत तेच त्याला कळेना....म्हणून तो एकदा म्हातारीकडे आणि एकदा

आईकडे पाहू लागला. बोलता बोलता कुमुद मोहनला मांडीवरून खाली ठेवावयाला लागली, तर मुलाने तिला घट्ट पकडून ठेवले. . . .कुमुद त्याला जबरदस्तीने खाली ठेवू लागली तर मोहन जास्तच जोराने रडू लागला.

"का ग? पुन्हा दिवस गेलेत का तुला ?" त्यावेळी कुमुदला आत्याबाईचं बोलणं नीट समजलंच नाही. प्रसंग काय होता ? बोलणी कसली चालली होती ?

"काय म्हणालात आत्याबाई ? कुमुदने हैराण होऊन विचारले.

"अग, मूल रडतंय ना म्हणून विचारलं . . . !" आत्याबाई म्हणाल्या. तोपर्यंत कुमुद मोहनला मांडीवर घेऊन नीट बसली होती. मोहनही शांत झाला होता.

कुमुदने विचारले. . . "आत्याबाई. मोहन तर रडत आहेच पण तुम्ही दुसरंच काहीतरी विचारीत होता ना ?"

"अग, दुसरं काही नाही विचारलं. मी म्हणत होते, अग, तुला पुन्हा दिवस गेलेत का ?"

"इश्श. . . .काहीतरीच काय? मला काय वेड का लागलंय आत्याबाई ?"

"जास्त वय झाल्यावर लग्न करणं म्हणजे मूर्खपणाच आहे."

"पण त्याचा मुलगा रडण्याशी काय संबंध ?"

"अग अंगावर पिणारा लहान मुलगा' 'मांडीवर बसलेला आहे आणि पुन्हा पोटात मूल आहे. तर मांडीवरलं मूल अशीच किरकिर करते." हे कोणतं तत्त्वज्ञान, शास्त्रज्ञान का अनुभवज्ञान होतं ते कुमुदच्या लक्षातच आले नाही. ती हसूच लागली.

"आत्याबाईंनी विचारलं," अग हसलीस कां ?

"आत्याबाई तुमच्या बोलण्याचं मला हसू आलं !"

"अग, ह्यात हसण्यासारखं काय आहे ? अग आज आठ दिवस झाले बघ . . गुरुवार ते गुरुवार . . . तू सासरी गेल्याला आणि लगेच पुन्हा आलीस ? म्हणून विचारलं हो.

हसत हसत कुमुद म्हणाली, . . ."मला काही दुसरं काम नाही का ?"

"लग्नानंतर मुलं काढणं हे पहिलं काम. बिनलग्नाच्या मुलींनी मुलं काढणं . . . हे दुसरं काम आहे. . . आजकाल."

बापरे. म्हातारी किती सहजपणे बोलून गेली होती.

"आत्याबाई, सगळेच सारखे नसतात बघा. आजच्यासारखे वाईट त्या काळी-सुद्धा होतेच की . . .

"त्याकाळी लोकांना लाज म्हणून काही चीज माहीत होती. अशी तशी काही गडबड झाल्यावर नदी—नाल्यात उडी मारून जीव देत. आजकाल तशी कुणाला हिम्मत नाही. थाबरून लग्न करून टाकतात !"

"का आत्याबाई, मी इतकी का वाईट आहे ?"

"अग वेडाबाई. आपली बोलणी चालली होती म्हणून आपलं सहज म्हटलं. माझ्या बोलण्याकडे तू उगीच जास्त लक्ष देऊ नको."

आत्याबाईंची बडबड चालूच होती. इतक्यात कुमुदला काय झालं कुणास ठाऊक. जोरजोरात रडूच यायला लागलं. आता आठवण आली त्या गोष्टीची की हसूच येते. पण त्यावेळी आपलं रडणं ऐकून म्हातारी अगदी हबकून गेली होती.

"अग बाई कुमुद जळली माझी जीभ ग. माझं म्हातारीचं कशाला ऐकतेस ? तू ती म्हण ऐकलीस का ? आपल्या कपाळावर कुंकू नसलं म्हणजे ती बाई दुसऱ्या बाईच्या कपाळाचं कुंकू पाहून विचारते...कपाळाला लागलं का ? अग. एकटी एकटी राहून मी असंच काही तरी बोलायला शिकलेय बघ. वेडाबाई...तुझ्या नवऱ्याला चांगलं खूप आयुष्य लाभो. देव तुला आणखी चार-पाच पोरं देईल बघ. आणि मी जिवंत असेपर्यंत माझ्याकडेच बाळंतपणाला यायचं बरं का ?"

म्हातारीचं बोलणं ऐकून कुमुद आपली व्यथा विसरून गेली. आणि हसू आवरू शकली नाही. तेव्हा म्हातारी रागातच म्हणाली—"अग. हे काय ? तुला वाटतं तेव्हा रडतेस, मध्येच हसतेस. तुझ्याशी कुणी बोलायचं तरी कसे ?"

"नाही आत्याबाई, तसं नाही. मी तुला सांगतेय ना...मला दुसरं मूल व्हायचं नाही म्हणून...बोलता बोलता डोळे पुसता तिला इतकं हसू येत होतं की पुढे काही बोलताच येईना.

"अग आता नाही तर नाही. लवकरच होईल बघ. आता तू लहान आहेस जग... काळजी कसली ?"

"नाही आत्याबाई. मी नाही ती काळजी करीत. आणि तसं होणार पण नाही."

"उगीचच काही तरी बोलतेस तू."

"खरंच आत्याबाई. आता काही होणार नाही."

"म्हणजे ?"

खरं म्हणजे कुमुदलाही त्याचा अर्थ माहीत नव्हता. त्याबद्दल तिने काही विचार-सुद्धा केला नव्हता. तरीसुद्धा मनातली गोष्ट सांगायची पहिलीच संधी मिळाली म्हणून

एकदम सारं सांगून गेली. सांगता सांगता तिला वाटलं की लोकांचा ह्यावर विश्वास बसणार नाही. पुढं काही सांगण्यात तिला जरा अडचणच वाटली. पहिल्यांदा सांगितलेली गोष्ट विसरून ती पुन्हा तीच तीच गोष्ट सांगू लागली. मग तिला वाटलं सगळंच काही सांगायला नको होतं. जीभ अगदी अडखळत होती.

"अरेच्या. मला वाटलं, काही सांगणार आहेस. का ग तुम्हा नवरा-बायकोचं कुठे काही भांडण बगैरे तर झालं नाही ना ?" बोलता बोलता म्हातारीने एक सुस्कारा सोडला. खरं म्हणजे त्यावेळी कुमुदने काय सांगितलं ते म्हाताऱ्या आत्याबाईंना काहीच कळलं नाही. पण तिला मनातलं सगळं सांगून टाकल्यानंतर कुमुदचं मन हलकं हलकं वाटलं !

म्हाताऱ्या आत्याबाईंना सगळं माहीत होतं ? की काहीच माहीत नव्हतं ?

परंतु कुमुदला आपल्या नवऱ्याकडे परत जाण्याची प्रेरणा देणाऱ्या ह्याच म्हाताऱ्या आत्याबाई.

आठवणी तिला कुठल्या कुठे ओढून नेत होत्या. पण आजच ह्या साऱ्या आठवणी का साचून आल्या होत्या ?

खरंच ! का, कुणास ठाऊक, आज म्हाताऱ्या आत्याबाईंच्या साऱ्या गोष्टी का आठवत आहेत.

तिने आणखी काय काय सांगितले होते कुणास ठाऊक !

पहिल्यांदा तिला साऱ्या गंमतीच्याच गोष्टी वाटल्या. मग त्याच गोष्टींनी तिला बचैन करून टाकलं होतं. तो कोणता प्रसंग होता ? हो, बरोबर आठवला. इकडच्या, तिकडच्या गप्पा सुरू झाल्यावर म्हातारीने एकदा विचारले होते. . . .

"तुझा नवरा काय करतो ग ?"

"पुस्तकं लिहितात !"

"ते नाही ग मी विचारीत. . .पोटा-पाण्यासाठी काय नोकरी धंदा करतात ?"

कुमुदला हसू आले. हसत हसतच तिने विचारले —

"काय आत्याबाई. पुस्तकं लिहून पोट नाही भरत ?"

"अग मी काय म्हणते ते तुला कळत नाही बघ. आमच्या वेळी जमिनीची, इस्टेटीची देखभाल करणे, देण्या–घेण्याचा व्यवहार करणे. नोकरी करणे ही सारी पुरुषांची कामे होती. पण आजकालचे पुरुष, काय करतात कुणास ठाऊक."

"आत्याबाई, पुस्तके लिहिणाऱ्यांचा चार माणसांत केवढा सत्कार, सन्मान होतो. . . !"

"त्यात काय आहे ग ? माणसाची चाल–चालणूक चांगली असली की त्याला सगळीकडे मान–सन्मान मिळतो. वा ! तुझे यजमान पुस्तके लिहितात. किती देतात त्यांना महिन्याला ?"

"आत्याबाई, काय तुम्ही ह्या कामाला महिन्या महिन्याचं काम समजलात की काय ? जेव्हा त्यांना स्फूर्ती येते तेव्हाच ते लिहितात."

"पण मग उदरनिर्वाह कसा ?"

"जमीन इस्टेट आहे ना....पूर्वजांची"

"वेडाबाई, पहिल्यांदा नाही का सांगायचं ? मग खूप आहे की,. . .अशी कुठे घरात ढीगभर माणसं आहेत तुझ्या ?"

"कोणी नाही. आतापर्यंत तरी आम्ही दोघंच !"

"म्हणजे, तू नवऱ्याला एकट्याला सोडून आलीस की काय ?"

कुमुदने तोपर्यंत त्या बाबतीत काहीच विचार केला नव्हता. आणि आत्याबाईंच्या प्रश्नाचं उत्तरही दिलं नाही ! पण बोलता बोलता म्हातारी एकदम हसूच लागली.

"का, आत्याबाई काय झालं ?"

"अग, काही तरी आठवलं."

"काय आठवलं ?"

"खूप आठवलं, बघ काही काही. जुन्या जुन्या गोष्टी आठवून वेळ कटवायचा हेच तर माझं म्हातारीचं काम !"

"पण हसलात का तुम्ही ?"

शेवटी तिने आत्याबाईंना आग्रह करून करून, ती आठवण त्यांच्याकडून काढूनच घेतली.

"कुमे अग, एकदा मला तुझ्यासारखाच राग आला होता. बघ. ती, त्या दिवसाची गंमत मला आठवली."

"माझ्यासारखा राग ? म्हणजे ?"

"हे बघ, कुमुद, पुरुषाचा राग काही निराळाच असतो बघ. आणि बाईच्या रागाची तऱ्हा ही वेगळीच."

"का, स्त्री म्हणजे काही मनुष्य नाही का ?"

"होय ग. पण बाईला पुरुषासारख्या मिशा नसतात आणि पुरुष मनुष्य असला तरी आई होऊ शकत नाही. काय कुणास ठाऊक. ह्यात परमेश्वराची कोणती माया आहे.

प्रत्येकाला निराळे निराळे रूप दिले आहे. बाहेर चार माणसांमध्ये काम करणारा पुरुष रागावतो. भांडतो तरीसुद्धा दुसऱ्या दिवशी त्यांच्याशीच व्यवहार करतो. पण आपले तसे नाही. जर आपण बायका रागावलो तर मनातल्या मनात नुसते कुढत बसतो."

"म्हणजे, आत्याबाई तुम्ही फार हट्टी होता की काय ?"

"अग, पुरुषाचा राग नाकावर, आणि बाईचा राग चुलीवर."

"म्हणजे तुम्ही त्या दिवशी स्वयंपाक नाही केलात ?"

"अय्या, ग बाई, मी काय तुझ्यासारखी घरात एकटी होते ? घरात किती माणसं होती. मी स्वयंपाक केला नाही तर काय अडणार होतं कुणाचं ?"

"मग राग आल्यावर तुम्ही काय करत होता ?"

"स्त्री दुसरं काय करू शकणार ? माझं अंथरुण निराळं घालायची आणि झोपून जायची. किती बोलायचा प्रयत्न करायचे ते. पण मी बोलायचीच नाही." सांगता सांगताच म्हातारीला केवढं हसू आलं !

"कुठली गंमतीची गोष्ट आठवली, आत्याबाई ?"

"गंमत कसली ग. तेच म्हटलं ना, तुमच्या सारखं ! हे बघ कुमुद प्रत्येक पुरुषाचा स्वभाव निराळा निराळा असतो. पण बायकांचं तसं नाही बघ. घरातच काम करायचं आणि झिजत जायचं ! आपलंच घर समजून कष्ट करायला लागतात. तेव्हा वाटतं, नवऱ्यानं विचारावं–"काम जास्त का पडलं ? डोकं दुखतंय ? आता पुरे, आराम कर." नवऱ्यानं म्हटलं, विश्रांती घे. आराम कर तरी मुद्धा आपण आराम करीतच नाही. पण समाधान एवढंच वाटतं, की आपली काळजी करणारं कुणी तरी आहे. कधी कधी सणावारी, लग्नप्रसंगी मी नवे कपडे नेसायची, साज शृंगार करायची तेव्हा वाटायचं ह्यांनी माझा थाटमाट पाहावा.... खुश व्हावं. पण तुला म्हटलं, प्रत्येक पुरुषाचा स्वभाव निराळाच. माझ्या यजमानांना काही ह्या गोष्टीत मुळीच रस वाटत नव्हता. घरात बायको आहे की नाही ह्याच्याशी त्यांचा काही संबंधही नव्हता. एकदा काही तरी बोलाचाली झाली आणि आमचं दोघांचं अगदी कडाक्याचं भांडण झालं बघ. मला पण खूप राग आला होता त्या दिवशी. शेवटी मी म्हटलं, "मी आता चार दिवस माहेरी जाऊन राहते." मग ते म्हणाले 'जा तुला जायचं असेल तर !' हे ऐकून तर मला आणखीच राग आला बघ. माझी इतकी परवा नाही. मी लगेच रात्रीच्या गाडीनं जायची तयारी केली...."

"थांबलात का आत्याबाई ? पुढे काय झालं ?" म्हाताऱ्या आत्याबाई जोराने हसल्या आणि हसत हसतच म्हणाल्या,

"अग, माझा राग इथेच संपला."

"म्हणजे ?"

"म्हणजे काय, सांगू....अग तुला म्हटलं ना, की स्त्रीचा राग, निराळाच असतो ?"

"मग पुढे काय झालं ? भांडण संपलं ? तुमच्या यजमानांनी क्षमा मागितली ?"

"काय म्हणालीस ? क्षमा मागितली ? अग वेडे, तेवढ्यानंच जर बाईचं समाधान होत असतं ना, तर हे पुरुष पावला पावलावर क्षमा मागायला तयार झाले असते बघ. आपसातली भांडणं मिटवण्यासाठी जो माणूस क्षमा मागतो ना, त्याला त्या शब्दाचं महत्त्वच कळत नाही बघ."

"तर मग तुम्ही गेला का नाहीत ?"

"मी कसली जाते, कुमुद ? मी तुला सांगितलं ना, की जायची तयारी करू लागले तर 'हे' सुद्धा रागाने बाहेर जायला निघाले होते. ही पेटी उघडली, ती पेटी उघडली, बिस्तर आपटलं. मला वाटलं आता 'हे'च आपल्याला बाहेर निघून जायची धमकी देत आहेत. पण सगळी फेकाफेकी चालूच.... "छे, माझा शर्ट ,कुठे गेला ?" म्हणून घरभर चकरा मारू लागले. मी म्हटलं "हा घ्या." आणि खुटीवर टांगलेला शर्ट त्यांच्या हातात दिला. पुन्हा आपल्या तयारीला लागले. इकडे ह्यांनी आपला शर्ट घातला. आणि सगळ्या खिशात हात घालून, भुवया चढवून माझ्याकडे पहात म्हणाले– "छे ! ...ह्या घरात एक वस्तू जागच्या जागी राहात नाही. माझे पैसे..." मी लगेच त्यांच्या उशीखालून त्यांची पैशाची पिशवी काढून दिली आणि त्यांच्या समोर ठेवली. पुन्हा आपल्या कामाला लागले. थोड्या वेळाने बाहेर काही गडबड गोंधळ ऐकू आला. दरवाज्यातून डोकावून पाहिले– तर 'हे' घरभर धावत पळत होते. आणि इतरही दोघे जण खूप धावपळ करीत होते. जरा पुढे होऊन मी पाहिले तर काय ? घरातले सारे लोक 'ह्यां'च्या चपला शोधण्याचे काम करीत होते. मी काही स्वस्थ बसले नाही....लवकर लवकर मागे गेले. तो काय त्यांच्या चपला तिथेच पडल्या होत्या. त्या आणून दाणकन् त्यांच्यापुढे आदळल्या. आणि पाय आपटत आपटत आपल्या खोलीत गेले. धाडकन् दरवाजा लावून घेतला. कडी लावली आणि अंथरुणावर पडून जोर-जोरात रडू लागले. इतकी रडले, इतकी रडले, कुमुद...काय सांगू तुला ?" बोलता बोलता म्हातारीला आपले हसूच आवरेना.

"कुणी सुद्धा जाऊ नको म्हणून म्हटलं नाही ना आत्या. म्हणून तुम्ही लहान मुलासारख्या रडू लागल्या का ?"

"अग बाई ! जाऊ नको असं कोणी म्हटलं ?"...म्हातारी हसायची थांबली, आणि आपले अश्रू पुसत पुसत म्हणाली..." अग, मला अडवणारा कोण होता ? मी काही माझ्या स्वत:साठी रडत नव्हते तर 'ह्यां'च्या साठीच रडत होते.

"त्यांच्या साठी ?"

"मग ! अग मी कुठे माहेरी जाण्याची तयारी करू लागले तर 'ह्यांची' ही अवस्था आणि मी जर माहेरी निघून गेले तर 'ह्यां'ची काय अवस्था होईल ग ? ह्यांना आपला शर्ट कुठे सापडायचा ? धोतर कुठे सापडायचे ? 'ह्यां'चे कपडे कोण धुऊन टाकील ? ...हे सारे विचार मनात आले ना, तशी मी रडूच लागले बघ कुमुद !"

हे सारे ऐकून कुमुदला फार फार वाईट वाटले. मग तिला वाटलं, आत्याबाई काही आपली स्वत:ची कथा नाही सांगत. उलट कुमुदलाच समजावून सांगत आहे.... आपण इथे आल्यावर रामण्णांनी धड नीट काही खाल्लंही नसेल.... ते सारे चित्र कुमुदच्या डोळ्यांसमोर नाचू लागले. उत्साहाने लिहायला बसणारे रामण्णा आपले पेन शोधीत आहेत. त्यांनी घातलले कपडे मळके दिसत आहेत....अशा प्रकारची अनेक दृश्ये कुमुदच्या डोळ्यापुढे तरळू लागली. ...म्हाताऱ्या आत्याबाई काहीतरी सांगत होत्या. पण कुमुदचे त्यांच्याकडे लक्षच नव्हते मुळी. आत्याबाईंची बडबड चालूच होती.

"समजलं का. कुमुद. बाहेर किती का मोठे असेनात पण हे पुरुष घरात अगदी लहान मुलांसारखेच असतात. मुलं जरा मोठी झाल्यावर बाहेर पडू लागतात तेव्हा सुरवाती सुरवातीला आईला किती वाईट वाटते. आपण मुलावर प्रेम करतो. पण ही मुले आपल्यावर मुळीच प्रेम करीत नाहीत. मुले तोंड उघडून काही म्हणत नाहीत. पण पायात एखादा काटा खुपला तर सरळ पळत पळत आपल्याकडेच येतात. म्हणूनच म्हटलं ना की पुरुषाची प्रेम दाखविण्याची पद्धतच निराळी असते. का? माझ्या बोलण्याकडे तुझं लक्ष नाही का ? कुमे अग कुमे, हे काय ? माझी ही कथा ऐकून तू रडू लागलीस का ?"

कुमुद खूप रडली. आणि रडू आवरायचा खूप प्रयत्न केल्यावरसुद्धा तिच्या डोळ्यांतून टप्टप् अश्रू ओघळू लागले. पुढच्याच आठवड्यात ती घरी परत आली. घरात पाऊल टाकताच मोहन रामण्णांकडे धावत गेला व त्यांच्या मांडीवर बसून डोलू लागला. ते पाहून कुमुदच्या अंगावर तर काटाच उभा राहिला.

कुमुदने झटकन् मनगटावरील घड्याळाकडे नजर टाकली, सभेला बोलवावयाला येणाऱ्याची वेळ होऊन गेली. कोण जाणे. . .जाताना रामण्णा म्हणतील. . . "मोहन तू पण चल." आणि हा मुलगा तर अजूनपर्यंत आला नाही. त्याचे कपडे तरी तयार ठेवते." असं स्वत:शीच पुटपुटत कुमुद मोहनचे कपडे पाहू लागली.

## १२

रामण्णा खिडकीतून बाहेर पाहात होते. संध्याकाळ होऊ लागली होती. येणाऱ्या रात्रीप्रमाणे अंधार सगळीकडे पसरू लागला होता. दिवस आणि रात्र हे पति-पत्नी आहेत. हा एक कवींचा संकेत आहे. तो कदाचित बरोबर नसेल. आपला आणि कुमुदचा संबंध दिवस-रात्री सारखा आहे असे का म्हणू नये ? . . . पण आपल्या दोघांमध्ये कोणी तरी आला आहे. . . . हा विचार मनात येताच रामण्णांनी खिडकीतून बाहेर पाहिले. आणि ते मनात म्हणाले . . . मोहन आला तर छान होईल. त्यालाही सभेला घेऊन गेलं पाहिजे.

खिडकीतून पाहिल्यावर मोहनचा काहीच पत्ता दिसेना. येईल एवढ्यातच असा विचार करून ते पुन्हा खुर्चीकडे आले. मोहन बाहेरून येणार हा विचार करते वेळी रामण्णांच्या डोळ्यासमोर नेहेमी एकच चित्र येते. खुर्चीवर बसून खिडकीकडे पाहताच पुन्हा तेच चित्र त्यांच्या डोळ्यासमोर उभे राहिले. तेव्हा त्यांच्या चेहेऱ्यावर केवढा आनंद पसरला होता.

किती वर्षांचे जुने चित्र. तेव्हापासून आतापर्यंत मोहन किती मोठा झाला आहे. पण ते चित्र काही पुसले जात नाही. सात किंवा आठ वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. त्यावेळी रागावून कुमुद दुसऱ्यांदा घर सोडून गेली होती. रामण्णांनी तो काळ कसा घालविला ते त्यांचं त्यांनाच कळेना. पण एक दिवस सकाळी ती अचानक परत आली होती. आता हिचे स्वागत कसे करावे ह्या विचारात रामण्णा होते इतक्यात मोहनने आईच्या कडेवरून त्यांच्याकडे उसळी मारली. रामण्णाही त्याला घेण्यासाठी एक पाऊल पुढे जाणार तोच एकदम थबकले. इतक्यात कुमुदनेच एक पाऊल पुढे होऊन, खाली वाकून मोहनला खाली उतरविले. रामण्णांनी लगेच त्याला जोराने घट्ट छातीशी धरून ठेवले. जणू काही आपले बाहेर पडणारे हृदयच ते स्वतः सावरून धरीत होते. आणि एकसारखे

ते मोहनचे मुके घेऊ लागले. मोहननेसुद्धा आपले दोन्ही हात रामण्णांच्या गळ्यात घातले होते. तेव्हा अतिशय आनंदाने रामण्णांनी कुमुदकडे पाहिले होते.

वा ! कसं सुंदर चित्र होतं ते ! शब्दांनी त्याचे वर्णन करणे केवळ अशक्यच होते. प्रतिभावान चित्रकारच त्याचे वर्णन करू शकला असता. मोहनच्या चेहेऱ्यावर केवढा आनंद दिसत होता. कदाचित त्यालाच आनंद किंवा रस म्हणत असतील, कारण त्या आनंदित चेहेऱ्याला पाहून सर्वांनाच केवढा आनंद होत होता. असं वाटत होतं मोहनच्या चेहेऱ्यातून निघालेली आनंदाची किरणे साऱ्या घराला आनंदमय करून टाकीत आहेत.

आणि कुमुदचा चेहेरा. त्याच वेळी मात्र, कुमुदला पाहिल्यावर रामण्णांच्या मनात दुसऱ्या प्रकारची भावना निर्माण झाली. ह्या आधी त्यांनी कुमुदला जितक्या वेळा पाहिलं होतं तितक्या वेळा त्यांना ती अत्यंत मोहक, रूपवती स्त्रीच्या रूपातच दिसली. अशावेळी नेहमी हीच भावना प्रधान होती की आपण भोक्ता आहोत. आणि आपली ही भोग्या आहे. पण त्या दिवशीच्या त्या प्रसंगी कुमुदला पाहिल्यावर रामण्णांच्या मनातसुद्धा आले नाही की ही आपली भोग्या आहे. असे का ? ही एक स्त्री आहे असेही त्यांना वाटले नाही. तिच्या चेहेऱ्यावर मोठे समाधान, तृप्तीचे तेज दिसत होते. दुसऱ्यांचा आनंद पाहून आनंदित होण्याची ती एक सात्त्विक कांती होती. स्वतःला अगदी एका बाजूला ठेवून. केवळ दुसऱ्याच्या सुखासाठी झटणाऱ्या एका निःस्वार्थी व्यक्तीच्या चेहेऱ्यावरील तेजाप्रमाणे तिच्या चेहेऱ्यांवर ते तेज झळकत होते.

त्या दिवशी कुमुद जणू मातृत्वाची पूर्ण मूर्तीच दिसत होती. असे विचार डोक्यात येण्याचे काय कारण होते ? कुमुदला पाहताच रामण्णांना वाटले, आपण एक अजाण बालकच आहोत. आश्चर्याची गोष्ट म्हणजे कुमुदनेही रामण्णांशी अशा गोष्टी केल्या की जणू काही आधी त्या दोघांमध्ये काहीच बेबनाव झाला नाही.

ती हसत हसत म्हणाली होती— "एक लहान मूल एक मोठं मूल."

"काय ?"

"अहो माझ्या म्हणण्याचा अर्थ असा आहे— तुम्हा दोघांना पाहून, लहान कोण आणि मोठं कोण हे ठरविणंच कठीण आहे बघा." मोहनने रामण्णांकडे डोळे विस्फारून असे पाहिले जणू काही त्याला हे सगळे बोलणे समजलेच आहे. मोहनचे ते विस्फारलेले डोळे पाहून रामण्णांना असे वाटले की कुणीतरी त्यांच्या छातीवर गोळी मारली. त्या क्षणी, नाटकातील दृश्याप्रमाणे सारा सीनच पालटून गेला.

निराश होऊन . . . हसतच रामण्णांनी श्वास सोडला. ते एखाद्या कंपनीचं नाटकच जणू चाललं होतं कारण अशा वेळी नेहमीच कुमुद व रामण्णांमध्ये एक प्रकारचे कृत्रिम वातावरण उत्पन्न होत असे.

मोहनच्या डोळ्यांबाबत रामण्णांना नेहमीच एक प्रकारचे आश्चर्य वाटत असे आणि मोहनचे डोळे पाहून त्यांचा धीरही खचून जात होता.

ते डोळे मोहनचे नव्हते. ते डोळे सरलाचे होते. ह्यात रामण्णांना काहीच संशय वाटत नव्हता. मोहनचे हसणे पाहून तर क्षणभर त्यांना असाच भ्रम व्हायचा की हे हास्य सरलाचे तर नव्हे ? कधी कधी तर ते दचकूनच उठत. मोहनचे डोळे सरलाच्या डोळ्यासारखे कसे ? तो तर त्यांचा आणि कुमुदचा मुलगा आहे.

का, आपल्याला उगीचच भ्रम होतो—मोहनचे डोळे तर अगदी सरलाच्या डोळ्यांसारखे आहेत.

सरला त्या डोळ्यांच्या रूपाने आजसुद्धा जिवंत आहे ? तिला आई होता आलं नाही ही तिची व्यथा तिला एकसारखी टोचतच होती. घरात मुलं खेळावीत, बागडावीत असे तिला नेहेमी वाटे. रामण्णांनी कधीकधी तिला चेष्टेत विचारलेसुद्धा—

"बाजारातून विकत आणू या का ? अग आजकालच्या काळात पैशांनी काय वाटेल ते मिळते."

तेव्हा सरला म्हणाली होती—"बाजारात खूप भाजी विकत मिळते. म्हणून कुणी घरात भाजी उगवायचं बंद करते का ?"

"अग, उगीच कोण एवढे कष्ट घेणार ?"

"अहो, त्याचीच तर जास्त चव असते ना ?"

"जाऊ दे ग सरला. माझ्या म्हणण्याचा अर्थ एवढाच की अगदी फारच वाटलं तर आपण एखादं मूल दत्तक घेऊ या."

"माझ्या म्हणण्याचा अर्थ असा, की घरात मूलबाळ हवं हो!"

"अग मी कुठे नको म्हणतोय. आणि तू तरी कुठे नको म्हणतेस. पण तरीसुद्धा . . ."

"राहू दे झालं. तुम्ही तर मला एखादी लहान मुलगीच समजता. का हो ? तुम्हालाही मुलाचं सुख नाही हे मला आता कळून चुकलंय हो."

"सरला, तू आहेस. तर मला खरोखर मुलाचं सुख आहे. ह्याहून अधिक आणखी काही सुखाची मला इच्छाच होत नाही बघ."

"तुम्ही माझं ऐकून तर घ्या."

"काय हुकूम आहे, सांगा."

"तुम्ही आणखी एक लग्न करून टाका."

"काय म्हणालीस ?"

"अहो, मी जिवंत असतानाच आणखी एक लग्न करून ध्या. म्हणजे मी ह्या घरात मुलांचा जन्म पाहीन त्यांचे पालनपोषण करीत."

"म्हणजे ? अग अशाच स्त्रीशी लग्न करायला हवे की तिच्यापासून मुलं होण्याची खात्री हवी. आणखी एकदा पुन्हा फसायला नको. . .मग असं करतो. . . . . .मुलंवाल्या बाईशीच लग्न करतो. काय ?"

"पुरे हो. . .आता काही बोलू नका. . .तोंडाला येईल ते बोलत बसता तुम्ही !"

रामण्णा अत्यंत विषण्ण मनाने स्वत:शी बोलू लागले—खरंच जे तोंडाला येईल ते बडबडलो होतो. त्या दिवसाची ती वाणी शापवाणीच ठरली आपल्यासाठी. गर्भात मूल राहिल्यावरच आपण कुमुदशी लग्न केले ना ? तो माझाच मुलगा आहे हे खरं आहे. . .पण. . .

विचार करता करता रामण्णा दचकलेच ! तिला आपल्या डोळयांनी ह्या घरात मुलंबाळं खेळताना बागडताना पाहायची होती. ह्या हट्टानेच का सरला मोहनच्या डोळयात येऊन बसली आहे? आपल्या मूर्खपणाला हसत आहे. . .का? . . .रामण्णांना आणखी एक संशय आला. तो असा की जेव्हा त्यानी कुमुदला पसंत केले तेव्हासुद्धा ते सरलावर प्रेम करीत होते का ?

महाभारतातील गोष्ट आहे ना ? व्यासांनी आपले तेजस्वी डोळे बंद करून घेतले. म्हणूनच धृतराष्ट्राच्या आईने अंध मुलाला जन्म दिला. प्रेमीजनांच्या हृदयात लपून राहिलेल्या विचारांचा प्रभाव जर प्रेमिकापर्यंत पोचला नाही तर त्याचा असा परिणाम होतो ? कुमुदबरोबर रतिक्रीडा करतेवेळी आपण सरलाचीच आठवण काढीत होतो ?

छे ? हा कसला विचार ? स्वत:ला पूर्णपणे विसरून, तादात्म्य होऊन रति-क्रीडेमध्ये मग्न होतेवेळी, मनात आणखी एखादा विचार उठणे शक्य आहे का ?

ही अशीच गोष्ट आहे. . .शेतकरी बी पेरताना. . .खूप पीक येऊ दे अशी इच्छा करील तर त्याला हवे तेवढे पीक मिळते ना ! ऊं हूं. . .असे होतंच नाही. हे निसर्गाच्या विरुद्ध आहे. बीजाचे गुणदोषच पिकात दिसून येतील. बाहेरचे दिसणार नाहीत. आपला मुलगा आपल्यावरच जाणार. पण हा आपला एकटयाचा मुलगा नाही. आपला आणि

कुमुदचा आहे. की केवळ आपलाच आहे. जसं बी, तसं पीक येते. पण तरीसुद्धा सगळीकडचे हवा, पाणी, जमीन ह्यांचाही परिणाम होतोच की नाही. त्यापासून गुण-दोष उत्पन्न होत नाहीत ? गुणदोष तर त्या बीजातच असतात. अशाप्रकारे आलेल्या गुणदोषात ह्या बाह्य कारणांचा प्रभावही दिसून येतो. स्त्री तर हवा, पाणी, जमीन ह्या-सारखीच आहे. जन्मजात गुण, शरीर–रचना हे सारे पुरुषावरच. . .बीजावरच. . .

रामण्णा झटकन खुर्चीवरून उठले. हे काय ? जेव्हा दुसऱ्या कामाची वाट पाहतोय तेव्हा मी ह्या विचारात कशाला फसलोय ? विचार करता करताच रामण्णांनी आपल्या मनगटावरील घड्याळ पाहिले. अजून वीस मिनिटेंच बाकी राहिलीत. विचारांच्या ओघातच ते खिडकीजवळ आले. आणि पाहू लागले—मोहन आला की नाही ?

ओ हो. . रामण्णा स्वतःशीच हसू लागले. तरुण लेखक आपल्याला सारं काही कळतं असा दावा करतात. त्याचप्रमाणे आपण उगीचच इकडचा तिकडचा विचार करून चुकीचा रस्ता पकडतो. पुढच्याच क्षणी रामण्णांना वाटले—हा रस्ता चुकीचा नाही. आपल्या तर्कांनी आपण चुकीचा रस्ता पकडला असेल पण अनुभव तर प्रत्यक्ष आला आहे ना ! जिथे उभे होते तिथून पुन्हा मागे फिरून, भिंतीवर टांगलेल्या सरलाच्या फोटोकडे पाहू लागले.

"छे ! मुळीच शंका नाही." . . .रामण्णांनी विचार केला. जवळ जाऊन, नीट निरखून म्हणाले— "तेच डोळे !" कुमुदसुद्धा एकदा असंच म्हणाली होती. एकदा ? केव्हा बरं ? तेव्हाच. . .हो बरोबर. जेव्हा ती आत्याबाईंच्या घरून एकदम परत आली होती. आपण मोहनला मांडीवर घेऊन कुरवाळीत होतो. तेव्हा कुमुदने . . दोघांना म्हटलं तुम्ही दोघं लहानच आहात. तेव्हा मोहन डोळे मोठे मोठे करून एकदा कुमुदकडे आणि एकदा आपल्याकडे पाहात होता...तेव्हा रामण्णांनी वैराग्याने भरलेला एक निःश्वास सोडला. आणि ते खुर्चीवर बसले. त्यावेळी क्षणभर त्यांना वाटले आपण खूप सुखी आहोत...खूप सुखी आहोत...

हो. . .तेव्हाच कुमुद म्हणाली होती.

" ह्या मुलाचे डोळे कुणासारखे आहेत सांगा बरं."

" कुणासारखे ? आपण दचकतच मोहनकडे पाहात होतो. कुणासारखे ? . . . आपल्यालाही तोच भास झाला होता. पण जर सांगून टाकलं असतं, तर कुमुदचा तो अकस्मात केलेला गृहप्रवेश एकदम नीरस होऊन जायचा.

" कुणासारखे ग ?" रामण्णांनी हा प्रश्न असा विचारला की जणू त्यांना कशाचाच पत्ता नव्हता.

"अहो, मोहनचे डोळे कुणासारखे आहेत? इतक्या लवकर तुम्ही विसरून गेलात?"

विसरून गेलो? ओ हो! म्हणजे हिच्या पण लक्षात आलंय की मोहनचे डोळे कुणासारखे आहेत ते, मी सरलाला विसरून गेलो...असं का कुमुदला म्हणायचं होतं?

रामण्णा तेव्हा म्हणाले होते ... "कुणासारखे म्हणजे फक्त तुझ्यासारखे आहेत का?"

असम्मति सूचक डोके हलवीत हलवीत कुमुदने हसून म्हटले ..ऊं हू हूं!...

"मग तुला काय म्हणायचंय, माझ्यासारखे आहेत डोळे?" ह्यावर कुमुदने एक दीर्घ सुस्कारा टाकला व ती गप्पच बसली. कुमुदच्या तोंडूनच ही गोष्ट ऐकायची इच्छा झाल्यावरमुद्धा ऐकायला मिळाले नाही म्हणून आपण निराश झालो. तरीमुद्धा रामण्णांना आशा वाटली की कदाचित् थोड्या वेळाने ही देखील आपल्याला स्वतःहून तेच सांगेल पण तिची नजर तर दूर–दूरवर लागली होती. तिच्या चेहेऱ्यावर केवढी निराशा पसरली होती. तिने एक दीर्घ सुस्कारा सोडला. जणू काही तिला म्हणायचं होतं— जे व्हायचं ते होऊन गेलं! त्यावेळी कुमुदने रामण्णांकडे पाहिलेसुद्धा. रामण्णा विचार करीत होते.. थोड्याच वेळात आता सांगेल सुद्धा. इतक्यात मोहन तिच्याकडे पळत पळत आला. ती त्याला उचलून आत निघून गेली.

त्यावेळी जर एकदा आपण आपल्याच तोंडून सांगितलं असतं तर! हा विचार किती वेळा रामण्णांच्या मनात उठला होता. जर आपण सांगून टाकलं असतं—" हो, बरोबर तुझं म्हणणं. अगदी बरोबर आहे. ह्या मुलाचे डोळे अगदी हुबेहूब सरलाच्या डोळ्याप्रमाणेच आहेत. तर मग तिला बरे वाटले असते? पण मनुष्यस्वभाव मात्र फार विचित्र आहे. त्या दिवशी आपण, कुमुद आणि मोहन तिघांनी केवढं अलौकिक सुख अनुभवले. म्हणून, जेवढं होईल तेवढं तटस्थच राहायचं हा रामण्णांचा मूळ हेतू होता. पण ज्या हेतूने त्यांनी असं केलं त्याचा परिणाम उलटच झाला. सरलाची आठवण पुन्हा पुन्हा सरलाबद्दल बोलणं आणि त्यावर पुन्हा कुमुदपासून झालेला मुलगा सरला सारखा दिसतो असे म्हणणे ह्या साऱ्या गोष्टींनी कुमुदच्या मनात सरलाबद्दल उगीचच अढी निर्माण व्हायची. ह्याच गोष्टीचे रामण्णांना भय होते. कुमुदला आपण कसंही करून दुखवता कामा नये हाच त्यांचा एकमेव हेतू होता. पण त्या चांगल्या हेतूचाच परिणाम मात्र वाईट निघाला.

कदाचित् म्हणूनच लोकांचा दैवावर विश्वास बसू लागला जर लोकांच्या श्रद्धे-प्रमाणे दैविकती शक अस्तित्वात असेल तर मनुष्यासारखा क्षुद्र, अनुकंपनीय प्राणी दुसरा कोणी नाही. कुणास ठाऊक! आपली दैवगतीच उलटी आहे.

किंवा ? रामण्णांना ह्याविषयी आणखी एक विचार सुचला होता. दैव म्हणून कोणती चीज अस्तित्वात नाही. पण जेव्हा मनुष्याला आपले कर्तव्य कोणते ते कळत नाही किंवा जेव्हा मनुष्य आपले कर्तव्य निवडण्याचा प्रयत्न करतो तेव्हा त्याला दैव म्हणतात. अर्थात असे म्हणणे म्हणजे आपलीच चूक कबूल करणे.

खरं आहे. आता रामण्णा आपली चूक कबूल करायला तयार आहेत पण त्या दिवशी जे घडले ती दैवाची चूक नव्हतीच. आपल्या चुकीचेच आपल्याला योग्य प्रायश्चित मिळाले होते. 'मुलाचे डोळे कुणासारखे आहेत ? कुमुदचाही प्रश्न विचारायची पद्धत, तिच्या चेहेऱ्यावरचे ते हास्य ..ह्यावरून हे अगदी स्पष्ट दिसत होते की ह्या प्रश्नाचे उत्तर दोघांनाही माहीत आहे. मोहनच्या डोळ्यासारखे... कुणाचे डोळे ? कुमुद आणि आपण ह्या दोघांना आणखी कोण माहीत आहे ? कोणाचे डोळे ? कदाचित् कुमुदला सरळ उत्तर हवे होते... मोहनचे डोळे अगदी सरलाताईच्या डोळ्यांसारखे आहेत.

पण आपण काय केले ? सरळ उत्तर दिलेच नाही. "तुझ्यासारखे" असं सांगून एक चुकीचे उत्तर दिले. तसे नसतील तर मग माझ्यासारखे असं म्हणून तोंडाला येईल ते उत्तर दिले. कुमुदने किती उत्साहाने आपल्याला प्रश्न विचारला. पण आपण त्याला काहीच महत्त्व दिले नाही. का ? कुमुदने आपल्यावर प्रेम करावे...म्हणूनच. केवळ ह्याच एका कारणासाठी ... आणि त्याची शिक्षाही आपल्याला मिळाली.... नवऱ्याबरोबर कसा कसा संसार करायचा ह्या कल्पनेत रमून गेल्यावर दुर्वास ऋषींना विसरून गेल्यामुळे शकुंतलेलासुद्धा शिक्षा मिळाली होती.

खरं पाहिलं तर हा एक महत्त्वपूर्ण विचार आहे. केवळ आपलाच स्वार्थ पाहून, आपल्या जबाबदारीतून सुटका करून घेण्यासाठी, आपलं कर्तव्य न करणारा माणूस शिक्षेतून सुटत नाहीच.

रामण्णांच्या चेहेऱ्यावर मंद स्मित पसरले. "हा एक वास्तविक महत्त्वपूर्ण विचार आहे"... असं पुटपुटून रामण्णा स्वतःलाच हसले. हा महत्त्वपूर्ण विचार ? तर काय आपण ह्या साऱ्या गोष्टी सार्वजनिक सभेत सांगायला तयार आहोत ? लोकं काही म्हणोत. आपण स्वतः तयार आहोत का ?

हूं...म्हणतच रामण्णांनी आपली हनुवटी खाजवली. सांगायचंच म्हटलं तर अगदी धैर्य धरून स्पष्टपणे सांगितलं पाहिजे. लोकांना ऐकावसं वाटलं नाही तर जरा मनोरंजक शैलीत सांगितलं पाहिजे म्हणजे ते नीट ऐकून घेतील. आपण साहित्यिक आहोत ना ! लोकांसाठी आपण जाणून बुजून ही श्वान-मैथुन कथा सांगायला तयार

झाले पाहिजे. परंतु आपल्याच जीवनात इथे एकमेकांवर प्रेम करणारी दोन मने, वैमनस्यात...कुढून कुढून मरत आहेत. मग हीच कथा सांगायला काय हरकत आहे ?

रामण्णांनी विचार केला—आपण सांगू या. "इथे आपल्या साहित्यिक जीवनाचे एक युग समाप्त झाले." आजपासून आपल्याला सार्वजनिक मान्यता प्राप्त होईल. नंतर आपण आपल्याच प्रामाणिक विचारांना मनोरंजक रूप देऊन ते लोकांना ऐकवू. तसे ऐकविण्यात काहीच अडथळा नाही ते हनुवटी खाजवीत खाजवीत, बडबडत, खिडकी-जवळ गेले.

बाहेर पाहिले. नंतर जिन्याच्या पायऱ्यांजवळ येऊन खालून येणारा आवाज ऐकू लागले. पुन्हा आपल्या मनगटावरील घड्याळ पाहिले. जरी सभा अगदी वेळेवर सुरू होईल तरीसुद्धा अजून अठरा मिनिटे बाकी आहेत. आता सभेला नक्कीच उशीर होणार. तेही एकप्रकारे बरंच झालं. मोहनला बरोबर घेऊन जाता येईल, असा विचार करता करता रामण्णांनी आपल्या हातांची बोटे एकमेकात घातली आणि डोक्यामागे हात ठेवून, तोंड उंचावून थकून भागून एक लांब सुस्कारा सोडला आणि ते खुर्चीत बसून राहिले.

## १३

"कुठून आवाज तर नाही ना आला ?" कुमुद स्वतःशीच पुटपुटली. मोहन आला ? बरं झालं. माझी ही त्याच्यासाठी सारी तयारी करून झाली. अरेच्या, पण हा दरवाज्याचा आवाज नाही ? नंतर कुमुदने तोंड वर करून पाहिले. . .अरेच्या, वडील मुलाच्या येण्याची वाट पाहत आहेत तर ! एक मिनिटभर तिने पायरीवरच्या आवाजा-कडे नीट ध्यान दिले हळू हळू तिच्या चेहऱ्यावर हास्य पसरले. शून्य नजरेने ती अशी उभी राहिली जणू दूरवर तिला काहीतरी दिसत आहे. थोडासा श्वास घेऊन ती खुर्ची-कडे गेली. खुर्चीवर बसून एकसारखी आरशात आपले प्रतिबिंब पाहू लागली. तिने आपल्या प्रतिबिंबाला विचारले—"का, तुला खूप आनंद होत आहे ? रामण्णा मोहनवर खूप प्रेम करतात. म्हणून ?" तेव्हा आपले प्रतिबिंब हसले होते.

खूप आनंद होत आहे. पुन्हा कुमुदने स्वतःलाच विचारले. कुणी कुणावर प्रेम करील तर त्याला आनंद कशासाठी व्हायला पाहिजे ?"

खरंच आपण वेड्याच आहोत. सुरवातो सुरवातोला का कुणास ठाऊक आपल्याला काय वाटलं. . . त्या वेळी जेव्हा आपण मोहनला घेऊन परत आलो तेव्हा रामण्णांनी मोहनला घेऊन किती प्रेम केले. तेव्हा आपल्याला किती आनंद झाला होता. मोहनच्या जागी आपणच आहोत असा भ्रम झाला. आणि तिच्या अंगावर भीतीचा काटाच उभा राहिला. तिला दरदरून घाम फुटला. रामण्णांचा चेहेरा, त्यांचा उल्हास, आनंद पाहून कुमुदला वाटले रामण्णा आपल्यावरच्या साऱ्या प्रेमाचा मोहनवरच वर्षाव करीत आहेत. ही भावना स्पष्टपणे तिच्या मनात उत्पन्न झाली होती. त्या दिवशीचे ते दृश्य सरलाताईने पाहिले असते तर. हा विचारसुद्धा तिच्या मनात आला नव्हता. सरलाताई तर नेहेमी म्हणत होती-घरात मुलं हवीत. रामण्णांनी कुमुदशी लग्न करावे. त्यांना मुलं बाळं व्हायला हवीत . . 'मग मी सुखाने मरीन.' सरलाताई नेहेमी असं म्हणे. आज ती जिवंत असती तर ? आपला आणि रामण्णांचा मुलगा आणि पुन्हा रामण्णांना एखाद्या लहान मुलासारखे खेळताना पाहून सरलाताईला काय वाटलं असेल ? कुमुदने अगदी मायेने, वात्सल्याने मुलाकडे पाहिले. तिच्या छातीत धस् झाले. सरलाताई, . . . छे, सरलाताईचे डोळे....छे मोहनचे डोळे अगदी हुबेहूब सरलाताईच्या डोळ्यांसारखे दिसतात. आतापर्यंत कसं आपल्या लक्षात आलं नाही ? आपण मोहनचे डोळे नीट निरखून पाहिले, छे, मुळीच संशय नाही. सरलाताईचे डोळेच हे दृश्य पाहत आहेत. सरलाताईला अगदी धन्य धन्य वाटले असेल.

त्याचवेळी रामण्णांनाही खूप आनंद झालेला दिसला. त्यांना काय वाटलं, कुणास ठाऊक. त्यांनी विचारलं होतं-मोहनचे डोळे कुणासारखे आहेत ?

रामण्णांनी किती उत्सुकतेने हा प्रश्न विचारला होता. म्हणजे आपण जे पाहिले ते रामण्णांच्या लक्षात आले नाही. आपल्याला जो आनंद, जे समाधान वाटले त्याचा रामण्णांनाही अनुभव मिळू दे. आपण दोघांनी सरलाताईची आठवण करून कृतकृत्य व्हावे. ह्या हट्टाने कुमुदने दुसऱ्यांदा तोच प्रश्न विचारला.

रामण्णांच्या लक्षातच कदाचित् हा प्रश्न आला नाही. दुसऱ्यांदा विचारल्यावर, मोहनकडे पाहत म्हणाले-"तुझ्यासारखेच डोळे आहेत." छे ! छे ! किती असंबद्ध गोष्ट ही ! इतकी स्पष्ट दिसणारी ही गोष्ट आणि 'ह्यां' ना दिसली नाही. रामण्णांनी काहीच असं सांगितलं नाही. पुन्हा म्हणाले-" मग काय, माझ्यासारखे डोळे आहेत मोहनचे. रामण्णांच्या ह्या उत्तराने आपण अगदी निराश होऊन गेलो होतो. नंतर कुमुदला तिथे उभं राहून गप्पा मारायची इच्छाच राहिली नाही मुळी. आपल्याकडे आलेल्या मोहनला पटकन् उचलून ती आतच निघून गेली होती.

छे पुरुष किती कृतघ्न असतात. कुमुद ह्या विचाराने किती दिवस बेचैन झाली होती. रामण्णांना, सरलाताईचे डोळे कसे होते ह्याची मुळीसुद्धा आठवण राहिली नाही ? मग आता कोणत्या आशेवर जीवन जगायचे ? पुरुषांचा हा असा स्वभाव आहे तर त्यांच्याशी संसार करणाऱ्या बायकांचं कसलं नशीब ?

होय. पुरुषांचा स्वभाव असाच असतो. आपण आपल्या आत्याबाईंचा अनुभव नव्हता का ऐकला ? बिचारी जुन्या-पुराण्या विचारांची म्हातारी. पण अजून मोठ्या अभिमानाने नवऱ्याबरोबर घालविलेल्या जीवनाच्या आठवणी सांगते. एकदा आत्याबाईंनी काय सांगितलं होतं बरं. . .हो, बरोबर आठवलं, आपण आत्याबाईंना विचारलं होतं- स्वैर वृत्तीच्या नवऱ्याला जवळ येऊसुद्धा देऊनये, तेव्हा आत्याबाईनी आपल्याला उत्तर दिले होते.-

'अग, कुमे पुरुष बाहेर काय करतो इकडे जर आपण लक्ष देऊ लागलो तर आपलं जिणं अगदी कठिणच होऊन जाईल बघ !"

तेव्हा आपण मोठ्या गर्वाने विचारले होते- "तर ह्याचा काय अर्थ झालापुरुष रोज रात्री, दुसऱ्या बाईला घेऊन झोपला तरी बायकोच्या अंगाचा तिळपापड नाही होणार !"

"वा ! म्हणजे आजकालच्या मुलींना ही गोष्ट वाईट वाटते तर !". . .आत्याबाईच्या ह्या प्रश्नाचे उत्तर आपण ताडकन् दिले होते.—"मी जे विचारले त्याचे उत्तर द्या, आत्याबाई !"

"हे बघ. कुमे, एका हाताने टाळी वाजत नाही. अग माझीसुद्धा चूक होती. मग मी कशी त्यांच्यावर रागावेन ग ?"

"आत्याबाई, तुमची कोणती चूक होती ?"

"होती ग, ती चूक मी टाळू शकत नव्हते. हे बघ कुमे, आमचं मोठं कुटुंब होतं. दहा दहा जोडपी होती. आमचं अकरावं जोडपं. ते घरात येत. तरी आम्ही आपल्या कामातच. काही त्यांनी विचारलं, तरी सासूबाईच उत्तर देत ! सुख-दुःखाच्या, चेष्टेच्या, गमतीच्या काही गोष्टी करायच्या तर सारे घरकाम आवरून आमच्या यजमानांकडे पोचेपर्यंत त्यांना गाढ झोप लागत असे. सकाळी त्यांना जाग यायच्या आधीच, पावलांचा आवाजसुद्धा न करता आम्ही कामाला लागायचे. सांग, त्यांना का वाईट वाटत नसेल ? ऐकतेस, का फक्त माझ्याकडे पहातच आहेस ?"

"आत्याबाई, तुम्ही जर खूप शिकल्या असता ना. . ."

"तर आमच्या काळात माझं लग्नच झालं नसतं." म्हातारी हसत हसत म्हणाली होती.

पण आत्याबाईचं बोलणं खरं होतं का ? जर घरात नवऱ्याला बायकोचा सहवास मिळाला नाही तर तो बाहेर जाण्याचे बहाणे करणार की नाही ? दिवसभर कचेरीत काम करून, थकून घरी आलेल्या पुरुषाला रात्री, बायकोचा कितीसा सहवास मिळतो ? जर बायकोसुद्धा नवऱ्यासारखीच वागली तर समाज ते सहन करील का ?

"जाऊ दे. रामण्णांना सरलाताईला विसरून जाण्याचं काही कारण नव्हतं !"

अथवा ?

कुमुदच्या मनात पहिल्यांदा जो विचार आला होता तो पुन्हा वर उसळला. रामण्णा सरलाताईला विसरले नाहीत पण आपल्यासाठी त्यांनी तसं म्हटलं असेल. किती अन्याय ! सरलाताईची आठवण आली तर आपण 'ह्यां'चा द्वेष करू हा विचार रामण्णांच्या डोक्यात आला तरी कसा ?

कुमुदने पुन्हा आरशात आपले प्रतिबिंब नीट न्याहाळले. आपल्याच प्रतिबिंबाची ती मोहक कांती पाहून कुमुदला कुठेतरी काटाच टोचल्यासारखे वाटले. रामण्णांच्या मनात हा विचार आलाच कसा ? कशी मूर्ख आहेस तू कुमुद ? रामण्णा तुझ्यावर प्रेम करीतच नाहीत. अजूनसुद्धा ते मोठ्या प्रेमाने सरलाताईचीच आठवण करतात. असं स्वत:शीच पुटपुटून, चिडून आपण किती वेळा, तोंड फिरविलं होतं ! तू . .

समोर तिचं स्वत:चंच प्रतिबिंब होतं. हे लक्षात आल्यावर मात्र कुमुदचा जोर कमी झाला.

तोपर्यंत कुमुदच्या डोळ्यांपुढील, काळा, जाड पडदा दूर झाला होता. कुमुद खोल विचारात बुडून गेली. काहीतरी जुनी गोष्ट पाहायची सोडून ती विचार करू लागली. विहिरीत टाकलेला घडा एक दोन मिनिटात-पाणी घेऊन वर येतो. त्याप्रमाणेच कुमुदचे डोळे अश्रूंनी भरून वर्तमान जगात परत आले. तेव्हाच कुमुदच्या लक्षात आलं. . आपलं वैवाहिक जीवन केवळ आपल्याशी आणि रामण्णांशीच संबंधित नाही. आपल्याला ही गोष्ट कळलीच नाही.

त्या दिवशी आपल्याला आत्याबाईनेच सांगितले नव्हते का ? घरात आणखी दहा माणसं असली म्हणजे नवरा-बायकोचा परस्पर सहवास सुखाचा होत नाही ? आत्या-बाईंना ही गोष्ट समजली होती. म्हणून त्या आपल्या यजमानांवर कधी रागवत नसत. एवढंच नाही तर जो थोडा सहवास मिळत होता त्यावेळी त्या आपल्या हृदयातील साऱ्या प्रेमाचा आपल्या नवऱ्यावर वर्षाव करीत. त्या प्रेमात डुंबल्यावर मन दुसरीकडे

कुठेच भिरभिरत नाही. खरोखर आत्याबाईंनी त्या दिवशी किती छान मार्गदर्शन केलं होतं पण तरी आपण आंधळ्याच राहिलो.

आपल्या आणि आत्याबाईंच्या परिस्थितीत किती अंतर आहे. हे कुमुदला माहीत होते. खरंच आपल्यापेक्षा आत्याबाईची बरी म्हणायची. रामण्णांनी आपल्याशी लग्न केले. त्यावेळी आपल्याला तेव्हा वाटलं होतं, घरात आपण दोघंच आहोत. आपण आणि रामण्णा ! किती मूर्ख आहोत आपण. घरात तिसरं माणूस हजर नाही पण मग मनात नाही का हजर ? सरलाताईची आठवण घरात तिसऱ्या माणसासारखीच होती. आपण काय केलं ? त्या व्यक्तीला टाळण्याचा आपण प्रयत्न केला. किती मूर्खपणा, का ? सरलाताईला आपलं आणि रामण्णांचं लग्न होऊ नये असं वाटत होतं ? रामण्णांनी उघडपणे तसं मान्य केलं असतं तर ? शिवाय रामण्णांनी किती तरी वर्षं सुखाचा संसार केला होता. तेव्हा त्यांच्या हृदयात सरलाताईची आठवण कायम स्वरूपात राहिली तर त्यात आश्चर्य ते कसले ?

रामण्णा आजमुद्धा, अजूनसुद्धा सरलाताईवर प्रेम करतात. . .असा विचार करून कुमुद . . .

सरलाताईची आठवण काढली तर कुमुदला वाईट वाटेल . . . हा विचार रामण्णा . . .

दोघे जण आतापर्यंत दोन्ही बाजूंनी विस्तव मध्ये ठेवून एकमेकांच्या जवळ येण्याचा प्रयत्न करीत आहेत.

घाबरूनच कुमुदने स्वत:ला सावरून घेतले. हे काय ? आपली विचारसरणी बरोबर आहे? पाणी शोधून शोधून थकलेले हरिण चमकणाऱ्या वाळूलाच पाणी समजते, त्याप्रमाणेच तिची स्थिती झाली. खरं म्हणजे आपण दोघे अपराधी आहोत तेव्हा सरलाताईची मूर्ती आपल्या मनातून न काढता, तिचे प्रेमच आपण मिळविले तर किती छान झाले असते.

कुमुदच्या डोळ्यांसमोर एक जुनी आठवण रंगीत चमकदार चित्रासारखी समोर उभी राहिली. आपलं लग्न झाल्यानंतर रामण्णा नेहमी सरलाताईंच्याबद्दल बोलत असत. कुमुदला ते आवडत नसे. पण रामण्णांना आपल्या जिभेला आवर घालताच येत नसे. बिचारे ! रामण्णा तरी काय करणार ? सरलाताईने किती वर्षे त्यांच्याबरोबर मोठ्या प्रेमाने संसार केला होता. रामण्णा ते सारे कसे विसरून जातील ? आपला आणि त्यांचा नुकताच परिचय झालेला. काय बोलणार ते आपल्याशी ? पण त्यावेळी ते सारं आपल्या लक्षात आलं नाही. आपण समजलो—सरलाताईबद्दलच रामण्णा

एकसारख्या गप्पा मारतात म्हणजे ते फक्त सरलाताईवरच प्रेम करतात ? ते चुकीचे होते ? मोहनवर प्रेम करूनसुद्धा आपण रामण्णांवर प्रेम करीत नाही ? त्याच प्रकारे सरलाताईच्या आठवणी काढून रामण्णा सरलाताईवर प्रेम करू शकत नाहीत का ?

कुमुदला हसूच आले. आदर्श प्रेमाचं जर कोणतं उदाहरण असेल तर आपल्या आत्याबाईचंच तिचं मन किती मोठं आहे. आपला नवरा कुठे बाहेर जातो, काय करतो हे सगळे माहीत असूनही ती त्यांच्यावर किती प्रेम करीत होती. आपण आत्याला विचारलं होतं . . . "आपला नवरा बाहेर गुण उधळतो ह्या कल्पनेनेच आपल्याला केवढा उबग येतो" तरीसुद्धा आत्याबाईने मोठ्या अभिमानाने उत्तर दिले होते, "नाही ग, कुमे. बाहेर हिंडून हिंडून आपल्या पुरुषाच्या सदऱ्यावर जर समजा कावळ्याने घाण केली तर काय आपण तो सदरा फेकून देतो ? छे, साबण लावून आपण तो स्वच्छ केलाच पाहिजे ना"?

"तर काय आत्याबाई, स्नान न घालता तुम्ही त्यांना घरातही घेत नव्हता ?"

"अग, त्यांचं मन स्वच्छ असलं तर स्नानाची काय जरूरी ? जर माझं मन साफ आहे तर तेच साबणासारखं नाही काय?" म्हातारीनं कशासाठी असल्या गोष्टी केल्या? का आपल्या प्रश्नाला सहजच अशी उत्तरं दिली ! काही का असेना, म्हातारीनं आपल्याला एक मोठं तत्त्वज्ञान समजावून सांगितलं होतं !

कुमुद एकदम खुर्चीवरून उठली. मनात विचाराचा एवढा गोंधळ चालला होता. म्हणून तिला एका जागी बसणं अगदी कठीण होऊन गेलं होतं. मनातील विचाराच्या तावडीतून सुटण्यासाठी ती इकडे तिकडे फेऱ्या मारू लागली.

हे खरं आहे ? हे खरं आहे ? हे खरे आहे ?

विचारांनी कुमुदचा अगदी पाठपुरावाच केला होता. विचार तिला सोडतच नव्हते. एकदम तिला पकडून घेत आणि पुन्हा निसटून जात. ती विचार करू लागली.

रामण्णा आपल्यावर प्रेम करतात हे खरं आहे. हे खरं आहे ! हे खरं आहे ! दुसऱ्या कुणावर विश्वास ठेवता आला असता का? पण कुमुदची अशी अवस्था होती की ठेवलेला विचार तिला स्वतःवर विश्वास ठेवणही कठिण होऊन बसलं होतं. दहा वर्षांपासून दाबून आता अशी वेदना, व्यथा निर्माण करीत आहे की जण काही हृदय फोडून बाहेर पडू पाहतंय. तो तिचा एक आवडता विचार होता. तो सिद्ध करण्यासाठी. बुद्धी सारे शक्यअशक्य तर्क गोळा करीत होती.

जेव्हा ती आत्याबाईच्या घरी निघून गेली होती तेव्हा रामण्णांनी तिला शोधून घरी आणलं होतं. ती घरी परत आली तेव्हा रामण्णांनी मोहनवर किती प्रेम केले. जेव्हा तिला तापाचा संशय आला तेव्हा तिला हात लावून तिचा ताप पाहताच रामण्णा

डॉक्टरकडे धावत धावत गेले होते. आपल्याबरोबर काही शरीरसंबंध न ठेवताही रामण्णांनी आणखी कुणाकडे धाव घेतली नाही. त्या दिवशी त्यांनी स्वत:हून आपल्या-साठी साडी आणली होती.

अशा एक का दोन गोष्टी होत्या का ? संशय-पर्वताचे शिखर पडताच असे वाटले की जणू सगळा पर्वतच पडून गेला. एका मागून एक जुन्या आठवणी आल्या-नंतर तिचा श्वासच जणू काही अडखळला.

सुरवाती सुरवातीला आपण रामण्णांच्या कामतृप्तीचे एक साधन होतो, ही गोष्ट खरी होती. . . . पण नंतर त्यांनी आपल्याशी लग्न केले हेही खरे आहे. अशा वागणुकीकडे समाज तिरस्काराने पाहतो. जर लग्न झाले नसते तर समाजाने तिला बहिष्कृत केले असते. परंतु रामण्णांनी आपल्याशी लग्न नाही का केले ? लग्न करण्यासाठी त्यांना दुसऱ्यांनी आग्रह केला नव्हता. मग आपल्यावर रामण्णांचं प्रेम होतं म्हणूनच त्यांनी आपल्याशी लग्न केलं असं का नाही समजायचं ? आपल्यावर केवळ उपकार म्हणूनच त्यांनी आपल्याशी लग्न केलं, असा हट्टीपणा आपण का करायचा ? रामण्णांच्या जीवनात दुसऱ्या कोणत्याही स्त्रीला स्थान नाही. हे कुमुदला चांगले माहीत होते. सुरवाती सुरवातीला मात्र आपणाकडे ते केवळ काम-तृप्तीसाठी, सेक्ससाठी येत होते हे अगदी खरं आहे. होय. पण त्यात त्यांचा काय दोष होता ?

दुसऱ्या कुणाशी वादविवादच करीत आहोत अशा थाटात कुमुद पुन्हा खुर्चीवर जाऊन बसली.

ती पुन्हा एकदा स्वत:शीच पुटपुटली— "त्यात त्यांचा काय दोष होता ?" आजकाल समाजाची नीती बदलली आहे. मुलं-मुली लग्नापूर्वी स्वतंत्र वातावरणात वाढतात. पुन्हा समाजात एक दुसऱ्याशी मिसळतात, भेटतात. परास्परांशी त्यांचा स्नेह जडतो. परास्परांशी परिचय वाढल्यावर दोन हृदयांचे मीलन होते. मग ती दोघे विवाहबद्ध होतात. विवाहाच्या आधी एक दोनदा जरी त्यांनी सेक्स, काम-तृप्तीचा अनुभव घेतला तरी त्यात कुठे बिघडले ?

कुमुद एकदम थरथरली. एखादा असह्य बोझा उचलल्यामुळे जणू तिचे सर्वांग कापून निघाले. आपली ही विचारसरणी बरोबर आहे ? ज्या संबंधामुळे समाजात स्थान आणि कर्तव्याचा निर्णय घेतला जातो त्या संबंधाला इतके तुच्छ मानणे योग्य आहे का? कुमुदला वाटले— प्रेम जर खरे असेल तर वासनांना काही महत्त्व नाही. तिने आपले आणि रामण्णांचे अनुभव आठवले. त्या दोघांची भेट कशी झाली ? वासनांच्या

तृप्तीसाठी नव्हे. दोघांना एकमेकांशिवाय चैन पडत नसे. दोघे एकमेकांना पाहून स्वतःला विसरून जात. एकाचे सुखदुःख सहन करण्यास दुसरा तयार असे. दोघांच्या हृदयाचे मीलन झाल्यावर दोघांची दोन शरीरे एक झाल्याची शुद्धही राहत नसे. दोघांनी एक होऊन जावं अशी इच्छा होती असंही नाही. पण दोघांनी एक होण्याशिवाय दुसरा कोणता उपायच राहिला नव्हता. हृदयांचे परस्परमीलन झाल्यावर काहीच शिल्लक राहिले नव्हते. समाज खरं म्हणजे मोठीच चूक करीत आहे.

हृदयांचे मीलन न होता फक्त दोन शरीरे एकमेकांशी . . म्हणजे खरं म्हणजे वेश्या वृतीच. लग्न झालेले असले तरी ती वेश्यावृतीच. आपल्याच विचारांनी कुमुद घाबरून उठली. हे काय ? तिला भीती वाटली की दहा वर्षे आपला पुरुषाशी संबंधच न आल्यामुळे आपल्या मनात असे विचार उठत आहेत ? ह्या भीतीबरोबरच कुठून तरी एक आनंदाची भावना निर्माण झाली.

हो. मोहनला बरोबर घेऊन सत्कार–सभेला जायला हवे. पण मोहन अजून का आला नाही ? त्याच्या येण्याची वेळ होऊन गेली. . .जाऊ द्या. इथे कुठे सभेला जाण्याची घाई आहे ? मोहन आल्यावरच त्याला घेऊन सभेला जाऊ.

पण . . .

कुमुदला एकदम घाई झाली. इतकी मोठी सभा. किती लोक येणार आहेत ? रामण्णांनी उंची, भारी कपडे घातलेत ? छे, त्यांनी धड नीट चांगले कपडेसुद्धा घातले नसतील, असा कुमुदचा पक्का विश्वास होता. होय, पुरुषाचा स्वभावच असा असतो. आज खरं म्हणजे रामण्णांनी चांगले भारी कपडे घातले पाहिजेत. . . . म्हणून ती भारी भारी कपडे काढू लागली. तेव्हाच कुमुदच्या लक्षात आलं, आपले हात पाय थरथर कापत आहेत. आणि आपल्याला धड नीट श्वास ही घेता येत नाही. ! पण पुन्हा तिने विचार केला की, छे, ह्या गोष्टीकडे लक्षच देता कामा नये म्हणून कपडे काढण्यासाठी तिने ड्रॉवर उघडणे आणि बंद करणे सुरू केले.

## १४

रामण्णा घाबरून ताडकन् उठले. हा कुठला आवाज ? ओ ! खाली ही आदळ आपट कसली ? ' ' ' असं स्वतःशी पुटपुटतच ते पायऱ्यांकडे उतरू लागले. पण पुन्हा विचारांना सावरून धरून ते तिथेच उभे राहिले. हात झटकून त्यांनी एक दीर्घ सुस्कारा

टाकला. कुणास ठाऊक. कदाचित आपल्या बरोबर सभेला यायला लागत आहे म्हणून कुमुद रागावली आहे की काय ? का ? रामण्णा स्वतःशीच हसले आणि पुन्हा विचार करू लागले. . . .का रागात आल्यावर टेबलाचे ड्रावर जोर जोराने ओढायलाच पाहिजेत का ? असा काही नियम आहे की काय ? कधी कधी आनंदानेसुद्धा असे केले जाईलच की ! खूप उत्सुकता असली म्हणजेसुद्धा असे होऊ शकते. आणखीसुद्धा अनेक कारणांनी असे होऊ शकते.

कुमुद रागावलेली दिसत नाही. ओ हो, आवाज कमी कमी होत चाललाय. बसण्याच्या आधी त्यांनी पुन्हा एकदा खिडकीतून डोकावले आणि मग बसले. स्वागत समितीवाले लवकर आले तर बरं. का कुणास ठाऊक मनात असं विचित्र का वाटतंय ! काही अनपेक्षित घटना घडणार असली तरीसुद्धा मन आनंदाने नाचू लागते. किंवा भीतीने गडबडूनही जाते.

मानवी मनच मोठं विचित्र आहे. साऱ्या जगाला एकाच बाँबमध्ये नष्ट करून टाकणारे, अणुबाँबचा शोध लावणारे, मानवी मनाचे काही संशोधन का करीत नाहीत ? पण तसे न करता ते अणु बाँबचेच संशोधन करीत आहेत. म्हणून भवभूतीने म्हटले आहे ना किमपि किमपि अर्थात ह्या गोष्टींच्या मागे काही रहस्य आहे ?

आता ही भीती राहिली नाही. ही कशी मजेशीर गोष्ट आहे. कुमुद रागात आहे असं आपल्याला का वाटलं ? का आपण कुमुदला घाबरतो ? लग्नाच्या पूर्वीच्या मनःस्थितीत रामण्णा असते तर त्यांना कुमुदचा ड्रावर ओढण्याचा आवाज ऐकून वाटले असते की कुमुद खुशीत आहे. जे होणार, घडणार ते काही कुणाला टाळता येत नाही. त्याचा अर्थ लावणे आपल्या मानसिक स्थितीवरच अवलंबून आहे. .

अर्थात . . . ?

रामण्णांनी डाव्या हाताच्या आंगठ्याने, आणि तर्जनीने कपाळ धरले. डोळे मिटून घेतले. आणि एकाग्र होऊन ते विचारात बुडून गेले.

कोणत्याही घटनेचा अर्थ लावणे मनाच्या स्थितीवरच अवलंबून असते.

म्हणजे ? मनाला जरा आवरून धरले तर ती घटना आपल्याला अनुकूल वाटते. कुमुदलासुद्धा आपण नीट समजावून सांगितलं तर तीसुद्धा . . . ? उं हूं . . . इथे रामण्णांचे विचार कुठे तरी भटकू लागले. ते स्वतःशीच पुटपुटले . . . त्यांना वाटले आज काहीतरी अनपेक्षित घटना घडणार आहे का ? हे सांगणे कठीण आहे. कारण कारणाचा पत्ताच नाही. कार्याची मात्र कल्पना आहे. जर हे खरे आहे कर कुमुदने आपल्याला नीटपणे हूं . . . काही का असेना आपण ही जबाबदारी दुसऱ्यावर सोपवीत

आहोत. ही आपलीसुद्धा चूक नाही का ? जर आपण कुमुदवर इतके प्रेम करीत आहोत तर ही भीती कशासाठी ? आपल्या प्रेमाबद्दल तिला भरोसा, विश्वास तर वाटायला हवा ना !

कुमुदला आपण प्राणांहून प्रिय आहोत ह्यात खरं म्हणजे रामण्णांना काहीच संशय वाटत नव्हता. लग्नाच्या आधीच ती त्यांची झाली होती आणि तेव्हापासूनच त्यांची खात्री झाली होती. पण तरीसुद्धा ती गेली कित्येक वर्षं आपल्याशी अगदी अस-हकार करूनच संसार चालवीत आहे. हा कसला तिचा त्याग ? तिच्या ह्या त्यागात सुख आहे ? रामण्णांच्या आणि कुमुदच्या वयात चौदा पंधरा वर्षांचे अंतर आहे, अरेच्या ! हे काय ? रामण्णांच्या मनाने पुन्हा तोच रस्ता पकडला. विवाहित जीवनात तृप्तीचा अर्थ का फक्त कामतृप्तीचाच असतो ? हा विचार आपला स्वतःचा नाही. हजारो वर्षांपासून चालत आलेला विचार तोच त्यांच्याही जीवनाचे अंग बनून गेला आहे. का, सृष्टीमध्ये प्रत्येक पुरुष-प्राण्याचा हाच विचार आहे? हे शक्य आहे? पुरुषांचे समाधान केवल कामतृप्तीत सेक्स सॅटिसफॅक्शन मध्येच आहे ? त्याच्याशी संबंधित काही जबाबदारी त्यांच्यावर नसतेच. स्त्रीची गोष्ट मात्र निराळी आहे. सेक्स तिच्यावर एकप्रकारची जबाबदारी लादते. पुरुषाची कामतृप्ती रात्रीच्या चोराप्रमाणे आहे. आपले केलेले सारे लपविले जाते. स्त्रीची कामतृप्ती मात्र दिवसाच्या चोराप्रमाणे आहे. तिने केलेलं लपविणे शक्य नाही. कामतृप्तीबाबत स्त्री आणि पुरुषांचे विचारमुद्धा परस्पर-भिन्न असले तर ? रामण्णा मनाशी पुटपुटले, हा विचार आताच का आपल्या डोक्यात आला ? दहा वर्षं झाली, आपला स्त्रीशी संबंधच आला नाही. ओहो ! रामण्णांच्या डोक्यात ताबडतोब एक नवाच विचार टपकला आणि त्यांनी स्वतःचीच पाठ थोपटून घेतली. लगेच इकडे तिकडे पाहून ते जणू लाजूनच गेले. जर कुणी त्यांना पाहिलं असतं तर खचितच वेडं ठरविलं असतं.

पण खरं म्हणजे ती पाठ ठोकून घेण्यासारखीच गोष्ट होती. त्यांनी पुन्हा विचार केला.

आपण दहा वर्षे ब्रह्मचर्यव्रताचे पालन करीत आहोत, परंतु ह्या एवढ्या काळात आपल्याला कुमुदशिवाय आणखी दुसऱ्या कोणत्याही स्त्रीच्या सहवासाची इच्छा झाली नाही. कुमुदवर आपले प्रेम आहे . . . हे सिद्ध करण्यासाठी आणखी दुसऱ्या कोणत्या दाखल्याची जरूरी आहे ?

रामण्णांच्या डोक्यात क्षणभर विचारांचा गोंधळ उडाला. खरं आहे हे ? आपण कुमुदच्या प्रश्नांची इतकी सहजपणे उत्तरं देऊ शकू ? ह्या एका गोष्टीने कुमुदच्या मनाचे समाधान होईल ?

रामण्णांनी निराशेने एक सुस्कारा सोडला. आपण वेडे आहोत, का वेडे होतो ? का इतके मूर्ख आहोत ? अशा गोष्टी केल्या तर कुमुदच का, दुसरी कोणतीही स्त्री खूश होईल. शेवटी तिला हट्टीच म्हटलं जाईल ना ? खरं आहे. जर एखादा मुलगा कुठल्यातरी पदार्थासाठी हट्ट धरून बसला तर ह्याचा अर्थ असा होत नाही की त्याला दुसरा कोणताही पदार्थ नको आहे. त्याच्या आवडीचा पदार्थ मिळाला नाही तर तो दिवसभर उपाशी राहील पण त्या मुलाला केवळ तीच खाण्याची वस्तू हवी, असं आपण कुठं म्हणू शकतो ?

पण कुमुदबरोबर चर्चा केली तर ती म्हणेल . . मी पण एक हट्टी मुलासारखीच आहे. पण रामण्णांचा ह्या गोष्टीवर विश्वास बसला का? आपण संपूर्ण मनाने कुमुदवर प्रेम करतो ह्या गोष्टीत काही संशयच नाही...म्हणजे आधी ह्या बाबतीत संशय होता. छे, त्यांना संशयच नव्हता मुळी . मग ?"

रामण्णांनी रागाने डोकं हलविलं...जणू काही आत चाललेल्या संघर्षाला बाहेरची वाट करून दिली. जर असं आहे तर त्यांनी आपली पाठ का ठोकून घेतली ?

ओहो !...लक्षात आलं. आपण आता कुमुदला नीट समजावून...असं स्वतःशीच पुटपुटून त्यांनी आपली पाठ थोपटून घेतली. ह्या विचारानी त्यांना जरा हिम्मत आली...तुझ्याशिवाय मी दुसऱ्या कुणाला स्वप्नातसुद्धा पाहिलं नाही...असं आपण तिला सांगितलं तर ?

...असं सांगितलं तर ? बरं होईल. एक करून आपण कृतकृत्य झालो असे वाटेल. पण कुमुदचा ह्यावर विश्वास बसेल असं कस म्हणता येईल ? तसं बघितलं तर रामण्णा काही नवीन थोडंच सांगत होते. . .की कुमुदचा त्यावर विश्वास बसेल. कुमुदला काय रामण्णांची वागणूक माहीत नाही ? रामण्णाचं लक्ष दुसऱ्या कोणत्याही स्त्रीकडे नाही. हे माहीत असूनही कुमुद त्यांच्याबद्दल अगदी निराश होऊन गेलेली आहे. हीसुद्धा दुष्यंत शकुंतलेची कथा होऊन जायची–फरक इतकाच की त्या नाटकात जी परिस्थिती शकुंतलेची झाली ती इथे दुष्यंताची— म्हणजे रामण्णांची— झाली आहे. बिचाऱ्या शकुंतलेची तर काय अवस्था झाली. शकुंतला बरोबर साऱ्या वडिलधाऱ्या प्रिय जनांनी दुष्यंताला सांगितले— "ही आपली लग्नाची बायको आहे. आपल्या मुलाची ती आई बननार आहे. आम्ही हिला आप त्याकडे सोपवितो. माहेरी किती दिवस राहणार आपण तिचा स्वीकार करावा !" दुष्यंत म्हणाला— "ही सुंदर मुलगी स्वीकार करण्यासारखीच आहे. पण मी तिच्याशी लग्न केले हे मला मुळीच आठवत नाही. म्हणून मी तिचा स्वीकार करू शकत नाही." तेव्हा बरोबरच्या वडील माणसांनी शकुंतलेला सांगितले. .. "ह्यांचा विश्वास बसेल अशा काही गोष्टी

तू सांग..." तेव्हा शकुंतलाने सांगायला सुरवात केली, "एक दिवस आपण लता–कुंजात कमलाच्या पानांमध्ये पाणी भरून हरिणाच्या बछड्याला–दीर्घापांगला पाजू लागलात. आपण खूप प्रयत्न केलात, पण त्या हरिणाने पाणी घेतले नाही. तेव्हा मी आपल्या हातातून तो द्रोण घेतला. हरिणाच्या बछड्याने लगेच माझ्या हातातील पाणी पिऊन टाकले...तेव्हा आपण हसत हसत म्हणालात. सर्वांचा आपल्या आपल्या माणसांवरच विश्वास आहे." दुष्यंताचा ह्या गोष्टीवर विश्वास बसेल असा विचार करून शकुंतला-सुद्धा गालातल्या गालात हसली. तेव्हा दुष्यंत म्हणाला, "गोष्ट छान आहे. ह्यावरून हेच स्पष्ट होते की स्त्रिया खोटी गोष्टसुद्धा किती आकर्षक बनवून सांगतात. अगदी अशीच माझी अवस्था होऊ शकते. जर कुमुद म्हणाली—दुसऱ्या स्त्रीकडे लक्ष न देण्याचे कारण, ब्रह्मचर्यपालन होतं का वाढत्या वयाचा प्रभाव ? तर...रामण्णा एकदम घाबरून गेले. त्यांनी विचार केला. सत्यावर विश्वास ठेवणं जर सोपं नाही तर त्याहून आणखी मोठी ट्रॅजिडी कोणती ? आपल्याकडे ट्रॅजिडी शब्द नाही म्हणून त्या जागी 'दुर्दैव' शब्दाचा उपयोग केला पाहिजे.

होय. दैवाबद्दल आताच आपल्या डोक्यात विचार आला. विचार कोणताही असू दे. 'दैव' म्हटल्याने काही जबाबदारी संपत नाही. माझी जबाबदारी कोणती आहे ? मी कुमुदवर प्रेम करतो. पण तिचा ह्या गोष्टीवर विश्वास नाही. ह्यात माझी जबाबदारी कोणती ? तिचा विश्वास निर्माण करण्यासाठी काय केले पाहिजे ? कसे सांगितले पाहिजे ? नाही. ती माझी जबाबदारी नाही. कुमुदवर प्रेम करतो ह्या गोष्टीवर विश्वास ठेवून मला शांत राहिले पाहिजे. हीच माझी जबाबदारी आहे.

"शाबास ! ...म्हणजे असं म्हटलं पाहिजे की हाताची घडी करून गप्प बसणे हीच आपली जबाबदारी आहे. वा ! मी कोणत्या महान निर्णयापर्यंत पोचलो..." असं म्हणून रामण्णा स्वत:लाच हसू लागले. नंतर त्यांनी विचार केला—नाही तर हाताची घडी करून चूप बसण्याशिवाय आपण करूच काय शकतो मुळी !

हा विषयच असा आहे. "तुझ्यावर माझे खूप खूप प्रेम आहे" असं नुसतं म्हणून कोण ऐकणार आहे ? 'प्रेम आहे' ह्याचा अनुभव आला पाहिजे. तेव्हाच कुणाचा विश्वास बसेल. कुणाच्या तोंडी सांगण्याने विश्वास बसत नाही...कथा, कादंबऱ्या, नाटकात लिहिले जाते...नायक म्हणतो—"प्रिये, मी तुझ्यावर प्रेम करतो" नायिका म्हणते.—"प्रियतम. मी तुमच्यावर प्रेम करते." व्यवहारातसुद्धा ही गोष्ट इतकी साधी, सरळ, सोपी असती तर एक एक क्षणाला एक एक प्रेम–विवाह झाला असता. रामण्णा स्वत:शीच पुटपुटले—"आपणसुद्धा एक साहित्यक आहोत. आपल्यालाही मनुष्यस्वभावाचा थोडा परिचय आहे. ज्या मादीची तो इच्छा करतो, त्या मादीवर प्रेम करणे हा त्याचा नैसर्गिक

स्वभावच आहे. मनुष्याची ही स्वाभाविकच वृत्ती आहे. परंतु कुटुंबप्रेमी मनुष्यप्राणी तर नेहेमीच आपल्या प्रियजनांना आपल्याजवळ ठेवू इच्छितो. म्हणून मनुष्याची प्रेमाची कल्पना निराळ्याच तऱ्हेची आहे...तो...

रामण्णा घड्याळाकडे पाहून झटकन उठले. "छे, कुणास ठाऊक. डोक्यात विचारांची एवढी झुंबड का माजली आहे...विचार वाटेल तसे डोक्यात नुसता थयथयाट करीत आहेत. भुवया उंचावून ते स्वतःशीच पुटपुटले,

"ही जळली सभा, लवकर सुरू नको होती का व्हायला ?

हो आलं लक्षात, कुणाचा राग आपण कुणावर कुणावर काढीत आहोत ?"

रामण्णा थकून गेले आणि स्वतःशीच विषण्णपणे हसले. पण तरी त्यांना वाटत होतं की, थोडासा उल्हास मनात आहे...त्याची आपल्याला कल्पनासुद्धा नाही. असा कोणता उत्साह ? दहा वर्षांच्या तपस्येतून मुक्ती मिळेल. कुमुदशिवाय मला कोणी प्रिय नाही. ती सुखात राहो, एवढंच मला पाहिजे. ती माझीच असू दे हासुद्धा हट्ट नाही माझा.

हो, हो, जरा थांबा. ही का वैराग्याची तयारी आहे का म्हातारपणाचे लक्षण ?

छे दोन्ही नाही. अगदी स्वतःची शपथ. ती आनंदात इथें राहू दे. ह्यातच मी खुश आहे. ती, तिचा मोहन...छे, त्या दोघांचे अस्तित्व वेगळे वेगळे नाही. मोहन तर तिचाच अंश आहे. मी तिच्यावर जितके प्रेम करतो, तितकेच मोहनवर प्रेम करतो. ते एकदुसऱ्याचेच भाग आहेत. निरनिराळे नाहीत. कुमुद माझ्यावर प्रेम करते, हे मी जाणतो. म्हणूनच ती आजच्या सभेला यायला तयार झाली. माझा जो सन्मान होईल तो पाहून तिला खूप आनंद होईल. आणि तिचा आनंद पाहून मलाही आनंद होईल. जेव्हा आम्ही दोघे आनंदात राहू तेव्हाच आमची दृष्टी एके ठिकाणी म्हणजे मोहन-वरच राहील.

डोळ्यांतून ओघळणारे अश्रू पाहून रामण्णा मोठ्याने म्हणाले—"मोहनसुद्धा सभेला येईल !"

पुन्हा खिडकीजवळ जाऊन म्हणाले—"मोहनसुद्धा सभेला येईल !" तरीसुद्धा समाधान झालं नाही म्हणूनच की काय, पायऱ्यांपाशी जाऊन म्हणाले—"मोहनसुद्धा सभेला येईल !"

## १५

कामात गुंतलेली कुमुद एकदम थांबली. काही ऐकू आले ? कुणी काय बोललं ? मनाशी पुटपुटतच कुमुद एखाद्या बाहुलीसारखी अगदी निश्चल उभी राहिली. बाहुली-सारखी सुद्धा नाही कारण त्या बाहुलीला उभं राहायला तरी पाय होते, पण तिला तर पायच नाहीत. पायात शक्ती नाही. मांडीवर हात ठेवून जिथे उभी होती तिथेच मटकन् बसून राहिली. . . .''मोहनसुद्धा सभेला येईल.'' हो, हा रामण्णांचाच आवाज आहे. तो आवाज पायऱ्यावरून खाली उतरून आला. तो आवाज तिला दोरासारखा वाटला. त्याच्या आधाराने ती हळू हळू उठली. आरशाजवळ जाऊन उभी राहिली. कपाळावर आलेल्या केसांच्या बटा मावरून घेतल्या. हे काय ? हात ओले झाले ? कपाळावर घाम ? का ? का ? का ? छातीत जोराने धडधड होत होती. दुःख आनंद, दोन्हींची लक्षणे एकच असतात. भीती, घाम, अशक्तपणा . . .ह्यांचा परिणाम म्हणून तिच्या शरीरात एवढी शक्ती कोठून आली ? आता तिला आनंद झाला आहे. मोहनला सुद्धा सभेला यायला पाहिजे असं कुमुदला वाटत होते. रामण्णासुद्धा तेच म्हणत होते म्हणून तिला आनंद झाला होता. जेव्हा तिचे आणि रामण्णांचे विचार एकच असत तेव्हा तिला वाटे, आपल्याला रामण्णांचा स्पर्श झाला आहे. स्पर्श झाल्यावर आपले शरीर थरथरते, आपण अगदी घामाघूम होऊन जातो. पावलातली सारी शक्ती निघून जाते. का ? का ? का ?

आनंदाने तिने स्वतःलाच हा प्रश्न विचारला.

किती युगांचा अनुभव. किती वर्षांचा अनुभव. तिला वाटलं की आपलं शरीर त्या दिवशींचा तो अनुपम, अलौकिक आनंद पुन्हा पुन्हा आठवीत आहे. एक वेळचा प्रत्यक्ष अनुभव परोक्ष रूपाने आठवला जात आहे. पहिल्यांदा तो अनुभव आल्यावर तिला वाटले- आपला स्त्रीचा जन्म सार्थक झाला. रामण्णांचे आणि आपले अस्तित्व निराळे आहे हे माहीत असूनसुद्धा तिला वाटत होते...आपल्याला तसं काहीच उमगत नाही का ? दुःखाच्या वेळीही सुखाचा अनुभव येत होता. क्षणिक असूनसुद्धा तो चिरंतन वाटत होता. दुसऱ्याचा स्पर्श असूनसुद्धा दुसऱ्याचा वाटत नव्हता. आठवण होताच कुमुद घाबरली. उभं राहण्याची ताकत तिच्यात नव्हती म्हणून ती खुर्चीवर जाऊन बसली. तिला इतकी भीती वाटली. जणू ती स्वतःलाच विसरून गेली. म्हणून तिने आरशात आपले प्रतिबिंब पाहिले. शरीर गरम नाही. मग श्वास का गरम लागतो ? ती डोळे बंद करून बसली. घर, सभा, सत्कार सारं सारं विसरून गेली. ती आता एका निराळ्याच जगात विहार करू लागली.

तो कोणता दिवस होता बरे ? त्याच्याशी म्हणा काय करायचे ? तिच्या जीवनात चिरंतन आनंद देणारा तो दिवस. रामण्णा काही तरी लिहीत होते. त्यांच्या टेबलासमोर एक आरसा होता. आपण खूप वेळपर्यंत दुरूनच पाहत होतो. रुंद बाहू. लिहिताना त्यांचा उजवा बाहू थोडा थोडा हलत होता ? डोक्यावरचे केस विस्कटलेले होते. डाव्या हाताने मधूनच ते कान खाजवीत होते. आपण हळूच जाऊन खुर्चीच्या मागे उभ्या राहिलो. खुर्चीच्या जवळच उभी राहणार होतो पण खुर्चीला हात नव्हते. किती वेळ आपण उभे राहिलो कुणास ठाऊक ! समोरच्या आरशात आपले प्रतिबिंब दिसत होते. पण रामण्णांचे तिकडे लक्षच गेले नव्हते. एकदा त्यांनी डोके वर उचलले. कपाळ हाताने पुसून काढले. तरीसुद्धा आपल्याकडे त्यांचे लक्ष गेले नाही ? किती एकाग्रता ! आपण हळूच मागे उभे राहून त्यांच्या केसातून हात फिरवू लागलो. त्यांचं लक्ष उडायचं नाही ना ? त्यांच्या एकाग्रतेत व्यत्यय तर यायचा नाही ना ? पण त्यांना तर बाह्य जगाचे काही ध्यानंच नव्हते. आपल्याला मात्र वाटल, की की कुणीतरी आपल्याला चिडवीतच आहे. ही एकाग्रता आहे ? का आपला अनादर आहे ? अशा प्रकारे ह्यानी आपला अनादर करावा ? जरा मुद्दामच ती रामण्णांच्या जवळ गेली. एक मिनिट झाले. उजव्या हाताने लिहिण्याचे काम चालूच होते डावा हात मात्र हळू हळू आपल्याला जवळ जवळ ओढू लागला. ह्यांच्या लिहिण्यात अडथळा आला ? छे, छे, लिहिणे तर चालूच होते. डाव्या हाताने आपल्याला जवळ ओढून घेतले होते. त्या हातात केवढी ममता होती. किती कोमल होता तो स्पर्श. त्या डाव्या हाताने त्यांनी आपल्याला हळू हळू खाली ओढले. तेव्हा ती रामण्णांच्या मांडीवर बसली. पण तरीसुद्धा रामण्णांचे तिकडे लक्ष नव्हते. असं कशाला ? कदाचित् आपल्यालासुद्धा शुद्ध नव्हती. थोडा वेळ खरंच आपल्या कळलंच नाही की आपण कुठं बसलो आहोत. कुणी कुणाशी बोललंही नाही. दोघे जण असे बसले होते जणू दोन्ही हृदये मिळून एक झाली आहेत. त्यांच्या लिहिण्याकडे पाहण्यात आपण दंग होतो आणि आपल्याला कुरवाळण्यात रामण्णा दंग होते. खांद्याला खांदा, गालाला गाल, लागले होते. आणि आपल्या कमरेवर रामण्णांचा हात होता, जणू दोन शरीरांना भेदून आतल्या दोन्ही हृदयांचे मीलन होईल. काहीही न बोलता, डोळे बंद करून, आपण तिथे किती वेळ बसलो होतो कुणास ठाऊक !

त्या तन्मयतेमध्ये आपल्याला तो आनंद मिळाला तो आपण कधीसुद्धा विसरू शकणार नाही. त्या आनंदाची आठवण करून, त्याचे रसास्वादन करण्यासाठी तिने आपले डोळे मिटून घेतले.

कुमुदला केवढा उत्साह आला. रामण्णांसाठी चांगले भारी कपडे काढून ठेवले. मोहनसाठी सारी तयारी करून घेतली. आपण नीट तयार झालो? रामण्णांच्या सत्कार-

सभेत आपण कशाला एवढं नटून जायचे ? रामण्णा लेखक आहेत. मग काय झाले ? आपण सुद्धा लेखकाची अर्धांगिनी आहोत. त्या दिवशी रामण्णांच्या मांडीवर बसलो होतो तेव्हा आपल्याला वाटल होतं. . .की आपणच लिहीत आहोत.

नंतर त्यावेळी आपण विचारलं होतं. . . ."तुमच्या एकाग्रतेत अडथळा आला म्हणून रागावला तर नाही ना ?"

"कोणती एकाग्रता !"

"लिहिण्यातली. . .?"

"ओ हो ! कुमुद, तू कसा प्रश्न विचारतेस ग ? लिहिते वेळी प्रत्यक्ष प्रेरणाच येऊन दरवाजा ठोठावू लागली तर लेखकांची एकाग्रता भंग पावत नाही."

"मग स्फूर्ती मिळवण्यासाठी डोकं खाजवीत होता का ?"

"नाही, ग, आलेल्या प्रेरणेला, स्फूर्तीला पचवून टाकायची शक्ती आणण्यासाठी डोकं खाजवीत होतो."

"कसली प्रेरणा. आता आपण दोघंच आहोत. पण उद्या तिसरं कुणी येऊ द्या. . . . म्हणजे..."

"अग, येणार नाही. येऊन मांडीवर बसले म्हणजे. . .आणि बोलता बोलताच रामण्णा जोरजोराने हसू लागले.

आपण रामण्णांची प्रेरणा आहोत. आपल्या येण्याने ह्यांच्या लेखनात कुठलाही अडथळा येत नाही. उलट लिहायला उत्साहच येतो. तेव्हा आपल्याला किती अभिमान वाटला होता. रामण्णांच्या लेखनाला आपली किती आवश्यकता होती ? मग तर आपण अधिकच दक्ष राहायला हवे. आई जशी लहान मुलाचे पालनपोषण करते तसेच आपण रामण्णांच्या लेखनाचे पोषण केले पाहिजे. हा विचार मनात आल्यावर, आपल्याला रात्रभर झोप आली नव्हती. . . .उठून, आरामात झोपी गेलेल्या रामण्णांना पाहिले. छे, खरं म्हणजे हे एक लहान मूलच आहे. खेळून खेळून दमून गेलंय, किती रुंद छान कपाळ आहे. असा विचार येताच आपण झटकन् त्यांच्या कपाळाचे चुंबन घेतले होते. अय्या ! ...फसलो ग बाई. म्हणजे "हे" झोपलेले नव्हतेच. चुंबन घेण्याकरिता आपण खाली वाकलो. पण आपल्याला आपले तोंड वरती उचलताच आले नाही. आपण रामण्णांची स्फूर्ती होतो. रामण्णांची सरस्वती होतो. कालिदासाच्या तोंडावर तोंड ठेवून विद्येचा वर देणारी सरस्वती होतो आपण. रामण्णांची स्फूर्ती. . .लेखक रामण्णां-पासून वेगळ्या नव्हतो. लेखक आणि स्फूर्ती दोन्ही एकच असतात. एकाला दुसऱ्यापासून वेगळे केले जात नाही. . .करता येत नाही. ह्या दोघांच्या तादात्म्यापासूनच कलाकृतीची

निर्मिती होते. मोहनरूपी कलाकृतीनेसुद्धा त्याच दिवशी रूप धारण केले होते. ते आपण कसे विसरू शकू ? रामण्णा जेव्हा मोहनला बोलावतात आणि जेव्हा त्यांच्या तोंडून 'मोहन' शब्द बाहेर पडतो तेव्हा त्या दिवसाच्या अनुभवाचे चित्र आपल्या डोळ्यांसमोर उभे राहते.

कुमुद हळूच उठली. तिला वाटलं, आपण आता रामण्णांच्या मांडीवरच बसलो आहोत. खुर्चीवरून उठून . . . खुर्चीतल्या गादीला आपल्या मांडीवर ठेवून, ती पुन्हा बसली.

ती स्वतःशीच म्हणाली, "मी किती सुखी आणि त्याचबरोबर किती दुर्दैवी आहे."

दुर्दैवी नाही तर आणखी काय ? रामण्णांनी जितक्या एकाग्र मनाने लिहिले, तितक्याच एकाग्रतेने आपल्यावर प्रेम केले नाही ? केले असेल...ह्यात खरं म्हणजे संशय घ्यायला कोणतीच जागा नाही. रामण्णांनी जी पुस्तके लिहिली त्या पुस्तकातील स्त्री पात्राशिवाय त्यांचे दुसऱ्या कोणत्याही स्त्रीकडे लक्ष नव्हते. तरीसुद्धा आपण दुर्दैवीच आहोत.

शी ! हा कसला विचार. मनात एक विशेष उत्साह असताना, कुठल्या तरी अनपेक्षित घटनेच्या आशंकेने जुन्या चुकांचा पाढा कशाला वाचायचा ? जणू काही आज प्रथमच आपल्याला रामण्णांच्या प्रेमाचे दर्शन झाले असे तिला वाटत होते. का आज आपण पुन्हा वधू झालो ? रामण्णांचा आवाज ऐकून हा उत्साह, लज्जा, रोमांच ! आपण नववधू आहोत. मग हे कपडे बरोबर नाहीत. प्रसंगाप्रमाणे कपडे नेसले पाहिजेत. जर आपण नटून थटून सभेला गेलो तर रामण्णांना किती आनंद होईल. रामण्णांना आनंद होईल तर आपल्यालासुद्धा केवढा आनंद होईल. दोघांनी खूश होऊन मुलाला पाहिले पाहिजे, आणि मग दोघांनी मोहनला बघता बघता एक दुसऱ्यांचे चुंबन घेतले पाहिजे.

कुमुदने एकदम स्वतःला सावरून घेतले, विचारांच्या आवेगात तिने स्वतःसाठी एक नवीन साडी हातात घेतली. एकदम घाबरून तिने जिन्याकडे पाहिले. तिला आठवण झाली, की हीच साडी नेसताना रामण्णांनी आपल्याला किती सतावलं होतं.

तेव्हा शेवटी रागात येऊन कुमुद म्हणाली होती— "अहो असले विचार डोक्यात ठेवून पुस्तक लिहाल तर कोणतीही सुसंस्कृत व्यक्ती ते वाचणार नाहीच पण हातसुद्धा लावणार नाही. "आपल्याला किती राग आला होता. पण रामण्णांनी आपल्याला स्वतःकडे ओढायचं म्हणून थांबवलं नाही. शेवटी इतकं झालं की, साडी आपल्या हातून निसटू लागली. कुमुद हसतच पुढे विचार करूं लागली. तोपर्यंत मोहनच्या जन्मानंतर-

सुद्धा रामण्णांच्या स्वभावातून अल्लडपणा गेला नव्हता. त्यांनी एक दिवस जेव्हा आपण आत्याबाईच्या घरून पहिल्यांदा परत आलो होतो, तेव्हा मोहनला मांडीवर घेण्याच्या मिषाने खोडकरपणे आपल्याला स्पर्श केला होता. . . . आपण मूर्खच आणि पुन्हा दुर्दैवी.

अरेच्या. पुन्हा आपण आपल्या दुर्दैवाबद्दल कशाला विचार करू लागलो. आज मोहन येताच आपण दोघे त्याचा एक एक हात धरून सभेला घेऊन गेलो तर? नाही बाई. 'हे' मोहनच्या ऐवजी माझाच हात धरतील. छे, मोहनलाच सांगीन. हा मुलगा जरा लवकर आला तर बरे होईल बाई.

हा विचार करता करताच कुमुदने आरशात पाहिले. ही साडी त्याना आवडायची नाही ? मोहन लवकर आला तर बरं होईल. ते सुद्धा म्हणालेत. ". . . मोहनही सभेला येईल". अगबाई खरंच. मलाच त्यांनी सांगितलं होतं. मी वेड्यासारखी स्वतःच काहीतरी विचार करीत बसले आहे. आणि त्यांना उगीचच वाटायचं की मी त्यांच्याशी काही बोललेच नाही.

कुमुद खालच्या पायरीपर्यंत आली. किती वेळ झाला. त्याची किती वाट पाहायची? अजून त्याचा काही पत्तातच नाही.

नंतर मोठ्याने म्हणाली— "मोहनची वाट पहात आहे." नंतर अपराधी मुला-प्रमाणे आपली जीभ चावून ती पायऱ्यांवरून दूर सरकली.

## १६

"मोहनसुद्धा सभेला येईल" . . .असं पुटपुटतच पायरीवर उभे राहिलेले रामण्णा हवालदिल होऊन इकडे तिकडे पाहू लागले.

"मोहनचीच वाट पहात आहे". कुमुदचा आवाज. त्या आवाजालाच डोळ्यांनी पाहण्याची इच्छा झाल्यामुळे रामण्णा डोळे फाडफाडून पाहू लागले. त्यांच्या डोळ्या-समोर जणू अंधार पसरला. ते पायऱ्यापाशी खांबाला पकडून उभे राहिले. अशाप्रकारे एक क्षण गेला. नंतर असं वाटलं, जणू वर्षाचा पसरलेला दाट अंधार एका क्षणात दूर झाला. नजरेसमोरून पडदा दूर झाला. त्यांना देशकाळाच्या सीमांपलिकडे पाहण्याची शक्ती आली. रामण्णांच्या शरीरावर काटा उभा राहिला.

मानवाचे अंतरंग एक मोठी अद्‌भुत सृष्टी आहे . . . असं म्हणतच ते खोलीत शतपावली करू लागले. मनुष्याचे ज्ञान मोठे विलक्षण आहे. . . . असेच आपण म्हणू शकू कधी कधी वाटतं, कुठल्या गोष्टीला काही अर्थच नाही. मनुष्याचे सर्वात प्रिय सुख कोणते ? हेच आहे असे म्हणणे शक्य आहे का ? कित्येक वेळा पहिल्यांदा जे दुःख वाटतं, त्याच्या उलट काही झालं, तर त्याला सुख असे नाव दिले जाते होय. आमचे प्रत्येक ज्ञान अशाच प्रकारचे आहे. म्हणून तर स्मृती ही मनुष्याची एक विशिष्ट शक्ती मानली जाते . . . एक आहे आजचा वर्तमान काळ, एक आहे, जुना भूतकाळ. भूत-काळाच्या तुलनेत वर्तमानकाळाच्या अनुभवाला ज्ञान म्हणतात. कुमुदचा आवाज ऐकून रामण्णांच्या अंगावर काटा उभा राहिला. आनंद झाला ? पहिल्यांदा तो आवाज ऐकून अगदी उद्विग्न होऊन जात. तीच तर ज्ञानानुभवाची विलक्षणता आहे ना ? तो आवाज ऐकल्यावर एकदा पूर्वीच्या सुखाची आठवण आली. त्याची तुलना करून रामण्णा उद्विग्न होऊन जात. पण आता ? आज ? तो आवाज ऐकून पूर्वीचा उद्वेग आठवला. त्याबरोबर आजच्या उद्वेगाची तुलना केली. त्यामुळे आनंद झाला. हे खरे आहे.

रामण्णांना भीती वाटली. कुमुदचा आवाज ऐकल्यावर त्यांच्या शरीरावर काटा उभा राहिला होता. हे खरे आहे ? पण तो आनंदाचा क्षण आहे ? डोळ्यांसमोर एक क्षणभर अंधार पसरला होता ना ? का ते सुद्धा आनंदाचे लक्षण आहे ?

रामण्णा एक दीर्घ श्वास घेऊन खुर्चीवर बसले. त्यांनी विचार केला—त्या अंतरंगाचा तळ ओळखणे कठीण आहे. जे रहस्य प्रत्यक्ष परमेश्वराच्यासुद्धा लक्षात येत नाही ते आमच्यासारख्या पामराला काय समजणार ? बिचाऱ्या देवाचे अवतार असलेल्या श्रीरामचंद्रांची स्वतःची अवस्था भवभूतीच्या उत्तररामचरित नाटकात काय झाली ? रामचंद्र सीतादेवीला म्हणतात—"तुझे हात माझ्या गळ्याचा आश्रय प्राप्त करू देत !" सीतादेवी लाजेने गप्पच बसते. तेव्हा रामचंद्र स्वतःच्या हातांनी तसे करतात. आणि मग आश्चर्यचकित होऊन विचारतात "प्रिये, किमेतत् ? यह कथा ?" आपल्या बाहुस्पर्शाने सीतादेवीला काय झाले ? काहीच न समजल्यामुळे ते पुढे म्हणतात -

> विनिश्चेतुं शक्यो न सुखमिति–वा–दुःखमिति वा
> प्रमोहो निद्रा वा किमु विसर्पः किमुमदः ।
> गणो तव स्पर्शे ममहि परिमूढेंद्रिय—
> विकारश्चैतन्य भ्रमयति संमीलयति च ॥

कसा विचार ! त्याचा [illegible] काय ? कोणी वाकड्या डोक्याचा टीकाकार त्याचा अर्थ अशाप्रकारे लिहितो—"सर्वोमद [illegible] अप्रमातरकार्ये तात्पर्यमध्यिकरोति ।"

टीकाकारांनी ह्यातून कसला असभ्य अर्थ काढला. जर स्त्रीचा स्पर्श बेहोष करणारा आहे. मग स्त्री विशेषच भोग्य वस्तू झाली. आहार–निद्रा–भय–मैथुन ह्यांमध्येच रुचि घेणाऱ्या मानव पशूला असे वाटेल. पण भवभूतीचे म्हणणे असे नाही. त्याच्या म्हणण्याचे तात्पर्य आहे की स्पर्शाने अद्वैतानंद प्राप्त होतो. त्या स्पर्शाने असा अनुभव झाला की ज्यामध्ये सुख–दुःख, प्रमोद, निद्रा, विष–मद ह्या प्रकारचा कोणताच भाव वेगळा वेगळा केला जात नाही. भवभूतीचे म्हणणे बरोबर आहे. क्षणभर डोळ्यांसमोर अंधार पसरला. त्यावेळी आपण त्याच प्रकारच्या अद्वैत आनंदाचा अनुभव घेतला होता. अशा अद्वैत आनंदात भोगी कोण आहे ? भोग्य काय आहे ?

हा विचार आल्यावर रामण्णांना वाटले की आपल्या शरीरात शक्तीचा संचार झाला आहे. कुमुदचा आवाज, कुमुदचा स्पर्श कुमुदची आठवण, ह्या सर्वांनी नेहमीच त्यांच्या शरीरात विद्युत्संचार झाल्या सारखे होते आणि शरीरात एक प्रकारचा जोर येतो. खरंच आपण किती प्रेममय जीवन घालविले. आपण भाग्यवानच.

रामण्णांनी आपला विचारप्रवाह थोडा वेळ थांबविला. ते स्वतःशीच पुटपुटले हूं. . . दहा वर्षांच्या यातना पाहिल्या तर हे मोठेच भाग्य आहे."

छे, त्या यातना नाहीत. रामण्णांच्या मनात एक विचार उठला. त्यांना वाटले. जर हट्ट केलाच तर सर्व कष्ट निवारण केल्यावरच मनुष्य सुखी होऊ शकतो. तर ते सुखी होणे कधीच संभव नाही. भाड्याचे दर जर गळू लागले तर जबाबदारी कुणाची ? ते दूर करणे भाडेकरूच्या हातात आहे ? जीवनात आपल्या शक्तीच्या पलीकडे अनेक शक्ती आहेत. अनेक प्रसंग आहेत त्यांच्यामुळे जे कष्ट भोगावे लागतात त्यामुळे दुःखी होण्याने काय फायदा ? जरी सर्व शक्तींना जिंकून घेतले तरीसुद्धा मानव मृत्यूला जिंकू शकत नाही. जर तो कधी मृत्यूला जिंकून घेईल तर तो जीवनाची घृणाच करील. जीवनात कष्टच नको असा विचार करणे चुकीचे आहे. ते अज्ञान आहे. जीवनातील कष्टांना जर जीवनाचा एक अनुभवच समजलो आणि ते जीवनातील एक आवश्यक शिक्षणाचे अंगच समजलो तर त्या कष्टाचे काही वाटत नाही. पुढे रामण्णा, स्वतःला सावरू शकले नाहीत. कष्टाचे कष्ट ह्या विषयावर आणखी कसे बोलले पाहिजे ? जाऊ दे माझ्या मनात काय आहे, ते माझं मलाच माहीत. असा विचार करून त्यांनी आपल्या मनाचे समाधान करून घेतले. मग त्यांनी विचार केला. असे मनाचे समाधान करून घेणे खूप सोपे आहे. पण त्यांच्या मनात आणखी एक विचार आला. कवींनी दुष्यंत–शकुंतला. यक्ष–यक्षपत्नी. राम–सीता ह्यांच्या परस्पर प्रेमाचे त्यांच्या विरहाद्वारेच वर्णन केले आहे.

यक्ष आपल्या पत्नीवर प्रेम करीत होता. पण त्याला एक वर्षाचा विरह सहन करावा लागला. दुष्यंत शकुंतलेवर प्रेम करीत होता. त्यालासुद्धा तिच्यापासून दहा वर्षे

दूर राहायला लागले. आपणसुद्धा दहा वर्षांपासून कुमुदपासून दूर आहोत. म्हणूनच आपण कुमुदवर प्रेम करतो. वाहवा ! हा सिद्धांत बरोबर आहे तर !

सिद्धांत तर ठीक आहे. तर्कसुद्धा सुसंगत आहे. पण मुद्दा हा आहे की कुमुदने-सुद्धा हे मान्य करावे. छे, आता ही गोष्ट इथेच संपली. कुमुदने सुद्धा ही गोष्ट ऐकली, मान्य केली. मोहनसुद्धा सभेला येईल ह्या माझ्या म्हणण्यावर " मोहनचीच वाट पहात आहे " असे नाही का ती म्हणाली ?

छे, काय वेडेपणा आहे. एका साध्या सामान्य गोष्टीवरून आपण कोणकोणते अर्थ काढतो. . . . म्हणजे . . . शब्दांना अर्थ असतो ? का त्यांच्या कल्पनेत अर्थ असतो ?

" मोहनची वाट पहात आहे." ह्याचा अर्थ हाच आहेना ? मी पण तयार आहे. . . . त्यांना आपल्या बोलण्याचे आश्चर्य वाटले, ठीक आहे. आपण कोणत्या शब्दाचा कसा अर्थ लावीत आहो. मोहनचीच वाट पहात आहे. ह्याचा अर्थ काय ? मीसुद्धा तयार आहे. हा अर्थ कोठून निघाला ?

तरीसुद्धा रामण्णांना पक्का विश्वास होता की त्यांनी ज्या अर्थाची कल्पना केली तो ठीक आहे. का. त्याचा आधार काय ? कारण काय ?

मी काहीसुद्धा जाणत नाही. आधार नाही. कारण ? आवश्यकता असेल तर हृदयाची भाषा हृदयच जाणते. बुद्धी जाणत नाही. त्यांनी हे सारे अशा पद्धतीने सांगितले की जणू काही प्रतिवादीलाच धमकी देत आहे.

" मी तयार आहे. . . . हे कुमुदने रामण्णांना सांगताच ते इतके आनंदित झाले. की त्यांना काय करावे आणि काय करू नये तेच कळेना. ते स्वतः खूप आधीपासूनच तयार होऊन बसले होते. . . . अरे वेड्या . . . काही ना काही तरी बोल. आज इतक्या वर्षांनी ती किती आपलेपणाने तयार होऊन बसली आहे. अरे. काही चार प्रेमाचे शब्द बोल . . . असं स्वतःशीच पुटपुटत ते स्वतःवरच रागावले. हळू हळू ते पायऱ्यांकडे गेले. . . जणू ते स्वतःला ढकलतच होते. ते म्हणाले . . . " स्वागत-समितीच्या लोकांची यायची वेळ होऊन गेली."

नंतर ते एकदम खिडकीजवळ गेले. पायऱ्यांवरूनच पुन्हा एकदा म्हणाले–
" स्वागतसमितीच्या लोकांची यायची वेळ होऊन गेली !"

## १७

कुमुद हादरूनच गेली. रामण्णांनी म्हटले होते— "स्वागत समितीच्या लोकांच्या येण्याची वेळ होऊन गेली." त्याचा अर्थ तिला समजला. "स्वागत समितीच्या लोकांच्या येण्याची वेळ होऊन गेली" रामण्णांच्या सांगण्याचा अर्थ असा की, "मी तयार आहे. तूसुद्धा तयार आहेस ना ? कुमुदला हसू आले.

रामण्णा तयार आहेत. 'ह्यां' ची तयारी म्हणजे काय. आपल्याला माहीत का नाही ? कोटाच्या जागी टोपी घालतील. कुमुदला भीती वाटली. आपलं हसणं रामण्णांनी ऐकलं तर ? तरीसुद्धा ती हसली ? स्वतःच हसणं ती आवरू शकली ? एकदा असंच काही काम निघालं म्हणून 'हे' बाहेर निघाले. अंगात काही नाही हे विसरूनच गेली स्वारी. आणि मग कोट पगडीसारखा लपेटून बाहेर निघाले. खरंच, रामण्णा बाहेर जाण्याच्या तयारीत असताना घरातील कुणालातरी त्यांच्याकडे लक्ष ठेवावे लागते. आज तर एका मोठ्या सभेची योजना आहे. आपण रामण्णांसाठी जे कपडे काढून ठेवलेत तेच योग्य आहेत. आता काय घातलेत कुणास ठाऊक.

कुमुद आरशासमोर जाऊन उभी राहिली ती आता तयार झाली आहे. सार्वजनिक सत्कार करून घेणाऱ्या रामण्णांची पत्नी अगदी अनुरूप आहे,

"स्वागत समितीच्या लोकांची यायची वेळ होऊन गेली" दुसऱ्यांदा रामण्णांचे शब्द कानावर पडले तेव्हा कुमुदने मनात म्हटले, ते पाहा . . . मी म्हटलं नाही. 'हे' दुसऱ्यांना चलण्याची इतकी घाई घाई करतात. पण तरीसुद्धा माझ्या तयारीबद्दल रामण्णा विसरले नाहीत. हेसुद्धा मोठं नशीब आहे, असंच म्हटलं पाहिजे. सगळे पुरुष एकसारखेच. बाहेर पडायचे म्हटले की लगेच निघालेच. जरा आरामात निघाले पाहिजे. कुठं जायचंय हे कळून घेऊन. त्याप्रमाणे वेशभूषा करायला पाहिजे. सकाळपासून स्वयंपाक घरात राबणाऱ्या बाईला बाहेर जायची तयारी म्हणजे काय ते तरी माहीत असते का ?

कुमुदने पुन्हा एकदा आरशात आपले प्रतिबिंब पाहिले. घाई कसली ? 'हे' तर तयार आहेत. पण . . . ? कुमुदला भीती वाटली. रामण्णांसाठी तिने योग्य कपडे काढून ठेवलेत. सभेचे बोलावणे यायच्या आधी कपडे बदलून घेतले पाहिजेत. तिथेच जाऊन कपडे दिले तर ? कुमुद एकदम थरथरून निघाली. ती कशी जाऊ शकते ? तेसुद्धा पुन्हा 'ही' नवी साडी नेसून ? तिला भीती वाटली. पण रामण्णांना कपडे बदलावेच लागतील. नाहीतर लोक आपल्याला काय म्हणतील ? कुमुद स्वतःशीच म्हणाली. घरातले हे दोन पुरुष, म्हणजे दोन लहान मुलेच. इकडे मोहनच्या कपड्यांची

चिंता तिलाच. आणि तिकडे रामण्णांच्या कपड्यांची चिंता पण तिलाच. दोघांचे कपडे काढून तयार ठेवले आहेत.

बरं झालं, मोहनचे कपडे काढून ठेवले. . . . असं म्हणतच. कुमुदने आरशात पाहिले. लाजत लाजतच हळूच खालच्या पायरीवरून दुसऱ्यादा म्हणाली, "ठीक आहे. मोहनचे कपडे काढून ठेवलेत."

## १८

खिडकीजवळ उभे राहिलेले रामण्णा प्रसन्नपणे हसले. त्यांनी खिडकीतून खाली डोकावले.

तेव्हा त्यांना कुमुदचा आवाज ऐकू आला—"मोहनचे कपडे काढून ठेवलेत. त्यांना हसू आले. मनातल्या मनात म्हणाले—स्त्रियांचा स्वभाव. घराला आग लागली तरी घरातून बाहेर पडताना, आरशासमोर येऊन केस नीट करतील !"

माझे कपडे नीट नाहीत म्हणने, रामण्णा आनंदाने बेहोशच झाले. ते मनात म्हणाले—आज मी छान नीट कपडे घालून चलावे असा तिचा हट्ट आहे. बिचारी ! तिला माझ्याबद्दल किती वाटते. माझा इतका अभिमान बाळगणारा आणखी कोण आहे ?

"मोहनचे कपडे काढून ठेवलेत !"

दुसऱ्यांदा कुमुदचे हे शब्द ऐकून रामण्णा पायऱ्यापर्यंत गेले. त्यांना असं वाटलं, जणू ह्या शब्दांनी आपल्याला दोरीनेच ओढले. किती लवकर ते पायऱ्यापर्यंत पोचले होते. त्यांनी विचार केला, ओहो. . .मी खाली यावं, असं तिला वाटतं. तिने माझ्या-साठीसुद्धा कपडे काढून ठेवले आहेत. तिला वर यायला लाज वाटत असेल. तिला पाहण्यासाठी मलाच खाली जावे लागेल. ती म्हणेल तसं मला तयार व्हायला लागेल. रामण्णांनी श्वास घेऊन नाटकीपणे म्हटले— "स्त्रिया जेव्हा सांगतील तेव्हा पुरुषांना गप्पच बसायला पाहिजे !"

किती वेडे आहोत. आपण जेव्हा कुमुद तोंड उघडून आपल्याला काही तरी सांगत आहे तेव्हा सुद्धा आपण काही ना काही बडबडतच उभे आहोत.

रामण्णांनी मनगटावरील घड्याळ पाहिले. सभेच्या निश्चित वेळेला फक्त पाचच मिनिटे शिल्लक आहेत. ते मोठ्याने म्हणाले, "अरे ! फक्त पाचच मिनिटें राहिली आहेत."

नंतर ते खिडकीतून बाहेर पाहू लागले.

१९

"फक्त पाच मिनिटेच राहिलीत ना !"

रामण्णांचे बोलणे ऐकून कुमुदने आपले घड्याळ पाहिले.

"होय, पण मोहन अजूनपर्यंत आला नाही. फक्त पाच मिनिटेच राहिलीत. अजून-सुद्धा मोहन आला नाही. का ? कुमुदला आता स्पष्ट कळलं की रामण्णा आपल्यालाच विचारीत आहेत. सगळीकडे पाहून ती दरवाज्याकडे गेली. दरवाज्याजवळ पोचल्यावर उजवीकडे जिन्यावर पाहिले. तिला जिन्यावरून जराशा लांबच्या खिडकीतून बाहेर डोकावणाऱ्या रामण्णांची पाठ दिसली.

लिहिणाऱ्यांच्या पाठीला डोळे नसतात. ही देवाचीच कृपा समजून, रामण्णांकडे पाहातच तिने हळूच पावले पुढे टाकली. तेव्हा रामण्णा तिच्याकडे पाहून म्हणाले–

"मोहन आला." रामण्णांनी ज्या डोळ्यांनी मोहनला पाहिले होते त्या डोळ्यांतच मोहनला पाहण्याच्या इच्छेने ती रामण्णांना पाहू लागली. रामण्णांचा प्रसन्न चेहेरा पाहून तीसुद्धा गालातल्या गालात हसली. रामण्णा भरभर जिना उतरू लागले. त्यांना पाहून कुमुदने दरवाजा उघडायचा प्रयत्न केला. पण तिला कडीच सापडेना.

२०

बाहेर जोरात येणाऱ्या मोटारीचा आवाज आला.

रामण्णा म्हणाले– "मोहन आला."

तेव्हा कुमुद म्हणाली–"मला वाटलं, लोक सभेला बोलवायला आले.

मोटारीचा आवाज जवळून ऐकू आला. हॉर्न वाजला. कुणीतरी हाक मारली. एकदम ब्रेक लागल्यामुळे दोघांच्या अंगावर काटा उभा राहिला. कार थांबली. कुमुदने दरवाजा उघडला.

समोर लोक गोळा झाली. एकदम सारे शात झाले. लोकांनी रस्ता सोडला.

"मोहन आला ?" रामण्णांनी विचारले. त्यांच्या तोंडातून धड श्वासही बाहेर पडत नव्हता.

कुमुद एकदम किंचाळून उठली.

जो माणूस मोहनचा देह उचलून आणीत होता तो ह्या विचारातच दरवाज्यातच थबकला. त्याला वाटलं,. . . आत जावे की नको !



Printed at Tarang Printers, Delhi